# डॉ. केतकर
# व्यक्ति आणि विचार

कै० श्रीधर व्यकटेश केतकर यांच्या
निवडक लेखांचा संग्रह

सपादक : प्रा. श्रीकृष्ण के. क्षीरसागर

कॉण्टिनेण्टल् प्रकाशन, टिळकरोड, पुणें २.

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर

# केतकर : व्यक्ति आणि विचार

( निवडक लेखांचा संग्रह )

सपादक :

प्रो. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर

कॉण्टिनेण्टल् प्रकाशन, टिळकरोड, पुणें २.

## आभार

या पुस्तकाच्या तयारीच्या वेळीं श्री. शीलवतीबाई केतकर यानीं जी आपुलकीची दृष्टि दाखवून सहकार्य केलें, त्याबद्दल मी व माझे प्रकाशक त्याचे ऋणी आहोंत.

श्री. अनतराव कुलकर्णी यानीं हें काम माझ्याकडून तगाद्यानें व सहकार्यानें करून घेतलें नसतें, तर तें झालें नसतें हें आभारपूर्वक नमूद केलें पाहिजे.

जनवाणी छापखान्याचे श्री. ह. म. गद्रे यानीं तत्परतेनें काम पुरें केल्याबद्दल त्याचे आभार मानणें जरूर आहे.

**श्री. के. क्षी.**

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

डॉ. केतकर याची माहिती महाराष्ट्रीय वाचकास ज्ञानकोशकार, समाजशास्त्रज्ञ आणि सशोधक म्हणूनच विशेष आहे. याखेरीज त्यानीं समाजशास्त्रीय विचारामुळें काहींशा अवजड आणि मुलखावेगळ्या झालेल्या पाचसात कादंबऱ्या लिहिल्या आहेत, हेंहि सर्वांच्या कानावर असतें. तथापि सर्वसामान्य वाचकापर्यंत किंवा प्रौढ विद्यार्थ्यांपर्यंत पोंहोंचण्यास या दोन्ही लिखाणाचा तादृश उपयोग नाहीं, हें उघडच आहे. याचा अर्थ सर्वसामान्य महाराष्ट्रीयास केतकराचें नाव माहित नाहीं असा मात्र नाहीं. केतकर हे लोकप्रिय 'लेखक' नसले, तरी आख्यायिकाचा विषय बनलेले असामान्य पडित आहेत, यात शका नाहीं. तसेंच सर्वसामान्य वाचकानीं व तरुण विद्यार्थ्यांनीं केतकरासबंधीं काहींना काहीं नियतकालिकातून किंवा पाठ्य पुस्तकातूनच वाचलेलें असतें हेंहि उघड आहे. चौकस बुद्धीचे वाचक एखाद्या ग्रथकाराच्या अशा अप्रत्यक्ष ओळखींतूनच प्रत्यक्ष ओळखीकडे वळतातहि, पण अशा चौकस वाचकाचें प्रमाण आपल्याकडे अद्याप कमीच आहे.

याचा परिणाम म्हणजे डॉ. केतकर या व्यक्तीसबधीं शेकडों वेळा उल्लेख ऐकले असूनहि व थोडेंफार वाचलें असूनहि त्याचें स्वतःचें एक अक्षरहि ज्यानीं वाचलें नाहीं, असें अनेक वाचक व विद्यार्थी आढळतात. डॉ. केतकराच्या वाङ्मयाचें स्वरूप व उद्दिष्ट लक्षात घेता, ही स्थिति सर्वस्वी विपरीत आहे हें कबूल करावें लागेल. कारण डॉ. केतकर हे महापडित असले आणि त्याचा ज्ञानकोश हा मराठींतील एक विराट ग्रंथ असला, तरी केतकर हें पडिताकरता लिहिणारे पडित नसून, सामान्य चौकस वाचकांकरिता लिहिणारे राष्ट्रोद्धारक होते ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

## प्रस्तुत पुस्तकाचें स्वरूप

प्रस्तुत वेंच्याच्या पुस्तकाचा उद्देश केतकराचें व केतकराच्या वाङ्मयाचें हें स्वरूप तरुण वाचकाच्या आटोक्यात आणून ठेवणें हा आहे.

व म्हणूनच या पुस्तकाचें वर्णन "केतकराचें," "केतकरासंबंधींचें" व "केतकराच्या उताऱ्याचें" पुस्तक या शब्दात करता येईल. पण नेहमींच्या शब्दात म्हणजे "निबंधाचें", "कथाचें", "लघुनिबंधाचें" असें त्याचें वर्गीकरण मात्र करता येणार नाहीं कारण या पुस्तकात केतकराचीं काव्यें सोडून ( त्यानीं काव्येंहि लिहिलीं आहेत ! ) जवळ जवळ सर्व लेखन-प्रकारातील उतारे संग्रहित केले आहेत. एकेक उतारा विचारदृष्टया स्वयंपूर्ण असावा व सर्व उतारे मिळून केतकराच्या विचारसरणीचे व भाषासरणीचें वैशिष्टय तरुण वाचकाच्या मनावर ठसावें एवढाच उद्देश येथें संपादकानें स्वतःसमोर ठेवला आहे या गद्य वेंच्याच्या पुस्तकात केतकराच्या स्फुट लेखातील उतारे आहेत, टीकाशास्त्रीय ग्रंथातील उतारे आहेत, आत्म-चरित्रपर ग्रंथातील उतारे आहेत, राजकीय पुस्तकातील उतारे आहेत, कादंबऱ्यातील उतारे आहेत व प्रत्यक्ष ज्ञानकोशातीलहि दोन महत्त्वाचे उतारे आहेत.

विषयाच्या व ग्रंथस्वरूपाच्या या विविधतेमुळें केतकराच्या विचाराचे व शैलीचे अनेक पैलू येथें नमूद झाले असले, तरी वाङ्मयप्रकार मात्र सर्वत्र प्रायः एकच आहे कीं काय असा भास होईल ! कारण ज्ञानकोशातील ज्ञानस्वरूपचर्चेपासून ते कादंबऱ्यातील राजकीय-सामाजिक मनोविश्लेषणा-पर्यंत सर्वत्र "एका प्रखर व्यक्तिमत्त्वाच्या माध्यमातून उतरलेलें विचार-प्रधान गद्य" हेंच या सर्व उताऱ्याचें स्वरूप आहे. केतकराच्या कादंबऱ्या-तूनहि अशा प्रकारचें स्वयंपूर्ण विचारप्रधान गद्य निवडणें जेवढें सोपें आहे, तेवढें शुद्ध ललितवाङ्मय निवडणें सोपें नाहीं, हें केतकराभ्यासकास सांगायला नकोच.

अशा स्फुट उताऱ्याच्या पुस्तकात सर्वांत प्रथम जर केतकराच्या कोणत्या पुस्तकाला स्थान असेल तर तें त्याच्या स्फुट लेखाच्या पुस्तकाला, असें प्रथम दर्शनीं वाटण्यासारखें आहे.– मला स्वतःलाहि वाटलें होतें परंतु अधिक विचार केल्यानंतर मला माझें मत थोडें बदलावें लागलें. स्फुट म्हणून लिहिलेल्या लेखातच केतकर कित्येकदा सूत्रमय आणि दुर्बोध ( Terse ) बनतात, तर उलट सविस्तर ग्रंथलेखनांत अनपेक्षितपणें सुगम

बनतात असें दिसून येईल. थोडीशी कल्पनाशक्ति वापरल्यास बाह्यतः विपरीत दिसणाऱ्या या प्रकाराची उपपत्ति सहज लागेल. डोक्यात अभिनव आणि क्रान्तिकारक विचाराची गर्दी असलेला केतकरासारखा लेखक नव्यानें एखादा विषय हातीं घेऊन तो एका लेखात बसवू लागला म्हणजे एका ग्रंथाचा ऐवज एका लेखात कोंबून मोकळा होतो ! कारण फिरून त्या विषयाकडे वळायला केव्हा बनेल याची शाश्वति नसते. जिला इंग्रजींत Terse किंवा " अल्पाक्षर-विशेष " शैली म्हणतात तिचें मूळ लेखकाची बुद्धि आणि लिखाणाची लाबी याच्या या विषमप्रमाणातच असतें. सामान्य बुद्धीचा लेखक सूत्रमय लिहू जाईल तर ते हास्यास्पद होईल, उलट असामान्य बुद्धीचा लेखक शभरापैकीं नव्वद प्रसगीं न कळत सूत्रमयच लिहून जाईल. साराश केतकराच्या स्फुट लेखातील लिखाण हें त्याच्या ग्रथातील लिखाणाहूनहि अनेक स्थळीं अधिक सूत्रमय व दुर्बोध झालें आहे. व म्हणूनच तरुणाकरिता निवडावयाच्या केतकर-सग्रहात, स्फुट लेखाहूनहि केतकराच्या ग्रथसभाराकडे वळणें मला अधिक युक्त वाटलें.

## पहिल्या सलामीचे स्फुट लेख

आणि तरीहि सग्रहरूपाने प्रसिद्ध झालेल्या त्याच्या स्फुट लेखाना काहीं दृष्टींनीं आगळे महत्त्व आहे, हें येथें मुद्दाम निर्देशिलें पाहिजे. अमेरिका व इग्लड या देशातील वास्तव्य सपवून हिंदुस्थानात परत आल्यावर म्हणजे सुमारें बेचाळीस वर्षापूर्वी, केतकर आपल्या कार्याची दिशा ठरवीत होते; व त्याच दृष्टीनें समकालीन पुढाऱ्याच्या व विद्वानाच्या कार्याचें मापन करीत होते. लोकमान्य टिळकासारख्या एखाद्याच पुढाऱ्याविषयीं निर्भेळ आदर; स्वतःच्या सामर्थ्यासबधीं अमर्याद आत्मविश्वास; स्वदेशाच्या भवितव्यासंबधीं सबळ आशावाद; व आधुनिक ज्ञानाच्या कक्षासबधीं निश्चित कल्पना या चतुरग बलानें सज्ज असा हा बौद्धिक मल्ल प्रत्यक्ष आखाड्यात उतरण्याऐवजीं १९१३ सालच्या सुमारास जणू नुसती कुस्तीचीं आव्हानें देत सुटला आहे असें त्याच्या त्या काळच्या स्फुट लेखावरून वाटेल. एका महाराष्ट्रीय बुद्धभक्ताला त्यानीं त्या काळात दिलेलें बेमुर्वतखोर आव्हान, किंवा डे. ए. सोसायटीसारख्या सर्वमान्य सस्थेच्या स्वार्थत्यागावर केलेला

प्रक्षोभक प्रहार हे विषय मला तरुण विद्यार्थ्यांच्या संग्रहात अगदींच अप्रशस्त वाटले. व म्हणूनच त्यांच्या अगदीं पहिल्या स्फुटलेखाच्या संग्रहातील जे लेख मी निवडले आहेत ते केतकरांची अगदीं वेगळी बाजू म्हणजे 'रचनात्मक ध्येयवादा'ची बाजू दाखविणारे लेख आहेत. नगरसंवर्धन आणि राजकीय पक्षसंघटना यांच्यासंबंधींच्या या लेखांतील* केतकरांच्या कल्पना जितक्या अभिनव आहेत तितक्याच विधायकहि आहेत आपलीं ध्येयें समाजाच्या गळीं उतरविण्याकरता थोडयाफार थट्टेखोरपणाचा उपयोग करण्याची केतकरांची प्रवृत्ति येथेहि अनेक जागीं दिसून येते!

केतकरांच्या या प्राथमिक मराठी लिखाणानेंच सामान्य वाचकांना सार्वजनिक क्षेत्रातील या नूतन 'पुरुषावतारा'ची कल्पना येत होती. त्याच्याहि आधीं त्यांनीं आपलें महत्त्वाचें समाजशास्त्रीय लिखाण (जातिभेदाचा इतिहास) प्रसिद्ध केलेलें होतें. पण तें इंग्रजींत होतें. म्हणून ज्या स्फुट लेखसंग्रहातून उपरिनिर्दिष्ट दोन लेख येथें घेतले आहेत, त्या संग्रहातील लेख हेच महाराष्ट्राच्या दृष्टीनें ज्ञानकोशकाराचे पहिल्या सलामीचे लेख होत.

## आत्मचरित्रपर उतारे

पण "**केतकर: व्यक्ति आणि विचार**" या पुस्तकातील अगदीं प्रारंभींचे उतारे केतकरांच्या आत्मचरित्रपर लिखाणातून घेतलेले आहेत. केतकरांचें सर्वच लिखाण त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या रंगात रंगून निघालेलें आहे. त्यामुळें अप्रत्यक्ष आत्मोल्लेख टिपून काढायचे म्हटलेंच तर कादंबऱ्या, काव्यपरीक्षण, काव्यें यात तर निघतीलच पण ज्ञानकोशात देखील निघतील. बर्नार्ड शॉ यास एकदा कोणीं आत्मचरित्र लिहिण्यासंबधीं सूचना केली. त्यावर त्यांनीं आपल्या प्रक्षोभक पद्धतीनें त्यास उलट विचारलें, 'What else have I been doing all these years?'' डॉ. केतकर हेहि आपल्या व्यक्तिमत्वरंजित लिखाणासंबधीं असाच प्रश्न विचारू शकले असते. तथापि त्यांनीं एक दोन प्रसंगीं उघडपणेंहि आत्मचरित्रकथन केलें आहे.

---

* (१) नगरसंवर्धन आणि नगरसौंदर्य. (२) पोलिटिकल क्लब कसा असावा?

ज्ञानकोशाचें कार्य पुरें झाल्यावर '**माझी बारा वर्षांची कामगिरी**' अथवा 'ज्ञानकोशमंडळाचा इतिहास' या नांवाखालीं केतकरानीं एक प्रकारचें आत्मचरित्रच लिहून काढलें आहे. या आत्मचरित्रातून प्रस्तुत वेंच्यात जो भाग * घेतला आहे, तो त्याच्या जीवितकार्याची मूळ प्रेरणा त्याच्याच शब्दात सागणारा असल्याने, केतकर-वाङ्मयाच्या आकलनास अत्यत उपयुक्त आहे. तसेंच मागें निर्देशिल्याप्रमाणें त्याच्या स्फुट लेखातून घेतलेला भाग त्याचा सामाजिक ध्येयवाद अथवा ध्येयसृष्टि रगवणारा आहे. समकालीन समाज व समकालीन नेते याना आपली ध्येयसृष्टि पटवून देणें व ती सत्यसृष्टींत आणण्याकरिता त्याच्या विचारसृष्टींत सु-राज्य स्थापणें हा केतकराचा उद्योग होता. ही वैचारिक सुव्यवस्था स्थापण्याकरता, फुटकळ परगणे कब्जात घेण्यापेक्षा, अशोक, अकबर, अगर ईस्ट इडिया कपनी याच्याप्रमाणें प्रथम आसेतु-हिमाचल भूमि आपल्या आकित करून घेऊन मगच बारीक सारीक प्रान्ताची व्यवस्था लावणें सोयीचें होईल असें त्यानीं ठरविलें. भारतीय विचारव्यवस्थापनार्थ आवश्यक असें साम्राज्य म्हणजेच त्याचा तेवीस खडाचा ज्ञानकोश होय.

## पांडित्य, नव्हे राष्ट्रीय ज्ञानव्यवस्था

ज्ञानकोशासबधींची केतकराची कल्पना पडिती छापाची नव्हती, तर राष्ट्रोद्धारकी बाण्याची होती. ज्ञानकोशाच्या योगें श्रेष्ठ प्रतीच्या पाडित्यांत भर पडत नाहीं असे नव्हे; (केतकराच्या ज्ञानकोशानेंहि तशी भर पडली.) परतु ज्ञानकोशाचा आद्य उद्देश विद्वानावर मात करण्याचा नसून विद्वानाच्या विद्वत्तेंत सुव्यवस्था स्थापण्याचा असतो. ब्रिटिश राज्याच्या स्थापनेनंतर आपल्या सुशिक्षितानीं आणि पुढाऱ्यानीं ज्ञानसपादन केलें होतें, ज्ञानाची महतीहि गायिली होती कोणी म्हणत, 'विज्ञानामुळें पाश्चात्यानीं आपणास जिंकलें, तर आता आपण विज्ञान हस्तगत करू,' कोणी म्हणत 'आपण बौद्धिकदृष्ट्या कमी नाहीं हें पाश्चात्याना दाखविण्याकरता आपण सर्व आधुनिक विद्या हस्तगत करू.' पण या दोन्ही विचारात खऱ्या 'वैचारिक पुनरुज्जीवना'चीं अथवा 'रेनॅसन्स्'चीं बीजें नसून केवळ राजकीय दास्यामुळें

---

*. प्र० १, २......

मनात धुमसणाऱ्या जातीय न्यूनगंडाचे व जातीय स्पर्धेचे जतू होते. राष्ट्रोद्धाराकरता अखिल ज्ञानाची व्यवस्था लावणे अवश्य आहे व त्या ज्ञान-व्यवस्थेचें साधन ‘ ज्ञानकोश ’ हेंच आहे, हा सिद्धान्त ही केतकराची राष्ट्रीय विचारातील प्रमुख भर होय. केतकराचा हा प्रमुख सिद्धान्त व प्रमुख उद्योग नीट समजला, म्हणजे अर्धे अधिक केतकर समजले, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

केतकराच्या ज्ञानव्यवस्थितीच्या योजनेचे तीन महत्त्वाचे विभाग होते. पहिला विभाग म्हणजे सस्कृतीचा विशाल इतिहास जुळवणें व सर्वसामान्य सुशिक्षितास समजेल अशा तऱ्हेनें माडून दाखविणे दुसरा विभाग म्हणजे विद्या व संस्कृति याच्या प्रान्तात आधुनिक जग कोठपर्यंत वाटचाल करून आलें आहे व हिंदुस्थान त्या मार्गावर कुठेसा उभा आहे हें दाखवून देणें. आणि तिसरा आणि अत्यत महत्त्वाचा विभाग म्हणजे या सर्व मोजणींत अथवा ‘ सर्व्हे ’मध्यें–पाश्चात्याची ‘ विद्या ’ तेवढी वापरणें पण पाश्चात्याचे ‘ डोळे ’ मात्र कधींहि न पत्करणें. साराश केतकराच्या राष्ट्रीय ज्ञानकोश-कार्यास भारतीय विद्येइतकीच पाश्चात्य विद्येची गरज होती; आणि या दोन्ही विद्यापेक्षाहि अधिक गरज बौद्धिक स्वातत्र्याची होती. त्याना सभोंवतालच्या समाजात व पुढाऱ्यात विद्वत्तेचा दर्जा कनिष्ठ प्रतीचा दिसला; जी थोडीफार विद्वत्ता सभोंवारच्या अज्ञानसागरात दहापाच जागीं द्वीपा-प्रमाणें डोके वर काढीत होती, तिजमध्येंहि त्यास दळणवळण व नियोजन दिसलें नाहीं. आणि सर्वात शोचनीय गोष्ट म्हणजे विद्येच्या क्षेत्रात,–अगदीं गीर्वाणविद्येच्या क्षेत्रातहि, त्यास ‘ बौद्धिक दास्य ’ अथवा ‘ आग्ल-शूद्रत्व ’ दिसून आलें “ इग्रजरूपी आधुनिक ब्राह्मणाच्या तोंडाकडे ज्ञानजळाच्या आशेनें पाहत बाजूला उभे असलेले व त्याच्या शब्दाना वेदवाक्य मानणारे शूद्र म्हणजे आमचे आधुनिक पंडित,” असें त्या काळच्या बहुसख्य पडिता-कडे पाहून केतकराना भासलें

## ज्ञानकोश-संप्रदाय म्हणजे काय ?

अर्थात् राजकीय स्वातत्र्यार्थ बॉम् करण्याची विद्या शिकून येण्याकरता म्हणून प्रथम परदेशात गेलेला हा पडित, अखेर बौद्धिक्

स्वातंत्र्याच्या कार्यक्रमावर येऊन स्थिर झाला. बौद्धिक स्वातंत्र्याच्या मार्गे राजकीय स्वातंत्र्याकडे जाण्याची योजना, म्हणजेच केतकर-सप्रदाय अथवा ज्ञानकोश-सप्रदाय होय, असेंहि एका अर्थानें म्हणता येईल.

या सग्रहातील राजकारणविषयक व नागरिकशास्त्रविषयक लेखावरून वरील मीमासेस पुष्टि मिळेल. परतु केतकरानीं केवळ या विषयावरच लिहिलें असें नव्हे प्रस्तुत सग्रहात त्याच्या **'महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण'** या ग्रंथातील उतारा घेतलेला आहे. त्या उताऱ्यातहि त्याची मर्मज्ञता व शास्त्रीय दृष्टि दिसून येते. मूलतः केतकर याचा पिंड समाजशास्त्रज्ञाचा आहे एखाद्या वनस्पतिजातीकडे किंवा प्राणिजातीकडे जीव-शास्त्रज्ञ ज्या तटस्थ आणि तल्लीन वृत्तीनें पाहील व तिच्या विकासाचे नियम वर्तवील त्याच तटस्थपणानें केतकर मानवजातीकडे पाहतात. पण शास्त्रीय अव-लोकनाला व निष्कर्षाला आवश्यक अशी तटस्थता केतकराच्या वृत्तींत असाधारण प्रमाणात असूनहि, पुन्हा एक समाजप्रेमी आधुनिक मानव आणि देशप्रेमी आधुनिक भारतीय म्हणून दिसून येणारा उत्साह आणि आशावादहि त्याच्या या समाजावलोकनात दिसून येतो. एखाद्या तज्ञ पण धैर्यशील डॉक्टराच्या खंबीर आशावादानें ते या रुग्ण आणि जर्जर राष्ट्र-पुरुषाकडे पाहतात, हेंच त्याच्या अथाग वाङ्मयोदधीचें वैशिष्ट्य होय. एरव्ही ज्या पुढाऱ्याच्या लिखाणात शास्त्रीयता आढळते, त्याच्या अगीं राष्ट्रीय उत्साह बेताचाच उरलेला दिसतो; तर ज्याच्या वृत्तींत राष्ट्रीय उत्साह आहे, त्याना उत्साहाच्या भरात आमच्या या वृद्ध भारतभूमीला "काहींच झालेलें नाहीं" असा भास होऊन त्याच्या देशोद्धाराचें पर्यवसान निष्फळ स्वदेशप्रशसेंत व परदेशनिंदेंत होतें!

## टीकाशास्त्रांतील लोकशाही

साराश, या सहृदय तटस्थतेच्या भूमिकेवरूनच केतकर काव्य-परीक्षणाकडे वळले आहेत. ते, "केतकराचें" काव्यपरीक्षण लिहीत नसून "महाराष्ट्रीयाचें" काव्यपरीक्षण नोंदवीत आहेत, ही गोष्ट टीकाशास्त्राच्या दृष्टीनें अपूर्व आहे. एक प्रकारें टीकाशास्त्रातील लोकशाही संप्रदायाचा पायाच केतकरानीं आपल्या 'महाराष्ट्रीयाचे काव्यपरीक्षण' या वैशिष्ट्यपूर्ण

टीकाग्रथाच्या द्वारें घातला आहे असें म्हणता येईल. एखाद्या देशाच्या लोकपरपरेंत, दतकथात, सुभाषिताना सहजोद्गारात त्या देशाच्या कवींसबधीं जो अभिप्राय नमूद झाला असेल, त्याचें महत्त्व वैयक्तिक पाडित्य, वैयक्तिक अभिरुचि व वैयक्तिक पूर्वग्रह यावर भिस्त ठेवणाऱ्या एकलकोंड्या पडिताच्या अभिप्रायाहून अधिक विचारार्ह होय, हा केतकराच्या वाङ्मयटीकेचा मुख्य रोख आहे. याचा अर्थ केतकराना स्वतःला आग्रह व पूर्वग्रह नव्हते असा नव्हे; पण स्वतःचे आग्रह असूनहि राष्ट्रीय अभिप्रायाचें महत्त्व ओळखणें व राष्ट्रीय अभिप्रायाच्या अस्फुट खुणा गोळा करीत फिरणें हें केतकराच्या टीकाशास्त्राचें वैशिष्ट्य होय त्याच्या व्यक्तिमत्त्वात आत्मनिष्ठवृत्ति आणि वस्तुनिष्ठ दृष्टि याचें विचित्र आणि दुर्मिळ मिश्रण होतें, हें त्याच्या या काव्यपरीक्षणात्मक ग्रथात विशेष प्रत्ययाला येईल. त्याच्या वृत्तींतील हें दुर्मिळ मिश्रण हेंच इतर विद्वानाहून व पुढाऱ्याहून केतकराचे वेगळेपण होय. पोरपणा आणि विद्वज्जडता, ध्येयमग्नता आणि थट्टेखोरपणा, राष्ट्रीयता आणि आन्तरराष्ट्रीयता, प्राचीन समाजासंबंधीं सशोधनप्रेम व समकालीना-संबधीं कुटुबप्राय हौस, या परस्परविरोधी वृत्तींचे मिश्रण डॉक्टराच्या पिंडात असल्यामुळें ते इतर विख्यात महाराष्ट्रीयाहून एकदम वेगळे भासतात. त्याचें व्यक्तिमत्त्व आकर्षक व आदरणीय तर वाटतेंच, पण थोडें विचित्र आणि अद्‌भुतहि वाटतें. कल्पक सहानुभूति नसलेल्याना तर त्यात विक्षिप्तपणाचाच प्रत्यय प्रामुख्यानें येतो !

## विद्यार्थिदशा, ध्येयनिश्चय व विवाह

डॉक्टर केतकर हे वऱ्हाडमध्यें स्थायिक झालेल्या कोंकणस्थ कुटुंबात जन्मले होते. ते वृत्तीनें आन्तरराष्ट्रीय व विश्वकुटुबी असले, तरी जात व प्रान्त याचा उल्लेख अभिमानानें करण्यात त्यास पाप वाटत नसे. त्यास विदर्भप्रान्तासबंधीं अभिमान होता हें त्याच्या लिखाणातील कित्येक उल्लेखा-वरून सहज दिसण्यासारखें आहे. ब्राह्मण्याचा व कोंकणस्थ पोटजातीचा उल्लेख करण्यासहि ते कचरत नसत. हे उल्लेख कादा-लसुणाप्रमाणें वर्ज्य मानणें म्हणजेच जातिधर्मातीत (Cosmopolitan) होणें, अशी कल्पना असलेले लोक, त्याच्यावर कधीं कधीं जातीयतेचाहि आरोप करतात !

विद्यार्थिदशेंत ते तीव्रबुद्धीचे व प्रखर जिज्ञासेचे म्हणून प्रसिद्ध होते. त्यांचें हायस्कूलचें शिक्षण उमरावती येथें झालें; व ते कॉलेजच्या शिक्षणाकरतां मुंबईत विल्सन कॉलेजात दाखल झाले. या वयातहि त्याची लेखनाविषयींची आवड सिद्ध होऊ लागली होती. पुढे वीर वामनराव म्हणून राष्ट्रीय चळवळींत प्रसिद्ध झालेले, ' राक्षसी महत्त्वाकाक्षा '–कर्ते वामनराव जोशी हे त्याचे उमरावतीचे वर्गबधु होत. त्याचे दुसरे वर्गबधु म्हणजे बाळकृष्ण सन्तुराम गडकरी हे होत.

आपलें जीवितकार्य कसें व केव्हापासून ठरत गेलें, याचा मागोवा स्वत डॉक्टरानींच आपल्या या आत्मचरित्रात्मक लिखाणात घेतला आहे. त्यातील उतारा वाचकास या पुस्तकात आरभीच वाचावयास मिळेल. तथापि केतकाराचें जीवितध्येय वर्तमानपत्रें वाचून ठरलेलें नसून स्वतःच्या पिंडातूनच उमटलेलें असल्यानें, तें त्याचे त्यानाच स्पष्ट होण्याला थोडा काळ लागावा हें स्वाभाविकच आहे. आपल्या दुसऱ्या एका (अपूर्ण) आत्मचरित्रात * त्यानींच " माझें मन जसें अनेक स्त्रियामागें धावलें, तसेंच तें अनेक ध्येयामागेंहि धावलें." अशा अर्थाचे उद्‌गार काढलेले आहेत. तथापि या तारुण्यसुलभ ' ओढाळपणा 'तहि या राष्ट्रपुरुषाचीं तीन प्रमुख आकर्षणें मेरुमण्याप्रमाणें स्थिर होतीं. एक ज्ञानविषयक आकर्षण, दुसरें राष्ट्रप्रेम आणि तिसरें ज्ञानव्यवस्थेच्या मार्गानें राष्ट्रीय मार्गदर्शन करण्याची महत्त्वाकाक्षा.

ध्येयनिश्चितीच्या इतिहासाप्रमाणेंच आपल्या विवाहाची पार्श्वभूमीहि डॉ. केतकर याच्या स्वतःच्याच शब्दात या पुस्तकात वाचावयास सापडेल. शीलवतीबाई—पूर्वाश्रमीच्या मिस् कोहेन्–याची व केतकर याची ओळख लंडनमधील एका क्लबमध्यें झाली. कोहेन कुटुब मूळचें जर्मनींतील, पण पुढें लडनमध्यें स्थायिक झालेलें या कुटुबात प्राचीन भरतखड व त्याची संस्कृति हा कुतूहलाचा व प्रेमाचा विषय झालेला होता. कोहेन कुटुंबाचें व स्वतः शीलवतीबाईचें भारतप्रेम एका अर्थी ' रोमॅटिक ' होतें. कारण आपण हिंदुस्थानात गेल्यास अद्यापहि आपणास कण्व मुनींसारख्या मुनींचे आश्रम व

* प्रतिभा : माझ्या आयुष्यातील बऱ्यावाईट आठवणी.

वल्कलें नेसूनहि रमणीय दिसणाऱ्या, आणि "गांधर्वेण विधिना" विवाह लावून मोकळ्या होणाऱ्या शकुन्तला भेटतील अशी तरुण मिस् कोहेन याची कल्पना होती! त्याना इंग्रजीखेरीज जर्मन्, डच, फ्रेंच व लॅटिन् या भाषा उत्तम प्रकारें येत होत्या व हिंदुस्थानात आल्यावर आपल्या पतीच्या देशाची म्हणजे महाराष्ट्राची भाषा त्या उत्तम प्रकारें शिकल्या. परभाषातील हिंदुस्थानविषयक लेखाचे व ग्रंथाचें भाषांतर करण्यास त्यांचा ज्ञानकोशमंडळास फार मोठा उपयोग झाला केतकराच्या पश्चात्हि विद्वान् पतीच्या महत्कार्यात तज्ज्ञपणें समरस होणारी आत्मनिरपेक्ष विद्वत्पत्नी म्हणून सुजाण महाराष्ट्रीयास त्या आदरणीय झाल्या आहेत.

पण केतकराचा सार्वजनिक जीवनप्रवेश 'अद्भुत' या अर्थीहि 'रोमॅंटिक' करण्यात या विद्वान् आणि निष्ठावान् आंग्ल युवतीनें स्वत ला नकळत हातभार लावला, यात मात्र शंका नाहीं. त्याच्या कल्पनेप्रमाणें हिंदुस्थानात आल्यावर त्याना प्रेमळ कण्वसदृश वृद्धात आणि मुग्धसुंदर तापसकन्यात जन्म घालवावा लागला नाहीं, तर अस्सल पुणेरी— नव्हे त्याच्याच पतींनीं पुढें रूढ केलेल्या शब्दात म्हणजे—अस्सल सदाशिवपेठी स्त्रीपुरुषात वावरावें लागलें. त्यामुळें डॉक्टर केतकराच्या विश्वज्ञानसंकलनात झालेल्या त्यांच्या उपयोगापेक्षाहि डॉक्टराच्या जीवनाला गंगाजमनी तऱ्हा आणण्यासच प्रथम त्यांचा उपयोग अधिक झाला. डॉक्टर केतकराच्या विचारापासून ते पोषाखापर्यंत सर्वच गोष्टी तत्कालीन पुण्याच्या चर्चेचा विषय झाल्या होत्या. त्यातच केतकरानींच प्रथम वापरात आणलेल्या 'व्रात्यस्तोम' नामक एका वैदिक विधीनें वैदिक समाजात घेऊन नंतर वैदिक पद्धतीनेंच 'पर्णिलेल्या' त्याच्या या आंग्ल पत्नीची भर पडली!

केतकराच्या वैयक्तिक व राष्ट्रीय जीवनातील लोकविलक्षण तऱ्हामुळें एक मात्र वाईट झालें. ते आदराचा विषय झाल्यावरहि अभ्यासाचा आणि अनुकरणाचा विषय झाले नाहींत. केतकराच्या कार्याचा संबंध प्राचीन संशोधनाच्या तुरळक संस्था आणि सामान्यतः बंदच राहणारीं संदर्भ-ग्रंथाचीं कपाटें याच्याशीं नसून, राष्ट्राच्या दैनंदिन व्यवहारात पुढारी वा कार्यकर्ता म्हणून वावरू इच्छिणाऱ्या प्रत्येक आधुनिक महाराष्ट्रीयाशीं आहे,

हें आम्हाला ज्या दिवशीं पटेल, त्या दिवशीं पोकळ पूज्यभावाच्या अवस्थे-तून आमचें केतकरप्रेम पुढे सरकलें, असें म्हणता येईल. हें कार्य ज्ञान-कोशाच्या व समाजशास्त्रीय ग्रंथाच्या प्रकाशनानें तर घडून आलें नाहींच; पण केतकराच्या कादंबऱ्यानींहि हें घडून आले नाहीं याचें थोडें आश्चर्य वाटल्यावाचून राहात नाहीं. केतकरवाङ्मयाचें हे प्रत्यक्ष राष्ट्रोपयोगी स्वरूप निवडक, विविधरूप आणि प्रातिनिधिक उताऱ्याद्वारे तरुण वाचकाच्या आटोक्यात आणणे व अवश्य तेवढ्या प्रस्तावनेने तें तरुणास विशद करून सांगणे हाच या लहानशा केतकरसंग्रहाचा उद्देश आहे.

## ज्ञानकोश आणि तत्कालीन विद्वान्

केतकरानीं ज्ञानकोशाचा जाहीर संकल्प सोडला, तेव्हा आमच्या विद्वानांचीहि कल्पना "हा तरुण विद्वान् करून करून काय करणार? तर एन्-सायक्लोपीडिया ब्रिटानिकाची देशी नक्कल तयार करणार!" याहून पुढें जात नव्हती! तथापि ज्ञानकोशाचे प्रास्ताविक चार खंड पाहिले, तरीहि ही कल्पना त्या विद्वानांचेंच अज्ञान दाखविणारी होती हें पटेल. आपण काय करीत आहों व आज आपल्या राष्ट्राकरता विद्वानानीं काय करायला हवें, याची केतकराना पूर्ण कल्पना होती, हें या संग्रहातील त्यांच्या स्वत-च्याच निवेदना* वरूनहि कळण्यासारखें आहे. त्या काळच्या आपल्या स्फुट लिखाणासंबधीं केतकरानीं म्हटलें आहे :

"राजकीय अगर सामाजिक सुधारणेविषयीं जे लोक काहीं तरी कार्य करूं इच्छितात, तथापि.. सोपपत्तिक ज्ञान मिळवण्यास ज्यास अवकाश नसतो...ज्याच्या अगीं प्रयत्न करण्याची इच्छा आहे व कर्तेपणा आहे. अशा लोकास यापैकीं काहीं लेख उपयोगी पडतील असें वाटतें...

"कर्त्या माणसास मदत करणाऱ्या इतर माणसाची जरूरी आहे.कार्यांत मदत करणाऱ्या लोकास जे लोक हातीं घ्यायचे त्यासहि सामान्यत कर्तव्य-जागृति लागते. सामान्य जनास काहीं विचाराची ओळख करून दिली तर पुढाऱ्याचें काम सुलभ होईल....

---

* प्रकरण २...

" राष्ट्रघटनेस व राष्ट्रसंवर्धनास जें ज्ञान उपयोगी पडेल त्याचा थोडा अंश या लेखांत आला आहे."

" माझें काम शिक्षकाचें आहे." *

केतकरांच्या स्वकार्याविषयींच्या या उद्गारांत त्यांच्या वाङ्मयाचें उद्दिष्ट व स्वरूप चित्रित झालें आहे. ज्ञानकोशांत हेंच कार्य फार प्रचंड प्रमाणावर आखलेलें असल्यानें तें एका वाचकाच्या एका दृष्टिक्षेपाच्या पलीकडचें आहे. तथापि या संग्रहांतील ज्ञानकोशासंबंधींचा एक उतारा * व प्रत्यक्ष ज्ञान-कोशांतील दोन उतारे * पाहिल्यास केतकरांच्या या राष्ट्रशिक्षणकार्यक्रमाची कल्पना आल्यावाचून राहणार नाहीं प्रकरण २ मध्यें आजचें भारतीय पांडित्य व पाश्चात्य राष्ट्रांतील पांडित्य यांची केतकरांनीं राष्ट्रीय गरजेच्या दृष्टीनें जोखणी केलेली आढळेल. प्रकरण १३ मध्यें या विशाल बुद्धिमत्तेच्या राष्ट्र-पुरुषाचें ' राष्ट्रीय ज्ञातव्या ' संबंधींचें तत्त्वज्ञान आढळेल. तें जितकें खोल आहे तितकेंच तें व्यापक व वास्तववादीहि आहे. ज्ञान हें जसें पदवीकरतां आणि प्रदर्शनाकरतां नसतें, तसेंच तें मेल्यानंतर मोक्ष मिळण्याकरतां किंवा ब्राउनिंगच्या ' वैयाकरणाप्रमाणें अन्तकाळीं ' Amo I Love ' हा लॅटिन् धातु, किंवा ' प्रिये ' ' प्रियावहे ' हीं संस्कृत रूपें म्हणत प्राण सोडण्या-करितांहि नसतें !

## केतकरांचा ऐहिक पुरुषार्थवाद

डॉ. केतकर हे स्वधर्माची कुचेष्टा करणाऱ्या पंथापैकीं नसले, तरी परलोक आणि अध्यात्म यांच्या मागें लागणारांपैकींहि नव्हते. ते व्यक्तिशः ऐहिक पुरुषार्थापलीकडची भाषा काढीत नसत व राष्ट्रालाहि याच पुरुषार्थाची शिदोरी देण्याचा त्यांचा संकल्प होता. आधुनिक ज्ञानांत व आधुनिक जीवनक्रमांतच ही शिदोरी आहे, हें त्यांना पटलें होतें. व प्राचीन-अर्वाचीन, पौरस्त्य-पाश्चात्य ज्ञानार्णवाकडे ते याच ऐहिक पुरुषार्थ-दृष्टीनें पाहात. विद्येच्या क्षेत्रांतील ही आधुनिकता, हा उच्च उपयुक्ततावाद, आणि ही उदार दृष्टि येण्यास डॉ. केतकर यांस जन्मजात दिलदारपणा–

* ज्ञानकोशकार केतकर. गद्यविलासिका : श्री. के. क्षी.

इतकीच अमेरिकेंतील वास्तव्याचीहि मदत झाली असावी, असें माझें मत आहे. जर्मनीसारखीं काहीं आधुनिक राष्ट्रेंहि ज्ञानाच्या क्षेत्रात 'अमूर्तपूजक' ( Abstiact तत्त्वाच्या मागें लागणारीं ) असतात; या उलट अमेरिका हें राष्ट्र कोणत्याहि पुस्तकी तत्त्वाचा सबध आजच्या जीवनाशीं कोणता हें पाहण्याकरता उत्सुक असतें. 'अमेरिकॅनिझम्' मधील हा स्वभावविशेष आधुनिक भारतास विशेष उपयोगी आहे. डॉ. केतकर याच्या ज्ञान-मीमासेंत उच्च पातळी न सोडता हीच ऐहिकपुरुषार्थवादी दृष्टि राष्ट्रापुढें पेश केलेली दिसेल.

विविध विद्याना चालू व्यवहाराच्या कक्षेंत आणून ठेवताना डॉ. केतकर आपल्या विशाल व्यासगाचा, प्रवासाचा व अवलोकनाचा जसा उपयोग करीत, तसाच आपल्या थट्टेखोरपणाचा व व्रात्यपणाचाहि उपयोग करीत, हें या सग्रहातील त्याच्या राजकीय लिखाणावरून दिसून येईल. विशेषतः लोकशाहीकडून करण्याच्या अपेक्षासबधीं त्यानीं ज्ञानकोशात जें लिहिलें आहे.* तें या दृष्टीनें मोठें मासलेवाईक आहे. 'ज्ञानकोश' म्हणजे अत्यंत गभीर चेहऱ्याने लिहिलेला, अत्यत कटाळवाणी माहिती देणारा व बहुधा कुलपातच वास्तव्य करणारा अजस्र ग्रथ, अशी ज्याची कल्पना असेल, त्याना हें प्रकरण ज्ञानकोशातील नसून एखाद्या लोकप्रिय पाश्चात्य वृत्तपत्राच्या रविवारच्या आवृत्तींतील आहे, असेंहि भासेल! ज्ञानकोशाच्या मानानें तें फाजील चुरचुरीत आहे यात शका नाहीं! पण असे फाजील मसालेदार भाग 'दिदेरो' सारख्या फ्रेंच एन्‌सायक्लोपीडिस्टाच्या ज्ञानकोशात व डॉ. जॉन्सन्‌च्या शब्दकोशातील साध्या शब्दार्थांतहि आढळतील! पण एवढा एक गाभीर्याचा प्रश्न सोडला, तर या प्रकरणात जी राजकीय मार्मिकता, जी दुर्मिळ माहिती व जी वास्तववादी दृष्टि आहे, ती कोणत्याहि शासनविषयक ग्रथात तरी आढळेलसें वाटत नाहीं. या सग्रहात हा भाग अंतर्भूत करण्यापूर्वीं मीं तो शासनशास्त्र घेऊन बी. ए. (स्पेशल) ला बसलेल्या माझ्या एका तरुण आप्ताकडूनच वाचून घेतला. एरव्हीं क्वचित्‌च 'उद्‌गारवाची' होणारा तो तरुण ज्ञानकोशातील सदर प्रकरण वाचून

---

* प्र. १४

झाल्यावर उद्गारला : " ज्ञानकोशात असली काहीं माहिती आहे, हें मला परीक्षेच्या आधीं का नाहीं कळलें ! "

## खेळकर क्रान्तिवाद

केतकराच्या राजकीय लिखाणात शासनशास्त्राच्या खोल ज्ञानाबरोबरच थट्टेखोर प्रयोगशीलतेचाहि मासला वाचकाना पाहायला मिळण्याचें आणखी एक कारण आहे. केतकराच्या राजकीय आकाक्षात कातिवादातील ' धनभाग ' ( Positive aspect ) तेवढा होता. पण ' ऋणभाग ' ( Negative aspect ) मात्र नव्हता. प्रत्येक क्रान्तिवादी कार्यकर्ता मूलगामी पुनर्घटनेचा भोक्ता असतो, त्याचे समाधान कामचलाऊ डागडुजीने होत नाहीं, या अर्थानें पाहता केतकर मूलगामी ऊर्फ रॅडिकल् होते. परतु प्रत्येक क्रातिन्कारक थोडाफार वैतागलेला व निराश असतो तसे मात्र ते नव्हते. त्याच्या विचारप्रधान कातिमार्गासबधीं त्याना इतका विश्वास असे कीं व्यवहारी लोक त्याना स्वप्नाळू आणि तऱ्हेवाईक ठरवीत. ' **निःशस्त्रांचें राजकारण** ' या केतकराच्या राजकीय पुस्तकातील जो भाग या सग्रहात निवडला आहे त्यात केतकराच्या राजकीय विचाराची अत्यत निर्दोप अशी बाजू पाहावयास सापडेल. वास्तविक पाहता महात्मा गाधी व पडित जवाहरलाल नेहरू याच्या राजकीय नेतृत्वावर व कार्यक्रमावर केतकरानीं कित्येक प्रसगीं अतिरेकी टीकाहि केलेली आहे. तथापि ' **निःशस्त्रांच राजकारण** ' या पुस्तकात त्यानीं गाधीजी आणि गाधीवाद याचें जितके मार्मिक गुणग्रहण केलेलें आढळेल तितकें खास गाधीवादी लेखकाच्या लिखाणातहि क्वचितच आढळेल राजकीय वास्तववाद आणि व्यक्तिपरीक्षणातील औदार्य या दोहोंच्या दृष्टीनें केतकराचा हा उतारा अत्यत अभ्यसनीय आहे. पण या उलट ' Victorious India ' या त्याच्या पुस्तकात मात्र स्वप्नाळूपणा, हेकेखोरपणा वगैरे दोषाच्या आरोपास जागा आहे हें कबूल करावें लागेल. तथापि राज्यघटनाशास्त्र व राजकीय घटनाचें व व्यक्तींचें विश्लेषण या दृष्टीनें हा इग्रजी ग्रथहि अभ्यसनीय आहे यात शका नाहीं. १९३५ च्या राजकीय हक्काच्या कायद्यानें हिंदुस्थानला स्वराज्य मिळालेलेंच आहे, पण हिंदी पुढाऱ्याना व ब्रिटिश कार्यकर्त्योना त्या कायद्याचे अपरिहार्य निष्कर्ष नीट कळले

नसल्यानें कब्जा घेणें तेवढें राहिलें आहे असा केतकराचा ' थीसिस् ' आहे पण कब्जा हाच कायद्याच्या राज्यात मुख्य असतो ! ( Possession is nine points in law. हा कब्जा स्टेट सेक्रेटरीवर फिर्याद लावून मिळवू पाहणाऱ्या या निर्धन पंडितास राजकारणी पंडितानीं वेड्यात काढलें तर त्यात त्याचा काय दोष ?

सामाजिक विश्लेषणातहि केतकर हाच फाजील विश्वास, फाजील आशावाद व फाजील थंडपणा दाखवीत असत असें त्याच्या कादंबऱ्यातील उताऱ्यावरून दिसून येईल. केतकराचा ज्ञानमार्ग, केतकराचा आशावाद, केतकराचा धीटपणा व केतकराचा भ्रात्यपणा पाहून ' फेबियन् सोसायटी 'च्या पॅफ्लेट्सनीं क्रान्ति करूं पाहणाऱ्या बर्नार्ड शॉची आठवण झाल्याखेरीज राहात नाहीं. लोकाना स्वतःचें हित समजावून देणें शक्य आहे, व त्यानीं तें समजावून घेण्याचा अवकाश, कीं जबरदस्तीचे कायदे किंवा रक्तपाती क्रान्ति याचें कारणच पडणार नाहीं, हें बर्नार्ड शॉ याचें गृहीत कृत्य. पण फेबियन् सोसायटीच्या हीरक-महोत्सवानिमित्त काढलेल्या लेखसंग्रहात या दुर्दम्य आशावाद्यानेंहि आपल्या या आशावादाचें विसर्जन केलेलें आढळेल !

## सामाजिक आशावाद व कठोर आत्मपरीक्षण

पण केतकराचा आशावाद — जगाच्या अडाणीपणामुळेंच का होईना !— राजकीय क्षेत्रात जितका अनाठायीं होता तितका तो सामाजिक क्षेत्रात नव्हता. कारण सामाजिक क्षेत्रात केतकराच्या उदयापूर्वी परिस्थितीचें विश्लेषणच सशास्त्र आणि वास्तव पद्धतीचें झालेलें नव्हतें. आणि एकदां दोषनिदान योग्य तऱ्हेनें झाल्यावर सामाजिक क्षेत्रात तरी – परकीय सत्तेचा आणि परकीय स्वार्थाचा संबंध नसल्यानें – अर्ध्याहून अधिक कार्य झालें असें समजण्यास हरकत नाहीं.

पण केतकराच्या कादंबऱ्यातील समाजविश्लेषणात समाजसंस्थाच्या विश्लेषणापेक्षाहि समकालीन सुधारकाचें मनोविश्लेषणच अधिक आहे. कारण महाराष्ट्रातील समाजसुधारणेला दुहेरी कीड लागलेली होती. एकतर जातिभेदासारख्या अत्यंत प्राचीन संस्थेचीं पाळेंमुळें किती खोल व जटिल आहेत याची कल्पना पुष्कळशा शब्दशूर [illegible] आणि

दुसरें म्हणजे अखेर या शब्दशूरानीं प्रत्यक्ष कृतीचें शौर्य करून दाखविलें तरी त्याना त्या शौर्याच्या शतविध परिणामाची कल्पना नसे. 'अप्पासाहेब डग्ग्याचें गृहचित्र' या 'ब्राह्मणकन्ये'तील उताऱ्यात, एका प्रामाणिक व ध्येयवादी सुधारकाच्या मनाची ओढाताण डॉ. केतकर यानीं सर्वसामान्य कादबरीकारापेक्षा फार खोल व फार वेगळी दाखविली आहे. अप्पासाहेब डग्गे यानीं हीनकुलीन व भिन्नजातीय अशा शान्तेशीं विवाह केला, तो उच्च हेतूनें केला. त्या विवाहात धाडसहि होतें व ध्येयवादहि होता. तथापि विवाह सुखावह होण्यास एवढ्या दोन गोष्टी पुरेशा नाहींत हें त्यास हळूहळू दिसून येतें. याला कारण केवळ समाज दुष्ट व मागसलेला आहे एवढेंच नव्हे, तर व्यक्तिशः मनुष्यहि सर्वथा ध्येयवादी झालेला नसतो,–त्याच्या काहीं व्यावहारिक आकाक्षा शिल्लक उरलेल्या असतात! केतकरानीं हें सत्य सहृदयपणें पण न डरता सागितलें आहे. आमच्या सुधारणावादी कादंबरीकाराची कल्पना अशी दिसते कीं सामाजिक शौर्याचें चित्र रेखाटणें म्हणजे शौर्य होय. पण स्वत.ला प्रिय वाटणारें सामाजिक शौर्यहि परिस्थितीला पुरे पडणारें नाहीं,—त्या शौर्याच्या छातीलाहि एखादें क्षत आहे, हें सागण्याला त्याहून अधिक शौर्य लागतें. हें आत्मपरीक्षणाचें व ध्येय-दोषदर्शनाचें शौर्य केतकराच्या कादबऱ्यात सर्वत्र दिसून येतें.

डॉ. केतकराची ही 'वास्तवतर' दृष्टि म्हणजे केवळ सामान्य ध्येयवाद व सर्वमान्य सद्‌गुणकल्पना याचा फुगा फोडण्यातला प्रकार नव्हता. तो तसा असता तर केतकराचें तत्त्वज्ञान व इब्सेन्-शॉ याचे तत्त्वज्ञान यात फारसा फरक नाहीं एवढें म्हणण्यानें काम भागलें असतें. अप्पासाहेब डग्ग्याच्या सारख्या सामान्य सुधारकाचा ध्येयवाद अपुरा पडतो, व म्हणून त्याच्यापेक्षां धीरोदात्त सुधारकाची गरज आहे असेंहि केतकराना म्हणावयाचें नाहीं; किंवा ध्येयवाद ही कल्पनाच भ्रामक आहे असेंहि त्याना म्हणावयाचें नाहीं. ध्येयवादाच्या कल्पनेनें अनौरस, अकुलीन अगर आक्करमाशा सन्ततीशीं विवाह करणाऱ्या सुधारकाना स्वतःच्या मनाचें आणि स्वतःच्या समाजाचें फारच अपुरें ज्ञान असतें हें केतकराना दाखवायचें आहे. स्वतःच्या मनाचें योग्य ज्ञान आणि स्वतःच्या समाजाचें योग्य ज्ञान याची जागा कोणताहि

ध्येयवाद भरून काढू शकणार नाहीं. स्वतःची मनःस्थिति, समाजातील वस्तुस्थिति व पुढच्या पिढीला पडणारे पेंच यांचा विचार न करता केवळ पुस्तकी विचार, परकीय राजवटींतील सवलती व वर्तमानपत्रात येणारी साप्रदायिक प्रशसा याच्याकडे पाहून विवाह करणाऱ्या सुधारकाच्या कृतींवर व अवस्थेवर डॉ. केतकर यानीं '**ब्राह्मणकन्या**' या कादंबरींत अनेक बाजूनीं प्रकाश टाकला आहे.–'मजुळेचें भवितव्यावलोकन' या प्रकरणात तर जणू या प्रश्नासबधींचें टेस्टॅमेंट अथवा 'मृत्युपत्र'च केतकरानीं समाजसुधारकाना उपलब्ध करून दिलें आहे. जिच्या अनौरस कन्येचा विवाह एका उच्चवर्णीय, उच्चकुलीन सद्‌गृहस्थाशीं झालेला होता अशी पोक्त स्त्री या ठिकाणीं त्या कन्येला भावी पिढीसबधीं गभीर सल्ला देत आहे. ती म्हणते : "पण काहीं असो, मला तुझ्या अपत्याचें भवितव्य अधःकारमय दिसत आहे; तुझे लग्न एका सभ्य गृहस्थाबरोबर झालें आहे ही आनदाची गोष्ट झाली नाहीं, असेंच माझ्या मनात वारवार येतें. . . तुझें लग्न उच्च दर्जाच्या जातीच्या मनुष्याशीं करून मीं तुला आणि तुझ्या मुला-बाळाना एकसारखें भीतींत आणि संशयित स्थितींत ठेवलें आहे.... . ज्या जातींत तुझा नवरा जन्मास आला आहे, त्या जातींत तुझा किंवा तुझ्या मुला-बाळाचा प्रवेश कधींच होणार नाहीं. . . तारुण्यामुळें उदार भावना ज्याच्या मनात खेळतात असा एखादा तरुण गाठून त्याच्याशीं तुझें लग्न चिन्तोपंतानीं ज्याप्रमाणें लावून दिलें तसेंच तुझ्या नवऱ्यास आणि तुला करावें लागेल, पण अशी ठकवाठकवी किती पिढया चालायची ! . . कालिंदीला तुझ्यासारख्याच जन्माच्या मनुष्याकडून मागणी आली, आणि त्या मागणीबद्दल तुझ्या नवऱ्याला राग आला आणि ती मागणी तुझ्या नवऱ्यानें नाकारली हें ऐकून मला फार दुःख झालें.

"मला असें वाटतें कीं तुमच्या कुटुबाचें जें भवितव्य ठरलें आहे. तें ओळखण्याचें तुम्ही गर्वानें नाकारीत आहात . ..."

डॉ. केतकर हे स्वतः रूढ अर्थानें सुधारक नसले तरी रूढीविरुद्ध वर्तन करण्याचें धैर्य त्याच्यापाशीं होतें याची साक्ष त्याचा स्वतःचा विवाहच देत आहे. व म्हणूनच 'एका सुधारकानें सुधारणेची तरफदारी करण्याकरता

लिहिलेल्या कादंबऱ्या' असें त्याच्या कादबरीचें वर्णन नसलें, तरी एका धीट सुधारकानें कठोर आत्मपरीक्षणार्थ लिहिलेल्या कादबऱ्या असें त्याच्या कादंबऱ्याचें वर्णन खासच करता येईल. तथापि सामान्यतः पुरोगामी म्हटले जाणारे कादबरीकार आत्मपरीक्षणाला तयार नसतात, व म्हणून या मंडळींकडून डॉ. केतकर याच्या सामाजिक विचारावर 'जीर्णोद्धारक' (Revivalist) वृत्तीचा आरोप केला जातो.

## केतकरांच्या कादंबऱ्यांचा वाङ्मयीन दर्जा

डॉ. केतकराच्या कादबऱ्यातील सामाजिक विचाराप्रमाणेंच रचना-कौशल्यहि बऱ्याच मतभेदाचा विषय झालेलें आहे. डॉ. केतकर यांचें कथावाङ्मय रेखीव व प्रमाणबद्ध नाहीं हें कोणासहि मान्य होण्यासारखें आहे, तथापि त्यामधील या दोषामुळें तें सर्वसामान्य मराठी कादबरीच्या तुलनेनें कोठें बसविता येईल या प्रश्नावर मात्र पुष्कळच मतभेद होण्यासारखा आहे. एखादें समाजचित्रण जिवंत आहे, पण अव्यवस्थित आहे, आणि दुसरें एखादें समाजचित्रण प्रमाणबद्ध आहे पण निर्जीव आहे. तर या दोन समाजचित्रातील कोणतें समाजचित्र कथावाङ्मयांत वरच्या दर्जाचें ठरवावें? या प्रश्नाचें उत्तर डॉ. केतकराच्याच शब्दात देता येईल ते 'परागंदे'च्या उपसंहारात म्हणतात–"जेव्हा चालू असलेला आयुष्यक्रम मनोरजक करण्याचें कौशल्य कथालेखकास नसतें, तेव्हा तो कृत्रिम सविधानक तयार करून कथा मनोरजक करू पाहतो." "वाचकवर्ग किंवा टीकाकारवर्गदेखील या प्रकारच्या खोट्या समाजचित्राला इतका सोकावलेला असतो, कीं 'कारस्थान' किंवा अद्भुत गुणानीं भरलेले नायक व तसल्याच नायिका ज्यात नसतील ती कादबरी त्यास अपूर्ण वाटू लागते." "जगातील साध्या आयुष्यक्रमाची मनोरंजकता ज्या कथालेखकास शोधून काढता येत नाहीं अशा लेखकाची कादंबरीच ध्येयरूप धरून इतर कादंबऱ्या त्या दृष्टीनें तो तपासू लागतो." "कथेचा कथापणा कारस्थानामुळें उत्पन्न होत नसून अनेक माणसें एकत्र मिळून जो व्यवहार होतो त्यामुळें उत्पन्न होतो."*

---

* डॉ. केतकरांच्या कादंबऱ्या (डॉ. द. न गोखले).

या उद्गारांवरून कादंबरीलेखनासंबधीं डॉ. केतकर यांचीं कांहीं विशिष्ट मतें होतीं असें दिसून येईल. टीकाशास्त्राच्या परिभाषेत वरील उद्गार भाषांतरित करावयाचे म्हटल्यास वास्तवदर्शन म्हणजेच कला; हें मत येथें केतकरांनीं मांडलें आहे असें दिसतें. व त्याबरोबरच कृत्रिम कथानकामुळें मनोरंजक केलेली कादंबरी श्रेष्ठ वाङ्मयात मोडत नाहीं, असेंहि मत डॉ. केतकरांनीं व्यक्त केलें आहे. हरिभाऊ आपटे सोडल्यास मराठींतील प्रसिद्ध कादंबरीकाराच्या कादंबऱ्यादेखील कृत्रिम घटनाच्या दोषापासून सर्वथा मुक्त नाहींत, असे म्हणता येईल पण याचा अर्थ केतकराच्या कादंबऱ्यात दोष नाहींत असाहि नाहीं, व केतकराच्या कादंबरीविषयक उद्गारात पूर्ण सत्य आहे असाहि नाहीं प्रमाणबद्ध बाहुलीपेक्षा जिवंत परंतु थोडीफार सदोष स्त्री अधिक चित्ताकर्षण करील यात शंका नाहीं. तथापि जिवंतपणा हाच जसा स्त्री सौंदर्याचा एकमेव गुण नव्हे, त्याप्रमाणेंच वास्तवता हा कादंबरी-सौंदर्याचा एकमेव आधार नव्हे मराठींतील कोणत्याहि कादंबरीकारापेक्षा केतकराचें समाजचित्रण अधिक वास्तव आहे; कारण त्याचें अवलोकन व आकलनच अधिक खोल आहे. तथापि दीर्घ कथानकाला एकजीवित्व येण्याला जी ठाम बैठक लागते ती केतकराच्या लेखनात दिसून येत नाहीं. त्यात चित्रणाचा एक प्रकारचा फुटकळपणा दिसून येतो, यात शंका नाहीं. आणि तरीहि खोट्या एकसंधपणापेक्षा हा जिवंत पण फुटकळ लेखनप्रकार विचारी वाचकास अधिक आकर्षक वाटतो यांतहि शंका नाहीं.

## दोषाचें मूळ बोधहेतु ?

डॉ केतकराच्या कादंबऱ्यातील या दोषाची मीमांसाहि थोड्या सदोष पद्धतीनें केलेली आढळते. केतकराच्या कादंबऱ्यातील दोष त्याच्या बोधहेतूमुळें निर्माण झाले आहेत अशी टीका आजवर अनेक वेळा झाली आहे व अलीकडेच अभ्यासपूर्ण पद्धतीनें लिहिलेल्या एका पुस्तकातहि * करण्यात आलेली आहे. केतकराचा बोधहेतु सिद्ध करण्याकरिता त्यांच्या

* टीप . डॉ. केतकर यांच्या कादंबऱ्या ( डॉ गोखले )

प्रस्तावनेंतील त्यांचे स्वतःचे उद्‌गारहि उद्‌धृत करण्यात आलेले आहेत. तथापि एखाद्या कादंबरीकाराच्या प्रस्तावनेंतील उद्‌गारावरून त्याची कादंबरी बोधहेतुप्रधान ठरविणें योग्य होणार नाहीं. कादंबरींत जे विशिष्ट घटनांच्या द्वारें सांगितलेलें असतें, त्याचें स्वरूप प्रस्तावनेंत सामान्य सिद्धान्ताच्या स्वरूपानें सांगण्याचा मोह अनेक कादंबरीकारास होत असतो. पण तेवढ्यावरून सिद्धान्तमंडनाकरितां त्यांनीं ती कादंबरी लिहिली हें म्हणणें बरोबर होणार नाहीं. कादंबरींतील विविध प्रसंग चितारीत असतां केतकरांची भूमिका समाजाशीं व व्यक्तींशीं तद्रूप होणाऱ्या कलावंताचीच असे. कादंबरींतील विविध पात्रांचें जीवन एका मोठ्या व एकसंध कथानकांत बसविणें मात्र त्यांच्या प्रतिभेला पेलत नसे, किंवा त्यांच्या वृत्तीला तें मानवत नसे. कारण त्यांच्या कादंबरींतील विविध घटनांहि पुष्कळदां स्वाभाविकपणें एका मध्यवर्ती घटनेंतून अंकुरतांना दिसतील, पण त्या घटनांचे साधे उघडे पडूं नयेत म्हणून त्यावर मुलामा चढविण्याची पर्वा केतकर करणार नाहींत! किंबहुना वर उद्‌धृत केलेल्या त्यांच्या उद्गारावरून तर असें दिसून येईल कीं, हा विचित्र मानवी संसार मुळातच त्यांस इतका कुतूहलजनक वाटे कीं, त्याला एखाद्या कादंबरीकारानें पुस्ती जोडणें म्हणजे निसर्गसृष्टींतील फळाफुलांना चित्रकाराच्या पेटींतील रंगांनीं टवटवी आणूं पाहण्यातला प्रकार होय असें त्यांना वाटे. पण " कलात्मक कथानक म्हणजे कृत्रिम आणि बनवाबनवीचें कथानक " ही इतरांची कल्पना जितकी खोटी, तितकीच केतकरांची " वास्तव म्हणजेच सौंदर्य " ही अतिरेकी कल्पनाहि चुकीची होती. उथळ, असत्य, आणि डिंकानें डकवून एकत्र बसविलेल्या संसारचित्रांपेक्षा डॉ. केतकरांचीं सखोल, सत्य पण कशींबशीं एकत्र गुंडाळलेलीं संसारचित्रें अधिक परिणामकारक आहेत यात शंका नाहीं पण सखोल आणि सत्य संसारावलोकनहि प्रतिभावंत कादंबरीकाराच्या हृदयाच्या मुशींत वितळून पुन्हा जन्मावें लागतें, हें डॉ. केतकर यांनीं लक्षात घेतलेलें नव्हतें. याला कारण कदाचित ज्ञानकोश-रचनेच्या प्रारंभीं त्यांनीं स्वतःकडे घेतलेली व्यासाची भूमिकाहि असू शकेल! जो आर्ष ( ऋषितुल्य ) लेखक मानवी संसाराकडे स्थितप्रज्ञाच्या दृष्टीनें पाहतो, त्यानें ' कादंबरी ' म्हणून

पुराणसदृश आख्यानपुंज वाचकाना सादर केले तरी खपतील, असा त्याचा एकंदर झोक दिसतो.

## उघडी वागडी वास्तवता

केतकराच्या कादम्बऱ्यात कलात्मक एकजीवित्व किंवा Unity उत्पन्न न होण्याला आणखीहि एक कारण असू शकेल. त्याच्या संसारावलोकनात प्रेमापेक्षा कुतूहलाचाच भाग अधिक असे. त्यामुळें स्वतःची किंवा स्वजनाची जीवनकथा अश्रुपूर्ण नेत्रानीं तन्मयपणे सागणाऱ्या आप्ताची भूमिका ते घेत नसून विविधदेशपर्यटनाची हकीकत सागणाऱ्या मुशाफराची भूमिका त्यानीं घेतली आहे असा भास होतो. ते बोधाकरता लिहीत नसून चित्रणाकरताच लिहितात यात शका नाहीं. पण तें चित्रण सर्वसामान्य गुळमट ( Sentimental ) कथानक वाचायला सरावलेल्या वाचकाला फारच थड आणि उघडेंवागडें वाटतें. डॉ केतकर उघड्या वस्तुस्थितीला अलकार तर घालीत नाहींतच, पण साधें वस्त्रहि नेसवीत नाहींत; किंबहुना ती वाचकानो ‘ पेश ’ करताना ते स्वत हि पुरता पोषाख करीत नाहींत ! अत्यंत हृदयस्पर्शी अशा एखाद्या अवस्थेचें वा व्यक्तीचें परिणामकारक चित्र काढीत असता मध्येंच ते म्हणतील, “.. वगैरे विचार मजुळेच्या मनात येऊन गेले ”, किंवा “ कालिंदीच्या मनात पुढील विचार आले ” ! कालिंदीच्या, मजुळेच्या किंवा अप्पासाहेब डग्याच्या मनात आलेले विचार किंबहुना त्याजवर आलेले प्रसग, मराठींत बहुसख्य कादम्बऱ्यातील विचाराहून व प्रसगाहून खास रमणीय ठरतील. पण ते केतकरानीं अगदींच उघडेवागडे सादर केलेले आढळतील. एखाद्या उची पक्कान्नाला चव आणि पौष्टिकता असावी, पण त्याचें रगरूप उखिरवाखिर असावे आणि तें चादीच्या ताटात वाढण्याऐवजीं एखाद्यानें आपल्या खिशातून काढून आपल्या हातावर ठेवावें त्यातला प्रकार कित्येकदा केतकराच्या सुरस संसारचित्राच्या बाबतींत झालेला आढळतो ! पण पक्कान्न म्हणजे ज्याप्रमाणें चादीचें ताट नव्हे, त्याप्रमाणेंच कला म्हणजे केवळ माडणी नव्हे. कथावाङ्मयातील कलात्मकतेचा प्रमुख भाग माडणींत नसतो

तर अवलोकनातच असतो. ज्याला मानवी ससारातील रमणीयता पाहण्यास डोळेच नाहींत त्यानें हातानीं चाचपून पाहिलेल्या अगर डोक्यातून काढलेल्या चार अर्धवट घटना कितीहि सजवून माडल्या तरी त्याला कादबरीचें स्वरूप कसें येईल ?

## पृथक्करणपटु पात्रे

केतकराच्या कादबरीला ओबडधोबड स्वरूप येण्याला आणखीहि एक कारण होतें. त्यानी वर्णिलेल्या घटना सत्य, अर्थपूर्ण व चित्तवेधक आहेत; त्यानीं चितारलेल्या व्यक्तीहि जिवत व कमनीय आहेत; पण त्या व्यक्ति सासारिक घडामोडींत जितक्या गुरफटाव्या तितक्या गुरफटलेल्या दिसत नाहींत. संसार हा एक असा विचित्र प्रवाह आहे कीं त्यात अवगाहन करणाराला प्रथम डोकें बुडवावें लागतें,– मग त्यानतर तो हातपाय हवे तेवढे हालवो ! तर उलट केतकराचीं पात्रें,—मग त्या स्त्रिया असोत कीं पुरुष असोत, तीं पोक्त असोत कीं अपोक्त असोत,—ससारनदाच्या ऐन धारेला लागल्यावरहि डोके वर काढून सभोंवार पाहत आहेतसा भास होतो ! सर्वसामान्य पात्रेंहि समाजाची ऐतिहासिक गुतागुत उघड्या डोळयानीं, मोकळ्या हातानीं व भरपूर फुरसतीनें उलगडीत बसलीं आहेतसा भास होतो ! तीं सर्वच ब्राह्मणकन्येंतील वैजनाथशास्त्रीसारखीं स्तिथप्रज्ञ असतात असा याचा अर्थ नव्हे. तीं प्रवाहपतितच असतात, त्याचे हातपाय समाज-सकेताच्या विळख्यानीं आवळलेले असतात, त्यातून बाहेर पडण्याइतकीं तीं विरक्तहि नसतात, कीं त्या विळख्याना व्यर्थ हिसके देणाऱ्या पुस्तकी सुधारकासारखीं तीं मूढहि नसतात ! पण त्यापैकीं बहुतेकाना समाजपृथक्करण करण्याइतपत अक्कल आणि फुरसत आहे असें मात्र केतकराच्या कादंबऱ्यात दिसून येतें. याचाच अर्थ केतकराच्या समाजावलोकनात सखोलपणा, सहृदयता व वस्तुनिष्ठता असली, तरी प्रत्यक्ष चित्रणात मात्र केतकर आत्मनिष्ठ भूमिका सोडू शकत नाहींत. केतकराचीं सर्वच वाङ्मयीन अपत्यें केतकराचीच भाषा बोलत आहेतसा भास होतो ! एखाद्या घरातील आबालवृद्ध स्त्रीपुरुषानीं आपल्या कर्तबगार, भारदस्त कुटुबप्रमुखासारखी चर्याकरून वावरण्याचें ठरविल्यास पाहुण्याच्या मनावर

जो परिणाम होईल, तोच परिणाम केतकराच्या कादबरींतील जिवत पण पृथक्करणपटु पात्रे पाहून होतो !

## आर्ष समाज-कथा

साराश, केतकराच्या कादबऱ्यातील दोषहि समकालीन कादबरींतील दोषाहून वेगळे व नवीन आहेत. व म्हणून बोधप्रधानतेमुळें त्याच्या कादबऱ्या बिघडल्या आहेत ही कल्पनाहि बरोबर नाहीं; आणि त्याच्या कादबऱ्या म्हणजे प्रबध आहेत, ही कल्पनाहि बरोबर नाहीं. त्याचीं पात्रें पृथक्करण करतात, व्याख्यानहि करतात, पण स्वत. केतकर समोर एक नैतिक वा सामाजिक सिद्धान्त धरून लिहीत आहेत, असें मात्र म्हणता येणार नाहीं. त्याच्या कादबरीची भाषा इतर कादबऱ्यातील भाषेहून कमी रगवून लिहिलेली, अलिप्त आणि उघडी-बोडकी (Bald) वाटते; पण सबध कादबरींत मिळून त्यानीं आग्रहयुक्त प्रतिपादन केलेलें नसून ताटस्थ्ययुक्त चित्रणच केलेलें आहे, असें आढळून येईल व म्हणूनच तिजमधून वाचकास समाजघटनेसबधीं कितीहि ज्ञान मिळत असलें तरी तिला प्रबंधाचें स्वरूप आलें आहे असें म्हणणें चूक होय. त्याच्या कादबऱ्या म्हणजे एका विशिष्ट उंचीवरून आणि विशिष्ट अतरावरून सागितलेल्या समाजकथाच आहेत. प्राचीन 'आर्ष' काव्याप्रमाणें त्याना अर्वाचीन 'आर्ष समाजकथा' समजणेंच अधिक रास्त होईल. कारण अलिप्तता, बेपर्वाई, सामाजिक दूर-दृष्टि व धीट वास्तवचित्रण याच्या बाबतींत केतकराची तुलना प्राचीन ऋषींशींच होऊ शकेल.

अर्थात् हें सादृश्य येथें निर्देशिल्या गुण-विशेषापुरतेंच आहे हें सागावयास नकोच. केतकरांच्या सामाजिक आख्यानात ताटस्थ्य आणि समाजहितेच्छा असली, तरी आर्ष महाकाव्यात केवळ एवढेंच नसतें, महाकाव्याचें महनीयत्व त्यावर सदैव मेघमडलाप्रमाणें पसरलेल्या भवितव्य-सूचकतेंत व गूढतेंत असतें. अतर्क्य कर्मगतीच्या चित्रणामुळें येणारें हें गूढ गाभीर्य केतकरांसारख्या अट्टल ऐहिक पुरुषार्थवाद्यांत कोठून येणार !

## भाषाशैलीसंबंधीं गैरसमज

डॉ. केतकर याच्या भाषाशैलीसबंधीं जीं मतें प्रचलित आहेत तीं

सर्वस्वी निराधार नसलीं, तरी त्याची अधिक छाननी होणें जरूर आहे. डॉ. केतकर हे प्रभावी मराठी शैली लिहिणारात मोडतात कीं नाहीं या प्रश्नाला उत्तर अस्तिपक्षींच द्यावें लागेल. तसेंच गद्य शैलीच्या विकासात ज्यानीं निश्चित भर घातली आहे अशा लेखकातहि डॉ. केतकर यास निर्विवाद स्थान द्यावें लागेल. पण असें असूनहि मराठी शैलीकाराची गणना करताना डॉ. केतकर याचें नाव सामान्यतः घेतलें जाणार नाहीं व शैलीच्या सदर्भात त्याचें नाव निघालेंच तर बहुधा तें दोषदर्शनार्थच निघेल ! वस्तुस्थिति अशी आहे कीं डॉ. केतकर यांच्या भाषाशैलींत कित्येक असाधारण गुण आहेत तर काहीं अगदीं ढोबळ दोषहि आहेत. जे दोष आहेत ते इतके ढोबळ आहेत कीं ते शैलीचे म्हणण्यापेक्षा वाक्यरचनेचे अथवा व्याकरणाचेच म्हणावे लागतील. अर्थात ते अनवधानानें झालेले असणार हें उघडच आहे वस्तुतः अत्यत सूक्ष्म व व्यापक विचार एकेका ओजस्वी विधानात आटोपणाऱ्या महाबुद्धिमान् लेखकाच्या भाषाशैलींतील अनवधानाचे दोष सर्वस्वी उपेक्षणीयच होत. तथापि तरुण अभ्यासकास इशारा म्हणून या सग्रहातील काहीं नमुने येथें देणें उपयुक्त होईल.

. "आपण असें समजू कीं पुढारलेले वर्गच कौन्सिलात असने तर त्याच्यामार्फत तुमची उन्नति साध्य झाली नसती काय !" (पान ३५).

"खिस्ती 'चर्च' ऊर्फ संप्रदायसस्था मडळीस एकत्र जमवितात तें केवळ ख्यालीखुशालीसाठीं नव्हे; तर लोकाच्याकडून सघशक्तीनें अनेक कार्यें घडवून आणतात"

"तथापि याबरोबर हेंहि सागितलें पाहिजे कीं पुष्कळ उच्च प्रतीच्या लेखकास आपल्या लेखाची समकालीनाकडून चहा होणार नाहीं हें ठाऊक असतें तरी तो लिहीतच असतो."

वरील तीन वाक्यापैकीं पहिल्या वाक्यात "पुढारलेले वर्ग कौसिलात असते" याऐवजीं "पुढारलेले वर्ग कौसिलात आहेत" असें म्हणावयास पाहिजे होतें. दुसऱ्या दोन वाक्यातील व्याकरण-दोष सहज समजण्या सारखे आहेत.

तथापि अनवधानानें झालेल्या या उघड दोषाचीं तुरळक उदाहरणें सोडल्यास केतकराच्या प्रभावी शैलीचीं उदाहरणें त्याच्या विपुल लिखाणात सर्वत्र विखुरलेलीं आहेत. पण तीं आपणास मान्य होण्यास व त्याचें वैशिष्ट्य पूर्णपणें कळण्यास शैलींसबधींचे आपले विचार आपण तपासून घेतले *पाहिजेत. शैली म्हणजे आलकारिक, कोटीबाज, खटकेबाज, गहिंवरलेलें, भाविक पण, लडिवाळ लेखन ही कल्पना आपण सोडून दिली पाहिजे. वरील सर्व प्रकाराचा आकर्षक शैलीला कधींकधीं उपयोग करावा लागतो हें खरें. पण यातील एकहि साधन न वापरता शैली प्रभावी होऊं शकते हेंहि विसरून चालणार नाहीं. माधुर्य हा शैलीचा एकमेव गुण आहे असें नव्हे. ओज व सामर्थ्य हे त्याहूनहि प्रभावी गुण आहेत व विचारप्रधान गद्यात या गुणानाच माधुर्यापेक्षा अधिक महत्त्व असतें, ही गोष्ट शैलीचा विचार करणारे लोक पुष्कळदा ध्यानात घेत नाहींत. ज्या लेखकाच्या लेखनात आलकारिकता व लाडिक सलगी नाहीं, त्या लेखकाच्या लिखाणात "बाकी सर्व आहे पण शैली मात्र नाहीं" अशी कित्येकाची समजूत दिसून येते. वस्तुस्थिति अशी आहे कीं एखादें लिखाण प्रभावी आहे, पण त्यात शैली नाहीं असे म्हणणेच मुळीं हास्यास्पद होय. या उलट ठराविक अलकार अथवा अप्रासगिक सलगी या प्रकारामुळें लिखाण परिणामकारक होण्याऐवजीं क्षीण व परिणामशून्य झाल्याचें दिसून येईल. धीरगभीर लेखनशैली काहीं विशिष्ट अलकारावर व गुणावर अवलबून असते असें म्हणण्यापेक्षा लेखकाचें व्यक्तिमत्व व त्याच्या लेखनाचा विषय याजवर अवलबून आहे असें म्हणणेच अधिक योग्य होईल. व या दृष्टीनें पाहता केतकराच्या विचारप्रधान लिखाणातील शैली तरी—म्हणजे ज्ञानकोशादि ग्रथातील शैली तरी—प्रभावी व धीरगभीर आहे, यात शका नाहीं. या सग्रहात उद्धृत केलेला ज्ञानकोशातील 'हिंदुस्थान आणि जग' हा उतारा (प्रकरण १३) या दृष्टीनें विशेष चिंतनीय आहे. या प्रकरणातील विषय जितका व्यापक

* मराठी गद्यशैलीच्या विस्तृत विवेचनाकारिता 'समाजविकास' (श्री. के. क्षी.) या पुस्तकाची प्रस्तावना पाहावी.

आहे तितकाच तो अभिनव आहे. इतकेंच नव्हे, तर डॉ. केतकराखेरीज कोणास माडावासाहि वाटला नसता, इतका तो वैशिष्ट्यपूर्ण आहे. या विषयात केतकराच्या शैलीने जें धीरगभीर, अर्थगर्भ व सूक्ष्मविचारी रूप धारण केलें आहे तें दुसऱ्या कोणत्याहि विषयात व दुसऱ्या कोणत्याहि व्यक्तीच्या लिखाणात क्वचित्च पाहावयास सापडेल सापडलेंच तर तें कांहींसें गीतारहस्याच्या पहिल्या पहिल्या प्रकरणात पाहावयास सापडेल. अशा लिखाणात वेगळे काढून दाखविण्यासारखे अलकार व गुळमट सलगी याना अवसरच नसतो हें सागावयास नकोच. पण याचा अर्थ अशा धीरगभीर लिखाणात शैलीच नसते असा मात्र नव्हे. तसे म्हणणे म्हणजे शिकवलेल्या चालीवर चालणाऱ्या सर्कशींतील प्राण्याना 'चाल' असते, पण अरण्यात आपल्याच गतीनें चालणाऱ्या व्याघ्रसिंहादि वनराजाना 'चाल' नसते असें म्हणण्यातला प्रकार होय. अशा लिखाणातील शैली पारखण्याचा पहिला मार्ग म्हणजे त्या लिखाणाचा आपल्यावर कोणता परिणाम होतो हे पाहणें हा होय. या सग्रहातील तेराव्या प्रकरणाचा म्हणजेच विख्यात महाराष्ट्रीय ज्ञानकोशातील पहिल्याच प्रकरणाचा परिणाम वाचकाच्या मनावर असाधारण होतो असें दिसून येईल. सर्वसामान्य मानसिक पातळी सोडून आपण उच्च आणि मोकळ्या अशा वैचारिक वातावरणात गेलों असून, तेथून आपणास आधुनिक प्रगतिमान् जगाच्या दाही दिशा प्रथमच नजरेच्या टप्प्यात आलेल्या दिसत आहेत, असें त्यास वाटल्यावाचून राहणार नाहीं. या प्रकरणात आढळून येणारे वाङ्मय-गुण 'उपमा', 'अलंकार', 'माधुर्य', 'चटकदारपणा' या सारख्या ठराविक शब्दानीं सहज सागता येण्यासारखे नाहींत. तथापि बुद्धिमान् व सहृदय वाचकास ते प्रतीत झाल्यावाचून मात्र राहणार नाहींत. या लिखाणात केवळ माहिती अथवा केवळ तर्कशास्त्र नाहीं, तर एक प्रकारचा आवेश, आटोप व उत्साह आहे. व या तिहींचाहि बलदायी संसर्ग थोडीफार सामाजिक जाणीव असलेल्या वाचकास झाल्यावाचून राहात नाहीं. हा परिणाम शैली या शब्दात मराठींत सामान्यतः अन्तर्भूत केल्या जाणाऱ्या कोणत्याहि वाङ्मयगुणानीं घडविता आला असता, असें म्हणता येणार

नाहीं. एका विशाल विचाराच्या व संकल्पाच्या ओढीनें केतकराच्या लेखणीला येथें असाधारण गति व उंची प्राप्त झाली आहे असें दिसून येईल. त्या गतीच्या गंभीर परंतु प्रबल वेगात ते लीलया अनेक सिद्धांत मांडून जातात,—व्याख्या करून जातात,—अनेक नवीन संज्ञा बनवितात. व केवळ ज्ञानाच्या तेजानें वाचकांत राष्ट्रीय आकांक्षा व आशावाद उत्पन्न करतात. शैलीच्या ज्या व्याख्येंत या सूक्ष्म, व उदात्त परिणामाची गणना नाहीं, ती व्याख्या फारच स्थूल म्हटली पाहिजे.

पण व्यक्तींतील भावना असो, कीं लेखनांतील रस असो, त्याचे उघड आणि सूचित, उथळ आणि गंभीर असे दोन प्रकार संभावतात. देशभक्तीची भावना व तिचा वाङ्मयांतील आविष्कार यांना जहाल वर्तमानपत्री लिखाणाच्या काळांत साहजिकच उथळ व भडक असें स्वरूप आले होतें. ठराविक ऐतिहासिक वीरांचें नाटकी आवाहन, स्वदेशाच्या खऱ्या खोट्या सामर्थ्यांचे स्तवन व प्रतिपक्षीयांचा उपहास यांच्या पलीकडे हें लिखाण साधारणतः जात नसे. व म्हणूनच जेथें स्वदेशाच्या उज्ज्वल इतिहासाची व भवितव्याची जाणीव गुप्तपणें आतून स्फुरत असताहि बाहेरून मात्र केवळ वास्तववादी व क्वचित् अप्रियहि विचार व्यक्त केले जात, तेथील खोल भावना व उदात्त आशावाद सामान्य वाचकास प्रतीत होत नसत, व टीकाकारांनींहि दुर्दैवानें ते तेथपर्यंत पोचवण्याचे कार्य केलेलें नाहीं.

उत्कटता आणि आलंकारिकता या दोहोंतून आलंकारिकतेलाच प्राधान्य देण्याची प्रवृत्ति या देशांत उत्तरकालीन संस्कृत वाङ्मयानें उत्पन्न केली. उत्कट भावनेंतून अपरिहार्यत्वानें सुचणारी वक्रोक्ति, आणि पांडित्य व 'मिस्किलपणा' यांच्या मिश्रणानें बनविलेला वक्रोक्तीचा साचा यांतील फरक ओळखणें जरूर आहे.

## सुबोधतेसंबंधीं विपरीत कल्पना

**अशाच तऱ्हेची गफलत क्लिष्टता व सुबोधता यांच्या बाबतींतहि होते. केतकर व राजवाडे यांच्यासारखे लेखक क्लिष्ट लिहितात; व फडके, खांडेकर,**

अत्रे, सानेगुरुजी, य. गो जोशी हे लेखक सुबोध व प्रसादपूर्ण लिहितात, ही समजूत बाह्यतः खरी दिसली तरी दिशाभूल करणारी आहे. सुबोध आणि दुर्बोध हे शब्द सापेक्ष आहेत. परिचित अगर सामान्य विचार सुबोधपणें माडणें, आणि अपरिचित व असामान्य विचार आकलनाच्या आटोक्यात आणणें व प्रभुत्वानें हाताळणें या दोन गोष्टी सारख्या मापानें मापता येणार नाहींत. सुबोधता ही जितकी व्यक्तीच्या शैलीवर अवलंबून आहे तितकीच ती विषयाच्या मगदुरावरहि अवलबून आहे जे लेखक खोल व क्रातिकारक विचाराच्या वाटेसच जाणार नाहींत, त्यानीं सुबोध लिहिलें तर त्यात फारसें नवल नाहीं. पण ज्याना वाचकाच्या प्रत्येक विचाराला, कल्पनेला, फार काय गृहीत शब्दार्थालाहि धक्का द्यावयाचा असतो, त्याचें लिखाण 'स्पष्ट व स्वच्छ' (Clear) या अर्थानें सुबोध असले, तरी 'अपरिचित' या अर्थानें अवघडच वाटणार. पण थोडा विचार केल्यास असें आढळून येईल कीं यातील एकानें सामान्य विचार अर्धवटपणे माडला आहे, तर दुसऱ्यानें असामान्य व अभिनव विचार स्वच्छपणें माडून दाखविण्याची करामत केली आहे. जें अवघड व अपरिचित आहे, तें सुस्पष्ट करण्यात खरी सुगमता असते. जे मुळातच परिचित आहे, तें सुस्पष्ट करण्यात फारशी करामत नाहीं व त्या सुस्पष्टतेला फारसे महत्त्वहि नाहीं. पण वरील दोन प्रकारच्या सुगम लेखनापैकीं अधिक मोलाची सुगमता चाखण्यास व पारखण्यास वाचकात बौद्धिक भूक व रग असण्याची आवश्यकता आहे. तथाकथित सुबोध लेखकानीं मराठी वाचकाचें जर कोणतें नुकसान केलें असेल तर त्याच्या बुद्धीला 'अग्निमाद्य' आणलें हें होय! कित्येकदा तर असेंहि आढळून येतें कीं शॉ, वेल्स्, चेस्टर्टन्, रसेल्, किंबहुना कार्ल मार्क्स्, स्पेंग्लर्, मिल्, स्पेन्सर याच्यासारख्या बौद्धिक मल्लाचें पिळदार गद्य मिटक्या मारीत वाचणारे वाचकहि राजवाडे, केतकर याच्या गहन विषयावरील ग्रंथातील गद्य वाचताना ठसका लागल्याची तक्रार करतात. वस्तुतः त्यानीं मराठी गद्याला धीरगंभीर स्वरूप देणाऱ्या या विचारवीरांचें भाषाशैलीबद्दलहि अभिनंदन करावयाला हवें. पण या वीराच्या वाट्याला मात्र 'विचार

आहेत पण शैली नाहीं' किंवा असल्यास 'दुर्बोध आहे' हा शेरा अद्याप तरी ठरल्यासारखा दिसतो! वाचकात वाढीस लागलेल्या वैचारिक अग्निमांद्यामुळें सुबोध शैली व दुर्बोध शैली याच्यासबधीं मराठींत काहीं विपरीत कल्पना प्रसृत झाल्या आहेत टिळक, केतकर, राजवाडे याच्या-सारख्या प्रख्यात विचाराग्रणींनाहि आकर्षक शैली नाहीं हें मत रूढ झाल्यावर, त्याचीच प्रक्षोभक परंपरा पुढें चालविणाऱ्या आजच्या पिढींतील लेखकावर शैली नसल्याचा आरोप अधिकच होणार हें सागावयास नकोच.

## क्लिष्टता,— नव्हे घनता

भाषेचा दुर्बोधता किंवा अधिक सशास्त्र शब्द वापरावयाचा म्हटल्यास भाषेची 'घनता' लेखकाइतकीच विषयावरहि अवलबून असते. याचे एक अगदीं अलिकडचें व मनोरंजक उदाहरण येथें दिल्यावाचून राहवत नाहीं. संगीतासारख्या शास्त्रीय विषयावर अत्यत सुबोध, प्रसन्न व लोकप्रिय भाषेंत लिहिणाऱ्या लेखकात श्री. गोविंदराव टेंबे याना अग्रस्थान आहे हें सर्वमान्य होईल. नुकत्याच प्रकाशित झालेल्या त्याच्या "कल्पनासगीत" या अगदीं अलीकडच्या ग्रथाचे फॉर्म्स वाचीत असता, शास्त्रीय विषय अत्यंत सुगम केल्याचा जसा प्रत्यय येतो, तसाच काहीं ठिकाणीं जणू स्वतः राजवाडे किंवा केतकरच एखादें गहन शास्त्रीय तत्त्व एकेका चिरेबंदी वाक्यात आटोपीत आहेत कीं काय असाहि भास होतो, असें प्रस्तुत लेखकास आढळून आलें. पण अर्थात् हा त्या विषयाचा प्रभाव होय. आणि सुज्ञ वाचक अशा अवघड वाक्यातहि लेखकानें अवघड विषय सोपा करण्याचेंच कसब दाखविलें आहे, हें कबूल केल्याशिवाय राहणार नाहींत.

मोठमोठाले विचाराग्रणी व तत्त्ववेत्ते भाषेमध्यें नवीन शैलीच केवळ नव्हे तर नवी 'क्षमता'च उत्पन्न करतात. आणि तरी त्याच्या लिखाणाचें महत्त्व वाङ्मयीन नसून वैचारिकच असतें, हेंहि खोटें नाहीं. डॉ. केतकर, राजवाडेद्वय, टिळक या प्रत्येकाला शैली म्हणून वेगळी असली, तरी त्याच्या वाङ्मयाचें महत्त्व विचारक्रातीच्या दृष्टीनेंच अधिक आहे. लोकमान्य

टिळक सामाजिक क्षेत्रात क्रातिविरोधी असले, तरी दुर्बल आणि हतबुद्ध समाजात प्रतिकाराची रग उत्पन्न करण्याचें कार्य त्याच्या कणखर विचार-सरणीनें व रगेल भाषाशैलीनें केलें यात शका नाहीं. इतिहासाचार्य राजवाडे याच्या वाङ्मयानें ऐतिहासिक घटना व व्यक्ति याच्याकडे कठोर दृष्टीनें पाहण्याची, आत्मनिष्ठुरता आमच्या लेखकाना शिकवून, सवग आणि आत्म-सतुष्ट देशाभिमानपरपरेला 'लोकहितवादी'प्रमाणेंच अप्रिय धक्के दिले. भाष्यकार आहिताग्नि राजवाडे यानीं अनेक शास्त्राना त्याच्या पोटापुरत्या मर्यादेच्या बाहेर खेचून त्या सर्वांच्या पार्श्वभागीं असलेल्या अध्यात्मतत्त्वापर्यंत नेऊन पोंचविलें. याच राष्ट्रीय दिग्गजाच्या मालिकेंत कौस्तुभमण्याप्रमाणें शोभणाऱ्या ज्ञानकोशकारानीं आपल्या प्रचंड वाङ्मयानें महाराष्ट्रास कोणता सदेश दिला, हें पाहणें जरूर आहे.

## ज्ञानकोशकार केतकरांचा संदेश

अस्सल राष्ट्रीयत्व आणि अस्सल आधुनिक बाणा या दोन गोष्टींत विरोध नाहीं, हें सत्य केतकरसप्रदायी वाङ्मयाच्या अभ्यासकास पटेल; इतकेंच नव्हे तर तें त्याच्या रोमरोमात भिनेल. केतकरसप्रदायाच्या पूर्वीचे नेते एक राष्ट्रीय तरी असत, नाहींतर प्रागतिक ऊर्फ पाश्चात्या-नुयायी तरी असत. आगरकरासारख्याचा अपवाद अशा प्रकरणीं दाख-विण्यात येतो. तथापि केवळ सुधारणेला तयार असणें म्हणजे खरेंखुरें आधुनिक होणें नव्हे. आणि केवळ पूर्वजाचा अभिमान बाळगणें म्हणजे प्राचीन संस्थाचें शास्त्रशुद्ध आकलन नव्हे. प्राचीन भारतीय सस्कृतीचे सखोल आकलन आणि अर्वाचीन पाश्चात्य जगाच्या विविध प्रवाहाचें मार्मिक ज्ञान या दोहोंखेरीज खराखुरा देशभक्तहि निर्माण होणें शक्य नाहीं, कीं खराखुरा सुधारकहि निर्माण होणें शक्य नाहीं. लोकमान्य टिळकासारख्या कुशाग्र बुद्धिमत्तेच्या व अचूक अतःप्रेरणेच्या नेत्याची गोष्ट सोडली, तर बाकी बहुतेक देशभक्त व सुधारक एकागी, अशास्त्रीय आणि अकरणात्मक विचारसरणींनें ग्रस्त होते असें दिसून येईल. 'सुधारणा' करणें म्हणजे ज्या प्राचीन समाजसस्था कळल्याच नाहींत, त्याच्याशीं आदळआपट

करणें, 'देशभक्ति' म्हणजे स्वजनाच्या उघड ऐतिहासिक दोषाबाबत अंधत्व पत्करणें; आणि 'राजकीय क्रांति' म्हणजे परकीय सत्तेविरुद्ध ज्वलजहाल अथवा औपरोधिक लिहिणें एवढाच अर्थ टिळक-सावरकरासारखे अपवादभूत पुढारी सोडल्यास दिसून आला असता. "या प्राचीन देशात राष्ट्राभिमानी म्हणून कार्य करण्यास शास्त्रीय दृष्टि सोडण्याची आवश्यकता नाहीं, व आत्यंतिक समाजसुधारणा पुरस्कारतानाहि आगरकराप्रमाणें नास्तिक किंवा धर्मविरोधी होण्याची आवश्यकता नाहीं." हें या देशात दोनच पुरुषानीं अत्यंत प्रभावीपणें पुकारलें एक स्वामी विवेकानंद व दुसरे डॉ. केतकर. स्वामी विवेकानंद यास प्रसिद्ध फ्रेंच विचारवंत रोमॉ-रोलॉ यांच्यासारख्या सूक्ष्मदर्शी तत्त्ववेत्त्यानीं भारतीय राष्ट्रवादाचे खरेखुरे जनक ठरविलें आहे. त्याच्या विचारात उत्कट धर्माभिमान, ओजस्वी देशाभिमान व निर्भय सुधारणावाद आढळेल. तथापि सन्यासासारखा आत्यंतिक त्यागमार्ग आणि अद्वैतासारखा अतिपरिचित परंतु दुःसाध्य वेदान्त याच्यामुळें या देशभक्त-शंकराचार्यांचा संदेश सामान्य मनुष्याच्या डोक्यावरून निघून जातो. आजचें युग—काहीं अपवादात्मक थोर मनें सोडल्यास—धर्मनिरपेक्ष पुरुषार्थाचें व ऐहिक ध्येयवादाचें आहे अशा तऱ्हेचा सर्वथैव ऐहिकपर, संपूर्ण स्वदेशी, आणि सर्वस्वी आधुनिक असा पुरुषार्थ-मार्ग, पांडित्य व आशावाद याच्या आवेशानें सांगणें, हें केतकराचें अपूर्व कार्य होय! आपल्या धर्मशास्त्रज्ञाचाहि उपयोग केतकर सामाजिक पुर्नघटनेकरिता करतात; निर्भेळ देशप्रेमामुळेंच ते स्वजनाचे दोषहि निर्भयपणें सांगतात, आणि खरीखुरी आधुनिकता पचविल्यामुळेंच ते उथळ पाश्चात्यानुकरणावर जागोजाग कोरडे ओढतात!

आजचा काळ संशयवादाचा आणि सार्वत्रिक अश्रद्धेचा (Cynicism)चा आहे. गांधीवादासारख्या शंभरटक्के उदारमतवादी आणि ध्येयवादी श्रद्धेला दोन तपें खेळवल्यानंतरहि या देशातील तरुण पिढी श्रद्धाशून्यता, जडवाद व पोटभरू उपयुक्ततावाद याच्या आहारीं जात आहे. नव्यात नवें पाश्चात्य राजकीय मत अथवा 'इझम्' आणि जास्तींतजास्त भडक नवनीतिवाद याच्याखेरीज कोणतीच प्रणाली हातात घेण्यास

या पिढीस उमेद राहिलेली नाहीं. अशा स्थितींत याच देशांतील एका महापंडितानें ऐहिक पुरुषार्थपर व इतिहासनिष्ठ असें राष्ट्रीय तत्त्वज्ञान व तंत्र सांगण्याकरिता संपूर्ण ज्ञानकोश निर्माण केला, ही वार्ता आमच्यातील बुद्धिमान् व निकोप तरुणांच्या कानीं जाणें जरूर आहे. ज्ञानकोश म्हणजे अगदीं क्वचित् प्रसंगीं उघडण्याची एक वस्तु आहे, अथवा केवळ पंडिताकरता असलेला एक कोश आहे, या पलीकडे सर्वसामान्य तरुणांना ज्ञानकोशाची अगर ज्ञानकोशसंप्रदायाची अधिक माहिती नसते. आणि केतकरांनीं ‘ कोशयुग सुरू केलें ’ याहून अधिक श्रेय केतकरास देण्यास तर कित्येक विद्वानहि तयार नाहींत !

वस्तुस्थिति अशी आहे कीं, राष्ट्रवाद आणि समाजसुधारणावाद यांच्या प्राथमिक म्हणजेच केवळ भावनाधिष्ठित अवस्थाची उपयुक्तता मागेंच संपली आहे. तथापि त्यांची शास्त्रशुद्ध अवस्था येण्याऐवजीं काहीं नव्याच पाश्चात्य प्रणालींनीं या देशात प्रवेश केला या देशाच्या इतिहासाचें व सामाजिक संस्थांचें स्वतंत्र संशोधन करून त्यावर बसविलेल्या प्रणालीऐवजीं आयत्या विलायती प्रणाली वापरण्याचा परिणाम बौद्धिक दास्य हा होय. हें बौद्धिक दास्य टाळावयाचें असल्यास संशोधन, कर्तृत्व, कल्पकता, आधुनिकता व देशप्रेम यांचा मिलाफ झाला पाहिजे. आंधळा देशाभिमान हा आंधळ्या आधुनिकतेइतकाच घातुक होय. डोळस आधुनिकता व डोळस देशाभिमान यांचा संप्रदाय म्हणजेच केतकर–संप्रदाय असेंहि एका अर्थानें म्हणता येईल. तथापि केतकरांचा देशाभिमान व देशोद्धार यांना केवळ विद्वत्तेनेंच डोळसपणा दिलेला नव्हता, तर कल्पकता, जन्मजात आशावाद व निकोप विनोदबुद्धि यांनीं डोळसपणा दिला होता. या डोळस राष्ट्रवादाचा अभ्यास व अवलंब करणाऱ्या तरुण पिढीस कोणत्याहि ‘ इझम् ’चा ऊर्फ पाश्चात्य प्रणालीचा अवलंब करावा लागणार नाहीं असें बिनधोकपणें म्हणता येईल.

अडचण एवढीच आहे कीं, इंग्रजींत ज्याला Misnomer किंवा ‘ विपरीत संज्ञा ’ म्हणतात, तशा संज्ञेमुळें केतकरांचें वाङ्मय राष्ट्रकार्योत्सुक तरुणांच्या पायवाटेपासून दूर पडलें आहे ! सर्वसामान्य लोक ‘ ज्ञानकोश ’

या सज्ञेमुळेंच बिचकून त्यांच्या वाटेस जात नाहींत आणि केतकर यांचे स्फुट लेख किंवा कादंबऱ्या ज्ञानकोश-संप्रदायीच आहेत असा लौकिक आहे! पण आधुनिक काळातील कोणत्याहि राष्ट्रीय कर्तृत्वास प्रथम ज्ञानाची गरज आहे व "राष्ट्रीय कर्तृत्वास उपयोगी अशा ज्ञानाचा आम्हीं कारखाना काढला आहे" हा तर ज्ञानकोशकाराचा बाणा! संशोधकाचें क्षेत्र वेगळें आणि चळवळ्या लोकांचे क्षेत्र वेगळें; देशभक्ताचें क्षेत्र वेगळें आणि समाजसेवकाचें क्षेत्र वेगळें; या कल्पना बदलून टाकण्याकरिताच केतकरांचा सर्व खटाटोप होता. ज्ञानकोश, भारतीय समाजशास्त्र, जातिभेदाचा इतिहास (इंग्रजी), निःशस्त्राचें राजकारण, विजयी हिंदुस्थान (इंग्रजी) वगैरे ग्रंथ एकमार्गी संशोधकांकरिता नसून आधुनिक राष्ट्रांच्या स्पर्धेत उभ्या असलेल्या आपल्या या प्राचीन मातृभूमीच्या उद्धारकार्यांत आवेशानें शिरू इच्छिणाऱ्या महत्त्वाकांक्षी तरुणांकरिताच आहेत हें वाचकांना पटल्यावाचून राहणार नाहीं

केतकरांच्या तत्त्वज्ञानाचें, संप्रदायाचें व शैलीचें ईषद्-दर्शन आजच्या तरुण अभ्यासकांना एका आटोपशीर संग्रहाच्याद्वारें करवावें हाच हेतु हा संग्रह तयार करण्यास प्रेरक झाला आहे. आजचे तरुण-तरुणी केवळ कथा-वाङ्मय तरी हातीं घेतात, नाहींतर दुर्बल, भावनाविवश व भाबडें बोधवाङ्मय तरी हातीं घेतात, ही कल्पना तितकीशी खरी नाहीं. आणि ती अंशतः खरी असेलच तर त्या स्थितीची जबाबदारी शिक्षक, संपादक व टीकाकार यांच्याकडेच येते हें आपण कबूल केलें पाहिजे. ज्या गोष्टी आपल्याकडून नावाजल्या जातात, निवडल्या जातात त्याच गोष्टी तरुण वाचकांच्या डोळ्यापुढें सदैव राहणार. डॉ. केतकर यांचें तर्कशुद्ध, स्फूर्तिदायक व राष्ट्रवादी वाङ्मय आजच्या तरुणांच्यापुढें निवडून ठेवल्यानें एका मोठ्या व निकोप विचारक्षेत्राचा दरवाजा त्यांना उघडून दिल्यासारखें होईल.

१६।७।५५
तुकाराम आश्रम, टिळकवाडी,
पुणें २.

श्रीकृष्ण के. क्षीरसागर

१

# माझ्या आयुष्याला वक्रगति

माझे आयुष्य इतर व्यक्तींच्या आयुष्यापेक्षा निराळे का बरें झालें ? हा प्रश्न मी आपल्याला विचारतो तेव्हा अनेक गोष्टी मनात येतात.

मी आपल्या आणि आपल्या परिचिताच्या, त्याचप्रमाणे देशातील प्रसिद्ध व्यक्तींच्या आयुष्यक्रमाविषयीं विचार करतों, तेव्हा मनुष्यप्राणी बऱ्याच अशीं देवाच्या हातातील एक खेळणे आहे, आणि आपलें भवितव्य ठरविण्याची प्रत्येकास मोकळीक नसते, प्रत्येकाचें भवितव्य काहीं नियमानीं बाधलें गेले असतें असे वाटू लागतें. त्याची थोडीशी कारणमीमासा मागे केलीच आहे. प्रत्येक व्यक्तीचा आयुष्यक्रम काहीं अशीं ठरल्यासारखा असतो. जो सुशिक्षित मनुष्य एल्.एल्. बी. होतो तो वकिली करणार, किंवा नोकरी करणार, जो बी. ए. होतो तो शिक्षक होणार किंवा दुसरी कसली तरी नोकरी करणार. नोकरी पाहताना होता होईतों मनुष्य सरकारी नोकरीच पाहणार. या प्रकारच्या नियमानीं प्रत्येक सुशिक्षिताचा आयुष्यक्रम बाधला गेला आहे. शिक्षण घ्यावयाचे ते कोठे घ्यावयाचें हे, सरकार कोणत्या शिक्षणाला काय किंमत देते या विषयींच्या सरकारी दृष्टीवरून ठरत असते. इंग्लंडच्या पदव्याना सरकार मान देते त्यामुळें इतर देशात अभ्यासास जाण्याची प्रवृत्ति कमी आहे. प्रत्येक मनुष्य पोटार्थी असल्यामुळे भलताच शिक्षणक्रम एकाएकीं घेत नाहीं शिवाय विद्यार्थ्यांच्या मनात जरी एखादा आपल्या आवडीचा शिक्षणक्रम आला तरी त्याला पैसा पुरवणारे आईबाप त्याला तो घेऊ देणार नाहींत. त्याना जो शिक्षणक्रम फायदेशीर वाटेल तिकडेच ते पैसा घालतील पुष्कळदा मुलाच्या घरातील वडील माणसे कर्ज काढून मुलाचें शिक्षण पुरें करीत असतात. हें सर्व त्या शिक्षणापासून पुढें आर्थिक फायदा होणार आहे याकडे दृष्टि ठेवूनच करीत असतात. ते आपला पैसा गैर-

किफायतीच्या शिक्षणाकडे कशाला घालतील ? आईबापाचे शिक्षणविषयक विचार अर्थात् त्याच्या अनुभवावरूनच ठरत असतात. जे लोक पुढे आले किंवा पैसेवाले झाले ते कसे झाले याविषयीं विचार करून तिकडे आपल्या मुलास जाण्यास संधि देतात. ज्या मार्गानें गेलें असता भवितव्य अनिश्चित आहे तिकडे जाऊ देण्यास कोणीहि आपल्या मुलास उत्तेजन देणार नाहीं. मुलीनें गैरकिफायतीचें लग्न करू नये म्हणून अशी आईबापे काळजी घेतात, तितकीच किंवा त्यापेक्षा अधिक काळजी कोणते शिक्षण मुलाने घ्यावे याविषयीं घेतात, आणि विशिष्ट प्रकारच्या आयुष्यक्रमाची आवड आणि व्यवहारदृष्टि याचें म्हणजे " अर्थ " आणि " काम " याचे द्वैत मुलाच्या शिक्षणाच्या बाबतींत आणि मुलाच्या लग्नाच्या बाबतींत सर्व जगभर एकसारखे चालू आहे. शिक्षण देतानाच आयुष्यक्रम ठरविण्याकडे प्रयत्न होतो. किंबहुना भावी आयुष्यक्रम ठरवूनच शिक्षणाची दिशा आखण्यात येते

माझा आयुष्यक्रम ठरविण्याचा प्रयत्न आमच्या वडिलाकडून आणि चुलत्याकडून झाला नाहीं असे नाहीं. आय सी.एस्. व्हावे ही माझ्या वडिलाची इच्छा होती. डॉक्टर व्हावे ही चुलत्याची इच्छा होती. आणि ग्रंथकार व्हावें ही मात्र कोणाचीच इच्छा नव्हती. त्याच्या महत्त्वाकांक्षी इच्छामुळें माझें बालपण कसे बिघडले तो एक निराळाच वृत्तान्त आहे. तो सागण्याचे येथे कारण नाहीं. जे शिकलो तेच शिकावयाचा माझा संकल्प होता असेहि नाहीं अमेरिकेकडे शिक्षणार्थ जाणाऱ्या तरुणाच्या पहिल्या पिढींपैकीं डॉ. शिलोत्री आणि मी होतों, त्या अर्थी आमच्या दोघाचे पाय तिकडे वळले कसे, ठराविक प्रकारच्या आयुष्यक्रमातून निराळा आयुष्यक्रम घेण्याची बुद्धि सुचली कशी इत्यादि गोष्टींची मीमासा केल्याशिवाय आयुष्याला आलेलें स्वरूप कसे आहे हें स्पष्ट होणार नाहीं माझे वडील लहानपणींच वारले. त्यामुळें पैसा थोडकाच होता आणि त्यामुळें इंग्लडला आय. सी. एस्.साठीं पाठविण्याचे विचार जागच्या जागीं राहिले. आणि हिंदुस्थानातील शिक्षणानें जो आयुष्यक्रम आचरिता येईल तोच आचरावा एवढेंच ध्येय काय तें माझ्या चुलत्याच्या पुढें होतें. त्याच्यापाशीं माझ्या परदेशी शिक्षणाला पैसे नव्हते असें नाहीं.

माझ्या वडिलांच्या पुंजीपैकीं पैसे थोडे होते आणि त्यामुळेच मला इंग्लंडला पाठविण्याची योजना डोळ्यासमोर कोणीहि ठेवली नव्हती

माझे वडील वारल्यानंतर मी उमरावतीला राहत होतों. आणि वडिलांच्या पूर्वार्जितावरच आमचे कौटुंबिक व्यवहार चालले होते आणि जर आमच्या वडील बंधूंना कॉलेजच्या परीक्षांत—यश येत गेलें असते, तर कदाचित् माझ्या आयुष्याला ठराविक दिशा लावण्याचा प्रयत्न देखील झाला असता. तथापि त्यांना कॉलेजांत अपयशच येत गेलें आणि सहा वर्षांत त्यांची इंटरमीजिएटची परीक्षा पास झाली, एवढेच रा श्रीपाद बळवंत तांबे, प्रो. चाफेकर, डॉ. रघुनाथराव परांजपे वगैरे मंडळी त्यांच्या-बरोबर केव्हां तरी होती त्यांच्याकरतां ठेवलेले, सहा वर्षे शिक्षणाकरितां राखलेले, पैसे संपल्यानंतर त्यांना नोकरी करावी लागली आणि पुढे ते अलाहाबादकडची पहिली एम् ए पास झाले ते नोकरी करतांना अभ्यास करून पास झाले. त्यांना आलेल्या अपयशामुळे त्यांच्या मनांत माझ्या-विषयीं कोणत्याहि तऱ्हेची महत्त्वाकांक्षा वसत नव्हती बंधु उमरावतीला क्वचित् असत. मी आणि माझी आई अशीं दोघेच अनेक वर्षे राहत होतों. आमचे चुलते वकील होते, पण त्यांचे बिऱ्हाड निराळें असे येणेंप्रमाणें परिस्थिति असतां मी हायस्कुलांत असतांना ज्या मंडळींचा आयुष्यक्रम माझ्याप्रमाणेंच इतरांपेक्षां जरा निराळा झाला, अशांपैकीं एक व्यक्ति म्हटली म्हणजे वीर वामनराव होत त्यांच्या आयुष्यक्रमाच्या निराळेपणाचें कारण काहीं अशीं माझ्यासारखेंच असावें असें वाटतें. त्यांचा आयुष्यक्रम त्यांचे वडील गोपाळशास्त्री हयात होते तोंपर्यंत अगदीं सरळ होता. आणि गोपाळशास्त्री वारल्यानंतर त्याला फाट्या फुटल्या वामनरावांची आई माझ्या आईला भेटावयास कधीं कधीं येत असे. दोघींची ओळख कोंकणां-तील होती, आमच्यामुळें नव्हती. गोपाळशास्त्र्याचें उमरावतीस दहीं-साथींत पुस्तकाचें व स्टेशनरीचे दुकान होतें. त्या दुकानावर त्यांचा निर्वाह चाले. गोपाळशास्त्री वारले तेव्हां वामनराव त्या दुकानावर बसूं लागले आणि शाळेंत जाण्याच्या बाबतींत कानाडोळा करूं लागले. त्यांच्या आईनें परोपरीनें सांगून पाहिलें; पण फारसा उपयोग झाला नाहीं. त्याच सुमारास उमरावतीला प्रायव्हेट हायस्कूल निघालें. तेव्हां वामनराव सरकारी शाळा

सोडून तिकडे गेले सरकारी शाळा सोडून खाजगी शाळेत जाण्याचें कारण बहुधा नापास झालेल्या विद्यार्थ्याला वरच्या वर्गात घेत असत हें होते. वामनरावांनीं सरकारी शाळा सोडली ती नापास होऊन वरच्या वर्गात जाऊन बसण्यासाठीं सोडली नाहीं, तर मुखामुखी सोडली त्या शाळेंतूनच ते मॅट्रिक झाले. हुशार विद्यार्थी असल्यामुळें खासगी शाळेत असता देखील ते पास झाले. त्याच्या पास होण्याबद्दल कोणाला आश्चर्य वाटले नाहीं. वामनराव, बाळकृष्ण संतुराम गडकरी, यशवंत खुशाल देशपांडे, आणि मी, असे त्यावेळचे हायस्कुलातील वाङ्मयाची अभिरुचि असलेले विद्यार्थी समजलो जात होतो त्यातल्या त्यात वामनराव आणि मी स्पर्धमान व्यक्ति म्हणून समजले जात होतो. गडकरी माझ्या गोटात होते वामनरावाच्या गोटात पुष्कळच मंडळी होती. ते त्यावेळच्या विद्यार्थ्यांचे अनेक बाबतींत पुढारी होते गडबड करून नाटक बंद पाडावयाचे असो, किंवा दुसरी काहीं भानगड असो, वामनरावाचे त्यात पुढारीपण असावयाचेच. माझ्या कवितेपेक्षा वामनरावाची कविता अधिक चांगली, असे आमच्या सहाध्यायाचे मत होते पण तें मत अज्ञानमूलक आहे असें मी समजत असें. माझी प्रशंसा करणारा वर्गहि होताच.

या सर्व गोष्टी देण्याचे कारण, त्या वेळची हायस्कुलातली वाङ्मयविषयक अभिरुचि वर्णन करावयाची, हे नाहीं तर दोन तीन गोष्टी या आठवणीवरून मनात येतात एक गोष्ट म्हटली म्हणजे घरीं कर्ता पुरुष मुलाच्या आयुष्यक्रमाचे नियमन करावयास नसला म्हणजे मुलाना स्वच्छंदीपणाने वागावयास फावते आणि त्याच्या आयुष्याला निराळें स्वरूप यावयास एक कारण होते. दुसरी एक गोष्ट म्हटली म्हणजे या स्वच्छंदीपणामुळें आणि मिळविलेल्या स्वातंत्र्याने जे काहीं गुणवैशिष्ट्य उत्पन्न होतें त्याची अभिज्ञता सहाध्यायात सहज उत्पन्न होते. त्याशिवाय माझ्याभोंवतीं किंवा वामनरावाच्याभोंवतीं काहीं मंडळी जमली नसती आमच्या घरीं तरी चुलते असल्यामुळे माझ्यावर नियंत्रण होते वामनराव आपल्या वयाच्या चवदाव्या पंधराव्या वर्षीं जवळ जवळ मुखत्यार झाले आणि त्यामुळें स्वैरपणा म्हणा, स्वतंत्रपणा म्हणा किंवा स्वच्छंदीपणा म्हणा, त्याची जोपासना व एक प्रकारची निर्भयता त्याच्या ठिकाणीं अगदीं लहानपणापासून आली. तिसरी

एक गोष्ट उल्लेखाविशीं वाटते ती ही, कीं जे त्या वेळचे चार वाङ्मयप्रेमी विद्यार्थी वर उल्लेखिले त्या चारहि मंडळींनीं वाङ्मयक्षेत्रात आपलें अस्तित्व अजूनहि ठेवलें आहे विद्यार्थिदशेंतील वाङ्मयसेवा, त्या वेळच्या स्पर्धा, त्या वेळचा एकमेकाचा मत्सर या गोष्टी अजूनहि आठवतात व निरनिराळ्या व्यक्तीच्या आयुष्यक्रमात जीं वाङ्मयवैशिष्टये दिसून आलीं त्याना प्रारंभ विद्यार्थिदशेतच दिसत होता असें मला वाटते पण त्या गोष्टी येथे सागण्याचें कारण नाहीं. ती एक निराळीच गोष्ट तयार होईल.

इंग्रजी पहिल्या इयत्तेपासून तों मॅट्रिक होईपर्यंत मजकडे पाहणारें कोणींच नव्हते घरात खर्चेहि इतर कुटुंबाच्या मानानें अधिक होत असे आणि त्यामुळे कोणतीहि ददात नव्हती मॅट्रिकपर्यंतचा काळ म्हटला म्हणजे स्वच्छदाने विहार करण्याचा काळ होता असेंच म्हटले तरी चालेल. या काळात शाळेला जावें, तेथे ऐकूं येईल ते पुराण ऐकावें, मराठी पुस्तकें वाचीत बसावें, कविता करावी, देशाभिमानाच्या गोष्टी कराव्यात, असा तो काळ होता

ज्ञानकोशरचनेच्या कार्याला बारा वर्षे लागलीं. त्या क्रियेचा इतिहास स्वतन्त्रपणे अगोदरच प्रसिद्ध केला आहे प्रस्तुत प्रसगीं त्याच्या अगोदरच्या १२ वर्षांचा म्हणजे १९०४ पासून १९१६ पर्यंतचा किंबहुना १९०० पासून १९१२ पर्यंतच्या आयुष्यक्रमाचा वृत्तान्त दिला म्हणजे बऱ्याच मंडळींची जिज्ञासा पुरी होईल ज्ञानकोशरचनेकडे प्रवृत्ति कशी झाली याचे काहीं स्वरूप जरी त्या पुस्तकात आले आहे, तरी एकदर आयुष्य-क्रमास इतराच्या आयुष्यक्रमापेक्षा जे निराळे वळण मिळाले त्याचें कारण वीर वामनरावाप्रमाणें हायस्कूलच्या दिवसात उत्पन्न झाले नसून कॉलेजातील दिवसात उत्पन्न झाले.

परगावीं कॉलेजात असताना जें स्वातंत्र्य असते ते आपल्याच गावात विद्यार्थी असताना नसते. आणि बऱ्याच गोष्टींपासून विद्यार्थी मुक्त असल्यामुळे त्यास अभ्यास करणे किंवा मनास वाटतील त्या गोष्टी करणे याविषयीं स्वातंत्र्य असते. आणि त्यामुळे त्याच्या आयुष्याला जर काहीं निराळे वळण लागणार असले तर तें लागण्यास बऱ्याच लोकाना याच काळात वाव मिळत असावा

इ. स. १९०० मध्यें माझी आई वारली व थोरली बहीणहि त्याच वर्षी वारली. त्यामुळें एक तऱ्हेचे स्वातंत्र्य वाटले आता मला जगभर वाटेल तिकडे भटकावयास हरकत नाहीं असे वाटू लागले आणि अगदीं स्वतंत्र मनाच्या स्थितींत मी कॉलेजमध्ये प्रवेश केला. मी विल्सन कॉलेजात १९०१ पासून १९०५ पर्यंत शिकत होतो त्या कॉलेज-विषयीं आम्हास अभिमान होता असें मुळींच नाहीं कारण खरोखर त्या वेळेस फर्ग्युसन कॉलेजविषयीं आम्हास जो आपलेपणा वाटे तो विल्सन कॉलेजविषयीं वाटत नव्हता येथे कॉलेजात असताना मनोवृत्ति साधारणतः पुढीलप्रमाणे होती प्रोफेसर युरोपियन होते. त्यामुळे युरोपिअन लोका-विषयीं जी भीति वाटत असे ती वाटत नव्हती, आणि कॉलेजच्या चालकाचे एकदर धोरण राष्ट्रीय भावनाच्या विरुद्ध असे त्यामुळे युरोपियन लोकाविषयीं म्हणजे त्याच्या सार्वजनिक बाबतींतील हेतूविषयीं द्वेषबुद्धि उत्पन्न होऊ लागली. जुन्या पेशवाईच्या गोष्टी निघाल्या आणि त्यात "हे ब्राह्मण लोक ब्राह्मणेतराना किंवा सारस्वतासारख्या जातींना देखील बरोबरीनें वागवीत नसत" असे कोणी ब्राह्मणेतर किंवा सारस्वत विद्यार्थ्यानीं म्हटले म्हणजे आमचे प्रिन्सिपॉल मॅकिकन याच्या तोंडावर हास्य चमके. जणू काय इग्रज लोक इतर लोकाना बरोबरीच्या नात्याने वागवावयास तयार होते! एवढेच नव्हे तर पेशवे घराण्याविषयी तुच्छतेचे उद्गार कोणी काढले तर त्याबद्दल डॉ मॅकिकनसाहेबाना आनद होई 'गगाबाई ही चागल्या वर्तणुकीची नमून तिचा आणि नाना फडणविसाचा वाईट सबध होता' असे म्हणणाऱ्या मडळींत देखील जातिभावना दिसून येई प्रभु, सारस्वत व काहीं कऱ्हाडे ही मडळी त्या किंवदतीवर विश्वास दाखवी तर त्या विधानाने कोकणस्थ चिडून जात. आणि या विषयावर भाडणे डिबेटिंग क्लबात सुरू झालीं, तर डॉ. मॅकिकन अगदीं खूष होऊन जात. इपीरिॲलिझम् म्हणजे काय हें कोणासहि ठाऊक नाहीं तरी मॅकिकनला इपीरिॲलिस्ट समजत असत. आणि जी नीति लॉर्ड कर्झनची होती तिचे मुबई युनिव्हर्सिटींत प्रवर्तक मॅकिकन समजले जात. मॅकिकनचें सामान्यपणें व्यवहारध्येय पुढील-प्रमाणे होतें. इग्रजी भाषेचें प्रभुत्व सर्व देशभर रहावें एवढेंच नव्हे तर सर्व देशी भाषा तिच्याखालीं चिरडल्या जाव्यात आणि देशी भाषाना कॉलेजमध्यें

प्राधान्य मिळू नये म्हणून त्याची खटपट असे. अल्प सख्याकाची फिकीर मॅकिकनला फार वाटत असे. कॉलेजमध्यें जरी महाराष्ट्रीयाचा भरणा अर्ध्याहून अधिक होता तरी मराठी पत्राना, तीं सर्वांस समजत नाहींत म्हणून, बदी होती. डिबेटिंग सोसायटींत मराठी भाषेस मज्जाव होता व मराठी व्याख्याता कॉलेजात आणण्याची बदी होती. सर्व विद्यार्थी मराठी जाणणारे नाहींत हे कारण सागण्यात येत असे. डॉ. मॅकिकन मराठीचा अभिमान दाखवी तो स्वत. मराठीचे परीक्षक होण्यासाठीं होता. जेव्हा मराठींत शुद्धलेखन सुधारणा करण्याचा बूट १९०२-३ च्या सुमारास निघाला तेव्हा मराठीच्या अभिमानी मडळींना ती "सुधारणा" तहकूब करून घेण्याची खटपट मॅकिकनमार्फत करावी लागली. "शुद्धलेखन सुधारणा ऊर्फ सरकारी बडावा" या मथळ्याचा एक लेख प्रो. शकरराव गोखले यानीं 'ग्रथमालें'त लिहिला होता. त्या शुद्धलेखनसुधारणेस बहुतेक सर्व वाङ्मयसेवक विरुद्धच होते. तथापि इग्रज लोकानीं मनात घेतलेले काम हिंदी लोकमत तुच्छ मानून करीत जावें असा सप्रदाय होता. डॉ. भाडारकर एवढेच काय ते महत्त्वाचे महाराष्ट्रीय त्या योजनेस अनुकूल होते. पण डॉ. भाडारकरास मराठी वाङ्मयसेवकात स्थान देणें अप्रयोजकच होईल डॉ. मॅकिकन याच सुमारास परमानद प्राईझच्या निबधाचे परीक्षक होते आणि मी त्या वेळेला निबध पाठविला होता. परतु हे बक्षीस मला मिळालें नाहीं. त्या वेळेस डॉ. मॅकिकनबरोबर दुसरे परीक्षक रा ब. विष्णु मोरेश्वर महाजनी हे होते. त्यानीं जी शिफारस केली तीच पुढें मजूर झाली बक्षीस मला द्यावें अशी त्याची शिफारस नव्हती. पुढें वर्षभराने त्या विषयावर बोलण्याचा प्रसग आला. जबलपूरपासून गोंदियापर्यंत प्रवास करीत असता एका डब्यात आम्ही दोघे सापडलो. तेव्हा अनेक विषयावर बोलणीं झालीं. त्यात हाहि एक विषय होता. परमानद बक्षिसाचा स्पर्ध्यमान निबधाचा विषय "तुकाराम, एकनाथ इत्यादि साधूचें महाराष्ट्रातील कार्य" या प्रकारचा होता. तेव्हा महाजनींनींच माझ्या बोलण्यात आलेल्या विषयावरून "तुम्ही परमानद प्राईझकरता निबध लिहिला होता काय?" म्हणून विचारलें. "होय" म्हणून मी उत्तर दिलें. तो निबध कोठें प्रसिद्ध करणार आहात काय म्हणून विचारलें. तेव्हा "तो ग्रंथमालेनें प्रसिद्धीला

घेतला आहे " असें सांगितलें. तेव्हा ते म्हणाले, " तुम्हाला बक्षिस मिळालें असतें, पण ख्रिस्त आणि तुकाराम यांच्या तुलनेंत तुम्हीं उगाच पडला. " हा निबंध पुढें प्रसिद्ध झालाच नाहीं. मी त्यानंतर अमेरिकेला गेलों. निबंध लवकरच प्रसिद्ध करूं (ग्रंथमालेंत कीं विश्ववृत्तांत?) असें प्रो विजापूरकरांचें पत्रहि आलें होतें. तथापि पुढें विजापूरकरांच्याच कारागृहवासामुळें त्यांचें प्रकाशनच बंद पडलें. आणि तो निबंध पुढे कोठें तरी गेला माझी त्यावेळेस बक्षीसासाठीं शिफारस केली गेली नाहीं, कारण तुकाराम आणि ख्रिस्त यांची तुलना करण्याचा अव्यापारेषु व्यापार मीं केला हें जरी खरें असलें, तरी जोडपरीक्षक मॅक्किकन नसते तर ही तुलना अव्यापारेषु व्यापार आहे असें महाजनींस वाटलेंच असतें असें मला वाटत नाहीं.

२

# ज्ञानकोशाच्या कल्पनेची उत्पत्ति

ज्ञानकोशाच्या कल्पनेचा प्रारंभ माझ्या मनात केव्हा झाला याविषयीं आत्मपरीक्षण करिता असे आठवतें कीं, उमरावतीच्या सिटी लायब्ररीस तेथील एका विद्वान् वकिलानीं (रा. मोरोपंत मराठे ?) 'एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका'ची एक प्रत नजर केली तेव्हांपासून झाला. यावेळेस म्हणजे १८९७ च्या सुमारास हीं पुस्तकें मीं प्रथम पाहिलीं आणि त्यावेळेस त्या ग्रंथाचा उपयोग करून घेण्याइतकें जरी माझें शिक्षण वाढलें नव्हतें तरी त्या ग्रंथाचें स्थूल स्वरूप माझ्या चांगलेंच लक्षात आलें आणि असा ग्रंथ मराठींत असावा असें वाटलें त्याच सुमारास एक मौजेची गोष्ट घडून आली ती अशी: मी हायस्कूलमध्ये असता साधारण बहुश्रुत असा विद्यार्थी आहे अशी माझी प्रसिद्धि झाली होती आणि त्या प्रसिद्धीस कारण म्हटलें म्हणजे आमच्या वर्गाचे मास्तर रा. नारायण वामन थत्ते, बी. ए. (हे पुढे महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचे ग्राहक झाले) यानीं मला कौतुकानें "एन्सायक्लोपीडिया" हें नांव दिलें व त्यामुळे कांहीं स्नेहीमंडळी माझी थट्टा करण्याकरिता मला एन्सायक्लोपीडिया म्हणू लागली होती. या गोष्टीचा माझ्या मनावर प्रेरक परिणाम कितपत झाला असेल हें सांगता येत नाहीं. तथापि आत्मपरीक्षणास सुरवात झाल्यामुळें जी गोष्ट आठवली तिचा येथें उल्लेख केला आहे एवढेंच. एन्सायक्लोपीडियासारखा ग्रंथ मराठींत असावा असें त्यावेळेस मी कांहीं जणापाशीं बोललों होतों हेंहि आठवतें त्यानंतर मी एन्सायक्लोपीडिया अगदीं विसरून गेलों होतों असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. तथापि १९०६ मध्यें म्हणजे प्रथम एन्सायक्लोपीडिया पाहिल्यानंतर ९ वर्षांनीं अमेरिकेंतील कार्नेल युनिव्हर्सिटीमध्यें माझा प्रवेश झाला, आणि त्यावेळेस अनेक एन्सायक्लोपीडिया वारवार चाळण्याचें काम पडलें आणि त्यावेळेस देखील असे ग्रंथ मराठींत नाहींत याचें मला दुःख

होत असे. तथापि कार्नेल युनिव्हर्सिटीमध्यें असतां या प्रकारच्या ग्रंथाची घडवणूक आपणच घ्यावी ही कल्पना मनात उद्‌भवली नाहीं.

इ. स. १९०८ मध्यें दुसरी टर्म हार्वर्ड युनिव्हर्सिटीमध्यें होती. तेथें असता सायक्लोपीडियाविषयीं विचार पुनः आला आणि त्यास कारणेंहि झालीं नेल्सन कपनीनें "लूज लीफ एन्‌सायक्लोपीडिया" काढला होता आणि त्या एन्‌सायक्लोपीडियाचा विक्रय करणारा एक गृहस्थ हार्वर्ड युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांमध्यें गिऱ्हाईकें मिळविण्यासाठीं आला. त्या वेळेस मी एम्. ए झालेला होतों आणि जातिभेदाच्या इतिहासाचा पहिला भाग लिहीत होतों. त्यामुळें सशोधनपद्धतीशीं माझा परिचय झाला होता आणि माझ्यात एखादा लेख अगदीं आजतागायत आहे किंवा नाहीं हें वाङ्मयसूचीसारखे संदर्भ ग्रथ पाहून तपासण्याइतकें ज्ञान उत्पन्न झालें होतें. त्यावेळेस नेल्सन सायक्लोपीडियाच्या कपनीनें अशी जाहिरात दिली होती कीं आमचा एन्‌सायक्लोपीडिया घेतला तर तो मागसलेला कधींच राहणार नाहीं. कारण जसजसे शोध होतील तसतशी आम्ही नवीन पानें छापीत जाऊं आणि जुन्या पानाच्या ऐवजीं तीं पानें घालण्याची संधि वाचकांस देऊ. या कपनीच्या बाण्याचा उच्चार अर्थात् प्रचारकाकडून झाला आणि त्यामुळें मी त्याचे लेख कितपत आजतागायत आहेत त्याची तपासणी त्याच्या देखतच केली. तेव्हा या सायक्लोपीडियातील वैशिष्ट्य खरोखर मजकुराचा आजतागाईतपणा नसून बाधणींत होतें हें माझ्या चागलेंच नजरेस आलें. त्या सायक्लोपीडियांतील प्रत्येक पान स्वतत्र होतें, आणि पाठीला शिवण नव्हती तर प्रत्येक पानास बाजूला मोठालीं भोकें पाडलीं होतीं; तीं भोकें जाडी तार किंवा सळई जाईल अशा बेताचीं होतीं व तीं सर्व पानें सळईने ओंवलीं होतीं, म्हणजे त्यात वाटेल तेव्हा वाटेल तें पान काढून टाकून नवीन पान घालता यावें अशी सोय केली होती. केवळ ह्या सोयी-मुळें ग्रंथ नेहमीं आजतागायत राहील व तो तसा ठेवण्यास ग्रथाचें संपादकमडळ तयार आहे असा भास उत्पन्न होत होता. तथापि जर आपण मजकुराचें परीक्षण करूं लागलों तर असें दिसून येईल कीं बराचसा मजकूर काळजीपूर्वक लिहिला नव्हता. हिंदुस्थानविषयक अनेक लेखांमध्यें इतकें दुर्लक्ष झालें होतें कीं, हे लेख कोणी तरी अगदींच अनधिकारी

माणसानें लिहिले आहेत असें दिसून आल्याशिवाय राहत नसे व त्याप्रमाणेंच मीं अर्थशास्त्रावरील लेखहि पाहिले, तेव्हा कित्येक निनावी लेखकानीं कांहीं तरी कोठला तरी मजकूर घेऊन कसा तरी लेख तयार केला आहे असें वाटे. मला गिऱ्हाईक बनविण्याच्या उद्देशानें जेव्हा तो विक्रेता प्रयत्न करूं लागला तेव्हा मी अनेक दोष दाखवून दिले, आणि त्यामुळें आमच्या इमारतींत राहणाऱ्या पदवीधर विद्यार्थ्यांनीं त्या ग्रथाकडे अनुकूल दृष्टीनें पाहिलें नाहीं. याप्रमाणें त्या विक्रेत्याची निराशा झाल्यावर तो माझ्याकडे आला आणि "तुम्हाला जर लेखकमंडळात घ्यावयाचा कंपनीनें विचार केला तर तुम्ही येण्याचा विचार कराल काय?" अशी त्यानें पृच्छा केली. मीं त्यास आपली समति दर्शविली, व पुढें त्या ग्रथाच्या मुख्य सपादकाकडून तीच पृच्छा करण्यात आली. त्यानतर मी समतीचें उत्तरहि लिहिलें परतु पत्रव्यवहार यापुढें मुळींच केला नाहीं, तथापि या ग्रथाच्या सपादकमडळात आपण जाऊं आणि आपण दोन पैसे मिळवू या अपेक्षेनें आपणास परिचित असलेल्या विषयापैकीं कोणकोणत्या विषयावर नवीन लेख पाहिजेत याचें टाचणहि केलें होतें. पण मुख्य सपादकाकडून माझ्या पत्रास जबाब न आल्यामुळें तें सर्व जागच्या जागींच राहिलें. तथापि चालू मजकूर रद्द करून आणि नवीन मजकूर करण्याचें कत्राट मिळवावें या अपेक्षेनें त्या ग्रंथातील काहीं भागाचें बारीक परीक्षण मात्र झालें यात शंका नाहीं.

हार्वर्ड युनिव्हर्सिटीमध्यें असता कोशरचनेच्या कृतींशीं मला परिचित करणारी याशिवाय दुसरी गोष्ट घडून आली ती अशीः—वेब्स्टरच्या मोठ्या शब्दकोशाचे त्यावेळचे सपादक डॉ. लॉंग यानीं ही डिक्शनरी आम्ही कशी सपादित आहों आणि जॉन्सनच्या काळापासून कोश करणारानीं काय काय खटपटी केल्या इत्यादि विषयावर हार्वर्ड युनिव्हर्सिटीच्या विद्यार्थ्यांपुढें एक व्याख्यान दिलें.

तें व्याख्यान रात्रीं साडे आठ वाजता सुरू झालें आणि प्रश्नोत्तरें होत होत कार्यक्रम १०॥ ला संपला, तेव्हां डॉ. लॉंग यास मी आपल्याच खोलींत येऊन निजण्यास आमंत्रण केलें, आणि दूर जाण्याच्याऐवजीं जवळच्याच ठिकाणीं तशी सोय झाली तर बरी असें वाटून तें त्यांनीं

पत्करलें. आम्ही दोघे जण माझ्या खोलीत आल्यानंतर आम्ही कॉफी केली आणि रात्रीं दोन वाजेपर्यंत गप्पा मारीत बसलों. तेव्हा त्यानीं डिक्शनरीच्या धद्यातील बऱ्याच मौजा सांगितल्या आणि ऑफिसच्या अंतर्व्यवस्थेची माहितीहि सांगितली. त्यावेळेस त्यानीं मला विचारलें कीं "तुम्ही इतकी खोदखोदून माहिती का विचारता? तुम्हाला शब्दकोश करावयाचा आहे काय?" तेव्हा मीं त्यास असें सांगितलेलें आठवतें कीं "हिंदुस्थानातील कोणत्याहि भाषेस शब्दकोशापेक्षा एन्सायक्लोपीडिआची जास्त आवश्यकता आहे आणि नंतर शब्दकोशाचा काल येईल. अगोदर भाषेंत सर्व प्रकारचें लिखाण तयार व्हावें आणि नंतर त्यांत आलेले शब्द निवडले जावे हा कार्यक्रम भाषेची प्रगति साधण्याच्या दृष्टीने योग्य होईल." हें गप्पाचें साल १९०९ होतें

इ. स. १९०९ च्या सप्टेंबर महिन्यात जातिभेदाच्या इतिहासाचा पहिला भाग छापला, आणि ऑक्टोबरमध्यें कार्नेल युनिव्हर्सिटींत परत गेलों. संशोधनपद्धतीशीं परिचय जातिभेदाच्या इतिहासाचा पहिला भाग तयार केला त्यामुळे बराच झाला होता, आणि आपण समाजशास्त्रीय, शासनशास्त्रीय आणि अर्थशास्त्रीय संशोधन चांगल्या प्रकारे करूं असा आत्मविश्वास, आतापर्यंत प्रोफेसराच्या आदेशानें जे अनेक निबंध लिहिले, त्यामुळें उत्पन्न झाला होता. तथापि याच सुमारास मीं एक जिआलॉजीवर पुस्तक वाचलें. तेव्हा भूस्तरशास्त्रास लागू पडणारे अनेक नियम सामाजिक घडामोडींचें स्पष्टीकरण करण्यासहि कसे लागू पडतात व ते समाजशास्त्रज्ञानीं कसे दाखवून दिले नाहींत हें मनास पटलें आणि यानंतर असें वाटलें कीं सामाजिक शास्त्राच्या अनेक शाखाविषयीं आपण स्वतःच्या परिश्रमानें अभ्यास करावयास समर्थ आहों; तर आपणास जर खरे समाजशास्त्री बनावयाचें असेल तर केवळ समाजशास्त्रावरील पुस्तकें वाचीत बसण्यांत काय अर्थ आहे? त्या पुस्तकाचे लेखकहि मला अर्धवट लोक आहेत असें भासू लागलें. त्यांचीं पुस्तकें वाचण्यापेक्षा अनेक शास्त्रांचें प्राथमिक ज्ञान मिळविलें तर तें अधिक उपयुक्त होईल. या प्रकारच्या कल्पना मनात येऊन समाजशास्त्र व शासनशास्त्र यांच्या प्रोफेसराच्या [illegible]त्याहि व्याख्यानास न जाता भूस्तरशास्त्र, जीविशास्त्र (बायॉलजी), पुस्तकवर्णनशास्त्र (बिब्लि-

ऑग्रफी ), इतिहाससंशोधनशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र इत्यादि विषयावरच्या पहिल्या वर्गांत जाऊन व्याख्याने ऐकत बसलों. कार्नेल युनिव्हर्सिटींत एक नियम असा असे कीं पदवीधर विद्यार्थ्याला त्यानें अमुक वर्गांना हजर राहिलें पाहिजे अशी त्यावर सक्ती नसे, व वाटेल त्या वर्गांत जाऊन बसावयास त्यास मोकळीक असे त्याच्या अभ्यासात त्याला मदत करण्यासाठीं जी कमिटी असते आणि जी पुढे त्याची परीक्षक होते,त्या कमिटीच्या मंडळीचें म्हणणें त्यानें ऐकलेंच पाहिजे असें नाहीं. आणि या नियमाचा फायदा घेऊन मी आपणास वाटतील त्या विषयाच्या (प्रोफेसरास वाटतील त्या विषयाच्या नव्हेत) व्याख्यानास हजर रहात होतों. याबद्दल माझे राजकारणाचे प्रोफेसर डॉ. जे. डब्ल्यू जेंक्स. यानीं माझी कानउघाडणी देखील केली. पण तुमच्या गेल्या वर्षीच्या व्याख्यानास बसून माझा विशेष फायदा झाला नाहीं असें मी त्यास सांगितलें, व त्यास असेंहि सांगितलें कीं तुम्ही जें सांगता तें मला स्वतःच्या अभ्यासानें येईल, पण भूस्तरशास्त्र, प्राणिशास्त्र इत्यादि जीं प्रायोगिक शास्त्रें आहेत त्याचा अभ्यास मला स्वतंत्र रीतीनें करता येणार नाहीं. म्हणून मी त्या विषयाच्या व्याख्यानास जातों. पुढें प्रो. जेंक्स यानीं हा प्रश्न माझ्या कमिटीपुढें काढला आणि त्यावेळेस मला माझ्या पद्धतीनें समाजशास्त्राचा अभ्यास करावयाचा आहे आणि त्या अभ्यासासाठीं या इतर शास्त्राचें ज्ञान अवश्य आहे इत्यादि गोष्टी मी सांगितल्या. माझ्या अभ्यासावर नजर ठेवणाऱ्या कमिटीचे (प्रत्येक विद्यार्थी आपापली कमिटी स्वतः निवडतो) अध्यक्ष प्रो. विलकॉक्स हे होते. त्यानीं माझें म्हणणें ऐकून घेऊन मला जसें वाटत असेल तसें मी करावें असा निकाल दिला. प्रो. विलकॉक्स याचा निकाल महत्त्वाचा होता. कारण माझें मुख्य शास्त्र समाजशास्त्र होतें, राजकारण नव्हतें. त्यामुळें प्रो जेंक्स याना जास्त बोलता येईना. प्रो. विलकॉक्स याची वृत्ति अशी होती कीं, प्रत्येक विद्यार्थ्यानें आपल्या इच्छेप्रमाणें अभ्यास करावा आणि ठेचा खात खात शिकावें; त्यामुळें त्यानीं मला ठेचा खाण्याचें स्वातंत्र्य दिलें आणि मी वाटेल ते विषय अभ्यासू लागलो. परिणाम असा झाला कीं, १९१० सालच्या जून महिन्यात जी माझी पीएच्.डी.ची परीक्षा घेण्यात आली त्या परीक्षेंत मी नापास झालों. पण त्याबरोबर हेंहि कबूल

केलें पाहिजे कीं, या अशा वाटेल तिकडे भटकण्यामुळें मला अनेक विषयाची प्रास्ताविक ओळख होऊन ज्ञानकोशरचनेच्या कार्यास नकळत मी तयार झालों.

१९१० सालीं जून–जुलैमध्यें मला इंटरनॅशनल सायक्लोपीडियाच्या अतर्व्यवस्थेची बरीच माहिती कळली. त्या सालीं मी ज्ञानकोशाचा मागणी उत्पन्न करणारा म्हणून थोडें काम केलें, इंटरनॅशनल सायक्लोपीडियाचे प्रकाशक डॉड मीड आणि क. हे जेव्हा कॅनव्हासर म्हणून मडळींना पाठवीत असत तेव्हा ते अमेरिकेंतील निरनिराळे ज्ञानकोश दाखवीत. आणि त्याबरोबर आपल्या ग्रथाशीं बाजारात स्पर्धा करणाऱ्या दुसऱ्या ज्ञानकोशाच्या उणीवा दाखवीत; आणि आपला ज्ञानकोश इतरापेक्षा उच्च कसा आहे याचें स्पष्टीकरण करीत. गिऱ्हाइकें मिळविणाऱ्या चमूस या सर्व गोष्टींची चागली माहिती असावी यासाठीं त्या कपनीनें एक पुस्तक तयार केलें होतें; तें होतकरू प्रचारकास वाचावयास देत असत; आणि प्रत्येकाकडून गिऱ्हाईक भेटलें म्हणजे बोलणें कसे करावें याविषयींचे ठराविक मंत्र म्हणवून घेत असत त्या मत्रातील अर्थ साधारण येणेप्रमाणें होताः— या एन्सायक्लोपीडियाचीं पाने इतकीं झालीं आहेत, भाग इतके, लेखक असे असे आहेत, लोकमत असें उत्तम आहे, यावर अमक्या लेखकाचे अभिप्राय पहा, तमक्याचे पहा, हा ग्रथ तुम्हाला इतक्या गुणामुळें उपयोगी पडेल, वगैरे गोष्टी होत्या. त्याच्या विक्री करणाऱ्या मडळीमध्यें अगदीं बेताचें शिक्षण झालेल्या मंडळींपासून अनेक प्रोफेसरापर्यंत लोक होते. या डॉड मीड कंपनीचे एन्सायक्लोपीडियाचे गिऱ्हाईकमिळवे तयार करण्याचे वर्ग पाहिले. त्या वर्गांत एक दोन दिवस जाऊन बसलों, त्याचे वशीकरणाचे महामत्र पाठ केले आणि दोन आठवडे कॅन्व्हसिंगचें कामहि केलें. पहिल्या आठवड्यात एकहि गिऱ्हाईक मिळालें नाहीं. राहणीचे व वाहनाचे पैसे फुकट गेले. १२ दिवस सतत मेहनत केल्यानंतर एक गिऱ्हाईक मिळालें व पुढें लागोपाठ तीन गिऱ्हाइकें मिळालीं. पुढें कॅन्व्हासरचें काम सोडून दिलें. पण उपयुक्त अनुभव मात्र मिळाला तो कायमचा झाला. जीं चार गिऱ्हाइकें मिळालीं तीं सर्व गरिबांतील होतीं, आणि त्यावरून असें वाटं

लागलें कीं हप्त्यानें पैसे भरावयाची सोय केल्यास अगदीं गरीब सुशिक्षित मंडळीची ज्ञानकोश घेण्याकडे प्रवृत्ति होईल. इंटरनॅशनल सायक्लोपीडिया-कडे काम करीत असताना जी अत्यंत महत्त्वाची गोष्ट समजली ती गोष्ट हीच होय, असें मी समजतों.

अमेरिकन एन्सायक्लोपीडियाकडे काम करीत असल्यामुळें त्यानीं 'एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका'चे दोष दाखविणारें एक पत्रकहि तयार केलें होतें. त्या पत्रकात त्या कपनीनें असें दाखविलें होतें कीं ब्रिटानिका हा इंग्रज लोकासाठीं इंग्रज दृष्टीनें लिहिलेला ग्रंथ आहे, त्यात अमेरिकेविषयीं माहिती पूर्वग्रहदूषित आणि अपुरी आहे, इग्लडातील सामान्य व्यक्तीस देखील स्थान मिळालें आहे आणि अमेरिकेंतील प्रख्यात मडळीकडे देखील सपादकाचे दुर्लक्ष झालें आहे, तर हा ग्रथ अमेरिकन गरजा पुरविणारा नव्हे आणि त्यातील पूर्वग्रहदूषित दृष्टीमुळें अमेरिकन तरुणापुढें ठेवण्यास हा ग्रंथ निरुपयोगी आहे. ते सर्व मुद्दे खरेच होते, पण इग्लडातील गिऱ्हाईकीकडे लक्ष देऊन जो ग्रथ बनविण्यात आला तो अमेरिकन लोकास उपयुक्त कसा होणार? तथापि स्पर्धा करणाऱ्या ग्रथास अमेरिकन बाजारातून हुसकून लावण्यासाठीं तयार केलेल्या वाङ्मयाच्या वाचनाचा असा उपयोग झाला कीं, प्रत्येक राष्ट्रास निरनिराळया तऱ्हेचा एन्सायक्लो-पीडिया लागतो हें तत्त्व मनास पटले.

इंग्लडमध्यें मीं मे १९११ ते सप्टेंबर १९१२ पर्यंत होतों. तेथें 'अथीनियम्' पत्रामध्यें पुस्तकाचे रिव्ह्यू लिहिण्याचें काम पुष्कळ दिवस केलें व तेथील स्टॅटिस्टिकल असोशिएशन, रॉयल एशिआटिक सोसायटी इत्यादि सस्थाच्या बैठकींत मीं जात असें. त्यामुळें ब्रिटानिकातील अनेक लेखकाच्या गाठी पडल्या. मिसेस केतकर याची ओळख प्रथम इंग्लंडमध्येंच झाली. इंग्लडहून स्वदेशीं आल्यानतर १ जुलै १९१३ पासून १।७।१४ पर्यंत कलकत्ता युनिव्हर्सिटींत पोस्ट ग्रॅज्युएट विद्यार्थ्यांना राजकारण आणि अर्थशास्त्र मी शिकवीत होतों.

१९१४ च्या मे महिन्याच्या शेवटीं कलकत्ता युनिव्हर्सिटीची नोकरी सोडून मी मुंबईस आलों आणि तेथें काहीं दिवस सरदारगृहात राहत

होतों, आणि त्यावेळेस लेखन-संपादनाच्या व्यवसायात आपण पडावें अशी इच्छा होती. यावेळेस देखील मुद्रणाच्या धद्यात पडावें ही इच्छा नव्हती तर आपलें कार्यक्षेत्र लेखन आणि ग्रंथप्रकाशन एवढेंच ठेवावें असें मनात योजिलें होतें प्रकाशनात देखील पुस्तकप्रकाशनाचें व खपविण्याचें काम करण्याचा इरादा नव्हता या वेळेस ज्या मनात अनेक योजना आल्या त्यामध्यें एक इग्रजी व एक मराठी अशीं दोन मासिकें काढावींत ही एक योजना होती. आणि त्यावेळेस तसें मासिक काढावें म्हणून डॉ शिलोत्री याचा आग्रह होता. डॉ. शिलोत्री यानीं हिंदुस्थानकडे येताना एक प्रगमनशील विचाराचें इंग्रजी मासिक काढण्यासाठीं माझें मन वळवावें अशी मनात योजना केली होती. व त्याचे त्यानीं "पायलट" (Pilot) असें नाव मनात योजून ठेवलें होतें. ही इंग्रजी मासिकाची कल्पना मला इतकी पसत नव्हती आणि याचें कारण मासिकामध्यें स्पर्धा काय आहे आणि त्याला काय खर्च लागतो याची माहिती 'मॉडर्न रिव्ह्यू'वरच्या अनुभवावरून बरीच झाली होती. कलकत्त्याला पूर्वीं जे एक वर्ष घालविले होतें त्या वर्षात 'मॉडर्न रिव्ह्यू'चे सपादक रा. रामानद चातर्जी याची चागलीच ओळख झाली, व त्यानीं 'मॉडर्न रिव्ह्यू'ची एकदर कथा सागितली होती, तीवरून मासिक इग्रजींत काढल्यास त्यात किफायत होण्यास किती काळ लागेल याविषयीं बरीच स्पष्ट कल्पना होती.

या महिन्यापासून सप्टेंबरपर्यंत जो काळ गेला त्या काळामध्यें मुंबईहून पुण्यास जाणें येणें चालूच होतें. व बेकार मनुष्य ज्याप्रमाणें मनात अनेक योजना करितो त्याप्रमाणें माझ्या मनाची स्थिति होती. एवढें मात्र निश्चित होतें कीं आपणास जें काम करावयाचें असेल म्हणजे जें आपल्या आवडीचें असेल तेंच करावयाचें. आपल्याा सशोधनशक्तीचा उपयोग पुढील पिढीस करून द्यावा हें कार्य मी मनात योजिलें होतें. पण तसल्या प्रकारचें काम मिळण्याची संधि नव्हती. तसलें काम मिळावयाचें म्हणजे युनिव्हर्सिटी प्रोफेसराची जागा मिळणें. पण हें युनिव्हर्सिटीनें संशोधनविद्येचा प्रचार करावयाचें ठरविलें तरच शक्य होतें, पण तसें काहीं झालें नाहीं. मी स्वतःला जरी युनिव्हर्सिटी प्रोफेसरासारख्या मोठ्या जागेला लायक समजत होतों तरी अधिकारी लोक मला लायक समजत नव्हते.

माझ्या योग्यतेसंबधानें माझें उच्च मत सकारण होतें. १९१४ सालापर्यंत समाजशास्त्रीय, शासनशास्त्रीय, अर्थशास्त्रीय व संशोधनपद्धतीचें शिक्षण देण्याची पद्धत इंग्लंडात सुरू झाली नव्हती आणि त्यामुळें इग्लिश युनिव्हर्सिटयांतून बाहेर पडणारे पदवीधर किंवा तिकडून येणारे इंग्रज शिक्षक माझ्याइतके शिक्षणाचे नव्हते. तथापि इकडील युनिव्हर्सिटयामधून ते इंग्रज असल्यामुळें आणि सशोधनविद्येशीं अपरिचित असल्यामुळें संशोधनाच्या आवश्यकतेचा काल इकडे अजून आला नाहीं असें ते म्हणत आणि त्यांच्या तंत्रानें इतर लोक चालत.

सरकारची अनुदार बुद्धि मला फारशी भोंवली नाहीं. कारण सरकारकडे नोकरीसाठीं मीं अर्जच केलेला नव्हता. उलट मध्यप्रात सरकारची वृत्ति मला नोकरी द्यावी या तऱ्हेची होती आणि याचें कारण वऱ्हाडचे कमिशनर मि. स्टाडेन याची माझ्याविषयीं स्नेहबुद्धि होती हें होय. सरकारची अनुदार वृत्ति भोंवली नाहीं हें खरें. पण आपल्या लोकांची इंग्लंडपूजा मात्र भोंवली. इंग्लंडच्या साध्या पदवीधराची मान्यता माझ्यापेक्षां जास्त आपल्या लोकाकडूनच होई, एवढेंच नव्हे तर माझ्यानंतर आलेल्या ब्रिटिश युनिव्हर्सिटीच्या पदवीधरापेक्षां किंबहुना लडन युनिव्हर्सिटीच्या डी. एस्सी. पेक्षा माझा शिक्षणमूलक अधिकार अधिक आहे अशी माझी भावना; तर अमेरिकन युनिव्हर्सिटीच्या अत्युच्च पदवीधराना देखील ब्रिटिश युनिव्हर्सिट्याच्या सामान्य किंवा अत्यंत कनिष्ठ पदवीधरांपेक्षा कमी समजण्याची सरकारची वृत्ति व तीच बरोबर काहींच माहिती नसलेल्या आपल्या देशी गृहस्थांची वृत्ति असल्यामुळें सरकारी अगर निमसरकारी शिक्षणसंस्थात माझा सौदा न जुळणें स्वाभाविक होतें. या प्रकारच्या कारणामुळें एका ठिकाणीं माझा सौदा जुळला नाहीं.

माझी किंमत मी सभोंवतालच्या हिंदू व इंग्रज शिक्षकापेक्षां अधिक समजत होतों. आणि अंडर-ग्रॅज्युएट विद्यार्थ्यांना पढविण्याचें काम करण्याची माझी तयारी नव्हती, तर फक्त युनिव्हर्सिटीमध्यें पोस्ट-ग्रॅज्युएट विद्यार्थ्यांना शिकविण्याचें काम पतकरण्याचें योजिलें होतें. पण तें काम मिळालें नाहीं. कलकत्त्याला काम केलें, पण तेथें सर अशुतोष मुकर्जींनीं

माझ्याविषयीं लबाडी केली असा माझा समज असल्यामुळें कलकत्त्याखेरीज इतर ठिकाणीं म्हणजे मुंबई, मद्रास व अलाहाबाद येथील युनिव्हर्सिट्यांकडे मीं अर्ज केले होते, व त्यावेळेस तिन्ही ठिकाणीं अर्जांचा निकाल होण्यास बराच वेळ लागून शेवटीं इंग्रज गृहस्थ नेमले गेले. युनिव्हर्सिट्यामध्यें माझ्यापेक्षा जास्त लायकीच्या मडळींचे अर्जच आले नव्हते. तथापि मला त्यापैकीं कोणतीहि जागा मिळण्याचा योगायोग नव्हता. युनिव्हर्सिट्या-कडून तावडतोब निकाल न होता प्रकरण लांबणीवर टाकलें गेलें अर्थात् मला आपल्या भवितव्याचा निकाल तावडतोब करावयाचा होता आणि त्यामुळें युनिव्हर्सिटयाकडून उत्तर काय येतें याची वाट न पाहता मी आपलें भवितव्य स्वतःच ठरविण्याच्या विचारास लागलों. माझी ज्ञानकोशाकडे प्रवृत्ति होण्यास माझी काहीं अंशीं स्वतः पत्करलेली बेकारी कारण झाली असावी असें वाटतें.

# ३

# आपलें बौद्धिक दास्य आणि पाश्चात्य पांडित्य

'महाराष्ट्रीय ज्ञानकोश' हा महाराष्ट्राचें बौद्धिक स्वातंत्र्य स्थापन करण्यासाठीं झालेला प्रयत्न होय. महाराष्ट्राचें बौद्धिक स्वातंत्र्य कसें प्रस्थापित होईल हा विचार करण्यासाठीं बौद्धिक स्वातंत्र्याचा अभाव म्हणजे काय हें समजलें पाहिजे.

जेव्हां मनुष्य स्वतःच्या विचारापेक्षा परक्याच्या मतास अधिक मान देतो तेव्हां त्यास बौद्धिक परावलंबित्व थोडें तरी म्हटलेंच पाहिजे. तथापि समाजात बरेंचसें बौद्धिक परस्परावलंबित्व असतेंच. उदाहरणार्थ, आपण डॉक्टरचा, वकिलाचा किंवा खरेदीविक्रीच्या प्रसंगीं दलालाचा सल्ला घेतों. हा अर्थात् योग्यच प्रकार आहे. तज्ज्ञाकडे जाणें कोणासहि लाञ्छनास्पद नाहीं. आपणास हें बौद्धिक परस्परावलंबित्व नष्ट होऊं द्यावयाचें नाहीं; उलट वृद्धिंगत करावयाचें आहे. समाजातील अनेक व्यवहारतज्ज्ञाच्या सल्ल्यानें चालणें म्हणजे तज्ज्ञांकडून स्वतःस ठकवून घेणें मात्र नव्हे; तर स्वतः कांहीं ज्ञान मिळवूनहि कार्य अधिक योग्य व्हावें म्हणून विशेषज्ञाकडे जाणें होय. समाजांतील परस्परावलंबित्व कायम पाहिजेच; पण एका राष्ट्रास दुसऱ्या राष्ट्रावर अवलंबून राहावें लागावें हें हितावह नाहीं. व्यापारांत काहीं अंशीं परावलंबन प्रत्येक राष्ट्रास भाग आहे. तथापि बौद्धिक बाबतींत परावलंबित्व धोक्याचें व राष्ट्रास कमीपणा आणणारें आहे. त्यातल्या त्यात जें ज्ञान राष्ट्राच्या हिताशीं निकटतेनें संबद्ध आहे त्यांत परावलंबित्व फारच धोक्याचें आहे. उदाहरणार्थ, वेदांत काय आहे, हें आपण इंग्रजास अगर जर्मनास विचारावें आणि त्यानें आपणापुढें पांडित्य करावें, यासारखी खेदाची दुसरी कोणती गोष्ट आहे बरें! पण आज वस्तुस्थिति मात्र तशी आहे, हें मोठ्या खेदानें म्हणावें लागतें. पण येथें नुसतें अश्रू ढाळून काय उपयोग! या परावलंबित्वाची कारणमीमांसा केली पाहिजे.

तर्कशास्त्रात ज्याप्रमाणें साधारण कारणें म्हणजे ईश्वर, काल, दिक् हीं आहेत, पण कारणमीमांसेंत तीं बाजूस ठेवून असाधारण कारणें शोधावयाचीं असतात, त्याप्रमाणें दारिद्य, देशातील उष्ण हवा, या प्रकारच्या अवनतीचीं साधारण कारणें बाजूस ठेवून बौद्धिक दास्याचीं निकट कारणें कोणतीं आहेत, इकडे लक्ष दिलें पाहिजे.

आज आपणास आपल्या देशाविषयींच्या अनेक गोष्टींविषयीं माहिती मिळविण्यासाठीं पाश्चात्य ग्रंथकाराच्या ग्रंथाकडे पहावें लागतें आणि पाश्चात्य भाषा अवगत झाल्याशिवाय किंवा संस्कृत भाषेचें पांडित्य असल्याशिवाय आपणास कोणत्याहि विषयावर माहिती मिळत नाहीं. मृत भाषा सर्वांस समजणें शक्य नाहीं, म्हणून भाषांतरें लागतात. जितक्या संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें इंग्रजी, फ्रेंच किंवा जर्मन या भाषामध्यें झालीं आहेत तितकीं हिंदुस्थानातील कोणत्याहि भाषात नाहींत ! आज पुष्कळास संस्कृत ग्रंथातील अर्थाचें ज्ञान इंग्रजी पुस्तकावरून करून घ्यावें लागतें त्यामुळें परावलंबित्व उत्पन्न होतें.

परावलंबित्वाचें दुसरें कारण असें कीं, पाश्चात्य देशातील सामान्य ठिकाणीं जशीं ग्रंथालयें आहेत तशीं मुंबईस किंवा कलकत्त्यासहि नाहींत. संस्कृत भाषेंत जें ज्ञान आहे त्याचा गोषवारा देणारे, त्यावर ऐतिहासिक विचार प्रदर्शित करणारे, जगाच्या इतिहासात त्याचें स्थान मोजणारे जसे ग्रंथ व लेख पाश्चात्य भाषात आहेत, त्याच्या शतांशहि आपल्याकडे नाहींत त्याच्या बाबतींत परावलंबित्व घालवून देण्याचा प्रश्न येतच नाहीं. एकंदर ज्ञानक्षेत्राविषयीं तर बोलावयासच नको. ज्ञानविषय किती आहे याची कल्पना जेव्हा येईल तेव्हा प्रत्येक विषयावर काय लिहिलें आहे हें जाणण्याची जिज्ञासा उत्पन्न होणार. अनेक विषयासंबंधानें प्राथमिक स्वरूपाचीच माहिती ज्ञानकोशात येईल. यापेक्षा अधिक दिली तर आपल्या वाचकवर्गास पचावयाचीच नाहीं. 'प्राथमिक स्वरूपाची' याचा अर्थ हायस्कुलातील विद्यार्थ्यांस साजेलशी असा मात्र नव्हे. आज अखिल ज्ञानक्षेत्राची कल्पनाहि नाहीं; तर त्यावर ग्रंथ कोठून निर्माण होणार ? अनेक ज्ञानक्षेत्रांशीं निदान ओळख करून देणें ज्ञानकोशाचें कर्तव्य आहे. विस्तृत ज्ञानक्षेत्राकडे दुर्लक्ष

केलें, तरी नेहमीं आपल्या परिचयातील व्यवहाराची माहिती आपणास कितपत असते? नेहमींचे बोलण्याचे विषय असून त्यासबंधीनें माहिती सामान्य सुशिक्षितास कितपत असते, याविषयीं कल्पना ज्याची त्यास, खालील प्रश्नांचीं उत्तरें द्यावयाचा प्रयत्न करावा म्हणजे कळून येईल. हे प्रश्न जितके अगदीं सामान्य शोधून काढता येतलि तितके शोधून घातले आहेत

प्रवर म्हणजे काय? गोत्रें आणि प्रवर याची माहिती कोणत्या ग्रथात आहे? सगोत्र लग्न करण्यास कोणते ग्रथकार समति देतात व कोणते देत नाहींत?

आश्वलायन ही " शाखा " आहे काय?

वैद्यकात " चिकित्सा " म्हणजे काय?

यजुर्वेदाच्या मुख्य मुख्य शाखाची, निदान ज्या शाखाचे ब्राह्मण महाराष्ट्रात आहेत त्याचीं नावें सागावींत.

सामवेदी ब्राह्मण महाराष्ट्रात आहेत काय? अथर्ववेदी ब्राह्मण महाराष्ट्रात आहेत काय? माध्यदिन, काण्व, मैत्रायणीय, चरक, जाबाल या शाखाच्या जशा निरनिराळ्या जाती आहेत, तशा सामवेदी आणि अथर्ववेदी अशा काहीं निरनिराळ्या जाती आहेत कीं, एखाद्या निराळ्या नावाच्या जातींत या वेदाच्या ब्राह्मणाचा अतर्भाव होतो?

जैन व इतर हिंदु याचीं लग्नें होतात काय? शीख व इतर हिंदु याचीं लग्नें होतात काय? ख्रिस्ती व हिंदु याचीं लग्नें कोठें होतात? मुसलमानाच्या मुली करण्यास कोणत्या हिंदूस हरकत नाहीं?

एका जातीचा मनुष्य दुसऱ्या; जातींत जाऊ शकत नाहीं, याला अपवाद कोठें कोठें आहेत?

" मराठे " या नावानें ओळखली जाणारी जात कितपत जुनी आहे?

१६२७ सालीं शिवाजी जन्मला कशावरून?

महाराष्ट्रीय ब्राह्मणामध्यें पुरुष अधिक आहेत कीं बायका अधिक आहेत?

भौतिक शास्त्रें व तज्जन्य कला याच्या बाबतींत आपण केलेली पाश्चात्याची व आपली तुलनाच हास्यास्पद होईल. तथापि आपल्या संस्कृतीच्या अभ्यासाच्या बाबतींत आपण त्याची बरोबरी करू, असा जर आपला भ्रम असेल तर तोहि सोडून दिला पाहिजे. संस्कृत ग्रंथाचा अभ्यास पाश्चात्य पंडित करतात, आणि आज आपल्या देशातील लोकाच्या संस्कृत ग्रंथाविषयींच्या ज्ञानाकडे तुच्छतेनें पाहण्याचें धैर्य त्यास आले आहे व आपलें अध्यापकत्व पटकविण्याची त्याची तयारी आहे. त्यास येतो हा जोर कशानें येतो याविषयीं तर आपण विचार केला पाहिजे ना ? आज त्यास जोर देत आहे, याचीं कारणें अनेक आहेत. त्यापैकीं मुख्य कारणें येणेंप्रमाणें:—

( १ ) आपल्या अभ्यासापेक्षा त्याचा अभ्यास अधिक पद्धतशीर आहे.

( २ ) प्रत्येकानें अभ्यास करून जें शोधात्मक ज्ञान संपादन केलें तें लेखी व्यक्त करून त्यानें पुढील पिढीसाठीं ठेवले आहे.

( ३ ) हिंदुस्थानाबाहेर झालेल्या ग्रंथाचें, जगाच्या इतिहासाचें आणि शास्त्राचें ज्ञान आपणापेक्षा त्यास फारच अधिक आहे. भारतीय पांडित्यास या सर्व गोष्टींची जरूर आहे. इतिहासाची किंवा ज्ञानाची अशी गोष्ट आहे कीं, एका देशातील ज्ञानाचें, राजकीय इतिहासाचें किंवा कलेचें जगातील एकंदर ज्ञानाच्या राजकीय अगर कलेच्या इतिहासापासून पृथक्त्व नसतें. आणि यामुळें जगातील इतर हालचालींचें ज्ञान ज्यास असतें त्यास हिंदुस्थानविषयक गोष्टी अधिक स्पष्टपणें समजावयास मार्ग असतो, आणि अशा लोकाच्या लेखातील चुका काढणें इतरास शक्य होत नाहीं.

आपल्या अभ्यासापेक्षा त्याचा अभ्यास अधिक पद्धतशीर कसा असतो याची कल्पना येण्यासाठीं, त्याच्या अभ्यासपद्धतीची कल्पना एकदोनच गोष्टींचा निर्देश केला असता येईल.

पाश्चात्याच्या अभ्यासातील पहिला प्रयत्न म्हणजे ज्या विषयावर आपणास परिश्रम करावयाचा असेल त्या विषयावर आजपर्यंत कोणी काय लिहिलें आहे याचा संपूर्ण तपास लावून तद्विषयक वाङ्मयसूचि तयार करणें.

ही वाङ्मयसूचि करण्यास त्यांचीं साधनें येणेंप्रमाणें : एक तर त्याच्या ग्रथशाला बरेच दिवसाच्या स्थापन झाल्या असल्यामुळें आणि ग्रंथसग्रह-विषयक परिश्रम दांडगा असल्यामुळें जो हिंदुस्थानविषयक ग्रथ येथें मिळण्यास फार यातायात पडेल तो ग्रथ पाश्चात्य विद्यापीठातील विद्यार्थ्यास आपल्या ग्रथालयात सहज मिळू शकतो. ऑक्सफर्ड, केंब्रिज, लडन, बर्लिन, सोर्बन, कार्नेल, कोलंबिया, येल, हार्वर्ड या विद्यापीठात जीं हिंदुस्थानविषयक पुस्तकें सहज पाच मिनिटात मिळतील, तीं मुंबईस अगर कलकत्त्यासहि मिळावयाचीं नाहींत ! हिंदुस्थानच्या कॉंग्रेसचे जुने रिपोर्ट मला सहज मिळत, पण हिंदुस्थानात चारपाच वर्षापूर्वीचे रिपोर्ट्स मिळवावयास यातायात पडते. ग्रंथोपलब्धीसंबधानें जेवढी सोय तेथें आहे तेवढी इकडे नाहीं, एवढेंच नव्हे तर अमुक विषयावर ग्रथ कोणता ही माहिती मिळण्यास मारामार पडते. निरनिराळ्या प्रकाशकाचे व लायब्ररऱ्याचे कॅटलॉग, वाङ्मयप्रसिद्धीविषयींच माहिती देणारीं मासिकें व ग्रथ याची पाश्चात्य विद्यापीठात रेलचेल असते. असो.

प्रयेक पडित आपल्या अभ्यासाचा विषय स्वतत्र व नवीन करण्या-च्या खटपटींत असतो. निदान दुसऱ्यानें जें अभ्यासक्षेत्र घेतलें असेल, त्या क्षेत्रावर पुन्हा निराळा ग्रथ लिहिण्याचें काय प्रयोजन झालें याविषयीं त्याला आपल्या ग्रथात स्पष्टीकरण करावें लागतें. अमुक विषयावर जें सशोधन झालें त्याचें सिंहावलोकन जर्मनमध्यें होतें. कोणत्याहि पडितास आपण ज्या विषयावर ग्रथ प्रसिद्ध करतों त्या विषयावरील पूर्वींचा ग्रंथ ठाऊक नसणें हें लज्जास्पद वाटतें. आणि त्यानें त्याचा उपयोग केला नसल्यास किंवा त्याकडे दुर्लक्ष केलें असल्यास अज्ञान किंवा मत्सराचा आरोप त्याजवर येतो या तऱ्हेच्या प्रगतीमुळें सर्व अभ्यासामध्यें एक-वाक्यता होते. वाटेल त्या लेखकानें मनास वाटेल तें लिहावें, दुसऱ्याच्या परिश्रमाकडे दुर्लक्ष करावें असें करून चालत नाहीं. शोधकाच्या सस्था आहेत, त्यात प्रत्येकास दुसऱ्याशीं प्रसग येतो त्यामुळें जबाबदारी वाढते, व निरंकुशता कमी होते.

संस्कृतग्रथविषयक पाश्चात्याच्या अभ्यासात केवळ शिस्तीची जोड मिळाल्यामुळें विशेष काय साध्य झालें आहे हें सागितलें पाहिजे.

प्रथमतः मूलपाठाच्या संशोधनाविषयीं त्याची पद्धतशीर खटपट होऊन तिला चागलें यश आलें आहे. मनुस्मृतीची आवृत्ति त्यास काढायची आहे असें समजा. त्यासाठीं ते प्रथम अनेक हस्तलिखितें गोळा करतील. तीं गोळा करणेंहि त्यास सोपें आहे. निरानिराळ्या ग्रंथशालाच्या हस्तलिखिताचे कॅटलॉग असतातच, त्यातहि एका पुस्तकाच्या अनेक हस्तलिखित प्रती असतात. त्या अनेक प्रतींचीं साग्र वर्णनेंहि त्यात असतात. तीं वाचून एखादा ग्रंथ मागवावा असें अभ्यासकास वाटलें तर तो आपल्या संस्थेच्या लायब्ररीमार्फत तीं हस्तलिखितें मागवू शकतो. अनेक हस्तलिखितें गोळा केल्यानतरचा प्रयत्न म्हटला म्हणजे शुद्ध पाठ ठरविणें हा होय. शुद्ध पाठ याचा अर्थ ज्यात व्याकरणशुद्धि अधिक असेल किंवा ज्यापासून अर्थनिष्पत्ति अधिक चागली होत असेल तो शुद्ध पाठ असें नाहीं. तर ऐतिहासिकदृष्टया जो मूळ पाठ असेल तो. उदाहरणार्थ आपण असें घेऊं कीं, एखाद्या मासिकाच्या संपादकास आलेला लेख प्रसिद्ध करावयाचा आहे. आलेल्या लेखात व्याकरणाच्या पुष्कळ चुका असतात. त्या दुरुस्त करून तो प्रसिद्ध करतो. तेव्हा प्रसिद्ध केलेला लेख म्हणजे मूळ नव्हे. ऐतिहासिक दृष्टीनें किंवा कायद्याच्या दृष्टीनें जबाबदारी प्रसिद्ध लेखापेक्षा मूळ पाठविलेल्या लेखाबद्दलच लेखकावर असते, बदललेल्या लेखाबद्दल कमी. यासाठीं तपासून शुद्ध न केलेला पाठ खरा व शुद्ध केलेला खोटा. याप्रमाणेंच जुन्या लेखाचें आहे. अस्सल व नक्कल यामध्यें नकलेला महत्त्व कमी. अनेक हस्तलिखितें जमा करून त्यातून मूळ पाठ कोणता होता, मूळ मिळविणें शक्य नसेल तर मूळपाठाच्या जवळजवळ पाठ कसा शोधावा याविषयीं शोध करण्याची पद्धति अनुभवानें ठरली आहे. पाश्चात्य अभ्यासात मूलशोधनाचा भाग महत्त्वाचा आहे. ग्रंथाचें मूळ शुद्ध असलें म्हणजे त्याच्यावरून तत्कालीन परिस्थितीचा पुढल्यामागल्या परिस्थितीशीं संबध पाहून इतिहासाची जुळवाजुळव करणें या खटपटी पुढें शक्य होतात. संस्कृत ग्रंथाच्या शुद्ध आवृत्त्या पाश्चात्याच्याच आहेत.

आता भारतीय ज्ञानाच्या बाबतींत त्याची कशी काय प्रगति होत आहे याची अंधुक तरी कल्पना दिली पाहिजे. प्रगतीचीं कारणें दोन आहेतः नवीन साहित्याचा उपयोग आणि जुन्या साहित्याचा नवीन पद्धतीनें

उपयोग. प्राचीन भारतीय विषयापैकीं पाश्चात्य पंडित ज्या विषयात आपल्या पुढें फार गेले आहेत, ते विषय म्हटले म्हणजे इतिहास आणि तदनुषागीक शास्त्रें हे होत. जी शास्त्रीय पद्धति त्यानीं आपल्या देशात स्वकीय सस्कृतीच्या व राजकीय घडामोडींच्या इतिहासास लावली तीच पद्धत त्यानीं इकडे लावली आणि जी माहिती जुन्या पंडितास नव्हती अशी अनेक प्रकारची माहिती पैदा केली.

उदाहरणार्थ "वेद" घेऊ. वेदाचा अर्थ कसा लावावा हें जाणण्यासाठीं प्रथम यास्कसायणादि ग्रथाच्या साहाय्यानें त्यानीं अभ्यास केलाच. पण त्यात काहीं थोडीशी सुधारणा करण्याचा प्रयत्न केला. यास्क हा देखील वेदकालानतर बऱ्याच कालानें होऊन गेला. त्याअर्थीं त्यास वेदकालीन सस्थाचें ज्ञान स्पष्ट नसेल, व त्यामुळें त्यानें दिलेले अर्थ चुकलेले असतील, ही शक्यता मनात धरून वेदवाक्याच्या दिलेल्या अर्थाविषयीं सशयवृत्ति तयार झाली. शिवाय अर्वाचीन पडितास झेंदावेस्ताचें व युरोपीय भाषाचें ज्ञान याची जोड मिळाली. तेव्हा त्यामुळें त्यास प्राचीन भारतीय व प्राचीन इराणी या तीन लोकसमूहाच्या भाषा, शब्द व संस्था यातील साहश्य लक्षात आलें, व जी सस्था व जे शब्द वेदात व या पाश्चात्य ग्रथात सदृश असतील तीं पुढें हिंदुस्थानात नष्ट झाल्यामुळें यास्कादिकास न समजणें व अर्वाचीन सशोधकास समजणें शक्य आहे असें त्यास वाटून त्यानीं तौलनिक पद्धति अमलात आणली आणि वेदार्थज्ञान स्वतंत्रपणें करून घेण्यास सुरुवात केली.

शब्दाचा अर्थ स्वतत्रपणें लावावा, वेदग्रथातील भाषेची ऐतिहासिक चिकित्सा करून वेदवाक्याचा कालानुक्रम काढावा, वेदात व्यक्त झालेल्या कथाचा ( Myths ) अर्थ काय याविषयीं स्वतंत्र बुद्धीनें शोध करावा, ज्याचा नामनिर्देश झाला आहे असे ऋषी, राजे, जाती, राष्ट्रें, स्थलातरें, युद्धें याच्या उल्लेखावरून राजकीय व बौद्धिक इतिहास जुळविण्याची खटपट करावी; प्राकृत, वेदभाषा, अवेस्ती भाषा, युरोपीय भाषा याचा तौलनिक अभ्यास करून अपभ्रश व भाषेत होणारे बदल याचे नियम शोधून काढावेत, या प्रकारचा परिश्रम त्यानीं अनेक वर्षें चालविला आहे.

रामायण, महाभारत व वेद यातील कथाचा मेळ घालण्यासाठींहि प्रयत्न पुष्कळ झाला. विचारसप्रदाय व शास्त्रे याचाहि ऐतिहासिक अभ्यास झाला आहे.

ग्रथातील शब्दाची सूचि, विशेषनामाच्या सूचि, श्लोकाची सूचि, एतद्विषयक पुस्तकाच्या याद्या, मूलपाठशोधनात घेतलेली खबरदारी याची पाश्चात्य बुद्धीस जोड मिळाल्यामुळें आणि हीं साधनें आपणास नसल्यामुळें सशोधनशास्त्रपरिचित अशा इकडील पडितास जाळ्यात सापडलेल्या सिंहासारखें व्हावें लागतें. दैत्यानीं ग्रासलेल्या अरण्यास ज्याप्रमाणें ऋषी सोडून जातात अगर तेथे येत नाहींत त्याप्रमाणे, पाडित्यास अपकर्षक अशा परिस्थितीनें ग्रासलेल्या हिंदुस्थानात येऊन शिकविण्यास देखील खरा पाश्चात्याचा वर्ग तयार नाहीं.

आपल्या सुशिक्षित वर्गापैकीं पुष्कळामध्यें पाश्चात्याच्या भारतीय पाडित्याविषयीं तुच्छता वसत असते. ती सर्वांशीं योग्य नाहीं असें म्हणणें भाग पडतें देशातीलच नवीन साहित्य शोधणें व वापरणें, भारतेतिहासास उपयोगी असें बाह्य साहित्य जमा करणें, सर्व साहित्य पद्धतशीर रीतीनें जमा करून उपयोगात आणणें, आपण केलेल्या अभ्यासानें जमा झालेलीं अनुमानें लिहून ठेवणें, अभ्यासासाठीं नवीन पद्धति स्वीकारणें या सर्व बाबतींत थोर परिश्रम पाश्चात्यानींच केले आहेत. त्याच्याच पद्धती घेऊन आपणहि अभ्यास करू लागलों म्हणजे आपण त्याच्या मागें न राहता पुढेंहि जाऊं हें खरें आहे व जे थोडे भारतीय पडित पाश्चात्य सशोधनपद्धतींनीं अभ्यास करून निर्भयपणें नव नवे सिद्धान्त पुढें माडीत गेले त्याचा पाश्चात्यानीं योग्य आदरहि केला आहे. आपलें कर्तव्य, आपली उच्चता परिश्रमानें स्थापित करण्याचें आहे, तुच्छता व्यक्त करण्याचें नाहीं. पाश्चात्याचें संशोधन गोळा करावें, तपासून पाहावें, ग्राह्य असेल तें घ्यावें, त्याज्य असेल तें टाकावें सर्व जगाचें ज्ञानविषयक रणमैदान एक होत आहे. आपण केलेलें सशोधन जगानें आदरावें असें आपणास वाटत असेल तर पूर्वी परिश्रम करणाराचे ग्रथ आपण अवलोकिले पाहिजेत.

पण हें सर्व कोणीं करावें? गचाळपणा व इंग्रजी भाषा भारतीय

तरुणाच्या घशात कोंबण्याची हाव, या दोन्ही चिन्हांनीं अंकित झालेल्या मुंबई, मद्रास, कलकत्ता, अलाहाबाद येथील युनिव्हर्सिटयाकडून हें काम पुढील पन्नास वर्षांतहि होईल अशी आशा वाटत नाहीं. हिंदु युनिव्हर्सिटी-कडून जर खटपट झाली तर यश येणें शक्य आहे; पण तिच्याकडूनहि काहीं होईल असें सध्याच्या परिस्थितीवरून वाटत नाहीं. ज्ञानकोश करताना पाश्चात्याचें भारतीय पांडित्य तपासून त्यातील ग्राह्यांश घेण्याचें काम चालू आहे. आणि पाश्चात्याचें भारतीय पांडित्य सर्वांशीं तपासण्याचें काम जरी ज्ञानकोशकारास अशक्य आहे, तरी या कार्यांत भावी परिश्रम करणारास आगाऊ तयारी म्हणून कार्य करता येईल असें वाटतें माहितीचे ग्रंथ आपल्या शहरात दुर्मिळ आहेत. पुस्तकें मिळवावीं कोणतीं याचीच माहिती आपल्या लोकास नाहीं, आणि त्यामुळें एकत्र जमविलेल्या माहितीची जरूर आपल्या लोकास मोठी आहे.

पाश्चात्याच्या भारतीय पांडित्यात दोष नाहींत, असें नाहीं; दोष आहेतच. सामान्य वाचकाच्या नजरेस येणारा त्याचा दोष म्हटला म्हणजे भाषांतर करताना होणारा दोष होय. काहीं अशीं हा दोष त्याचा पांडित्य-दोष नसून, अपरिहार्य दोष असतो. संस्कृत शब्दाची अर्थकक्षा पूर्णपणें लक्षात आली तरी इंग्रजी अगर इतर पाश्चात्य भाषेंतील शब्दात ती व्यक्त करावयाची असल्यामुळें ती अर्थकक्षा पूर्णपणें योजिलेल्या प्रतिशब्दात उतरत नाहीं, त्यामुळें भाषांतरात मुळातील अर्थ उतरला नाहीं असें वारवार ध्यानात येतें आणि वाचक एकदम भाषांतरकारास दोष देऊं पाहातो. इंग्रजी भाषेंत प्रतिशब्द नसतो आणि संस्कृत शब्दातील अर्थ-कक्षेचा एक भाग ज्या इंग्रजी शब्दाचें अर्थक्षेत्र विस्तृत आहे अशा शब्दानीं व्यक्त होतो. एकदा भाषांतर झालें असलें म्हणजे पुढील लेखकाची प्रवृत्ति मुळाकडे न जाता भाषांतरावरून तहान भागवून घेण्याकडे होते. आणि पुढील लेखक इंग्रजी शब्दातील भलताच अर्थ घेऊन पुढें जातात. या प्रकाराच्या गडबडीमुळें पुष्कळ घोटाळे झाले आहेत.

हा दोष पाश्चात्य भाषांतरात वारवार होणार आहे आणि महाराष्ट्रीय वाचकानीं पाश्चात्यानीं केलेलीं भाषांतरें वाचलीं असता सहज लक्षात

येणारा आहे, आणि त्यामुळें महाराष्ट्रीयास त्याच्या पांडित्याविषयीं संशय एकदम उत्पन्न होतो. इंग्रजी ग्रंथावरून स्वदेशाची माहिती घेऊं पाहणाऱ्यांनीं आणि त्यासाठीं संस्कृत पंडित तयार करण्याच्या योजनेस अडथळा करूं पाहणाऱ्या नामदार परांजप्यासारख्यांनीं प्रस्तुत ज्ञानविषयक दोष लक्षांत घेणें अवश्य आहे.

पाश्चात्यांच्या भारतीय पांडित्यांतील दुसरा एक दोष म्हटला म्हणजे त्यांचा स्वतःच्या देशाच्या संस्कृतीविषयीं आणि संप्रदायाविषयीं असलेला अभिमान होय. हिंदुस्थानांतील अनेक गोष्टी फारच अर्वाचीन आहेत, असें दाखविण्याचा त्यास मोह पडतो. याकोबी आणि ब्लूमफील्ड यांच्यासारखे लेखक सोडून दिले तर इतर लेखकास वेदाच्या किंवा नंतरच्या ग्रंथाच्या प्राचीनत्वावर गदा घालण्याची प्रबळ इच्छा आहे काय असा संशय वारंवार येतो. आपलें मत सिद्ध करण्यासाठीं त्यांनीं आणलेले आधार सर्वस्वी उपेक्षा करण्याजोगे नसतात, आणि त्यामुळें त्यांच्या म्हणण्याकडे बरेंच लक्ष द्यावें लागतें. हापकिन्ससारखे लेखक असें म्हणू लागतात कीं, आम्ही सर्व ग्रंथ बरेचसे अर्वाचीन धरूं; पुराव्याचा बोजा प्राचीनत्व सिद्ध करूं पाहणारावर आहे. अर्थात् असल्या प्रकारच्या विधानांत पंडिताची मनःप्रवृत्ति दिसून आली तरी तिला मान देणें भाग पडतें.

पाश्चात्यांच्या भारतीय पांडित्याविषयीं आम्ही जी अपेक्षा करतों व जी अपेक्षा फारशी पूर्ण झाली नाहीं, ती म्हटली म्हणजे तटस्थपणाची होय. आपणास असें वाटतें कीं, ब्राह्मण पक्ष किंवा बौद्ध पक्ष यासारख्या कोणत्याहि पक्षास पाश्चात्य ग्रंथकार मिळणार नाहींत आणि हिंदुस्थानच्या ऐतिहासिक प्रश्नावर निर्विकार मनानें ते लिहितील. पण ही अपेक्षा व्यर्थ आहे असें वाटावयास लागतें. ख्रिस्ती संप्रदायावरील आसक्ति वारंवार घोटाळा करते. हिंदी संस्कृतीचा पुरस्कर्ता म्हणून समजल्या जाणाऱ्या मॅक्स मुल्लर नावाच्या पंडिताची अशी अपेक्षा होती कीं, ख्रिस्ती संप्रदायाच्या उत्तम गुणाची माहिती हिंदूस पन्नास एक वर्षांच्या शिक्षणानें होऊन सर्व हिंदू लवकरच ख्रिस्ती होऊन जातील! त्यानें ही अपेक्षा व्यक्त केल्याला साठ वर्षें होऊन गेलीं. तथापि त्यानें अपेक्षिलेला परिणाम मात्र घडून आला नाहीं.

कित्येक ग्रथकार ब्राह्मण लबाड आहेत, त्याच्या भिक्षुकी लेखावर विश्वास ठेवूं नये, प्रामाणिक बौद्धाच्या ग्रथावर विश्वास ठेवावा असा आग्रह धरतात. वेदग्रथाचे अभ्यासक आणि अवेस्त्याचे अभ्यासक यामध्यें आपल्या अभ्यासविषयाच्या ग्रंथासंबंधानें अभिमान असून एकानें दुसऱ्याच्या ग्रंथास अर्वाचीन ठरविण्याचा प्रयत्न करावा अशी धडपड आहेच. जसजसें अर्वाचीन कालाकडे यावें, तसतसें पाश्चात्य पंडितांचें मन अधिकाधिक दूषित झालें आहे असें दिसून येतें

पाश्चात्य पाडित्यातील दोष त्याच्या गुणामुळें भयकर होतात. जे ग्रंथ आदरणीय नाहींत, त्यातील दोषामुळें कोणाचें काहीं नुकसान होत नाहीं; तथापि जे ग्रथ आदरणीय आहेत, त्यातील दोष लोकावर परिणाम घडवितात आणि यामुळें त्यातील दोष शोधणें अवश्य असतें. पाश्चात्य ग्रंथकारांचे दोष शोधण्याची दृष्टि अहितकारक नाहीं, ती अवश्य आहे. ग्रथात दोष शोधण्याची दृष्टि नेहमींच चागली असते असें नाहीं. पण एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रातील पडितवर्गाच्या पाडित्यामुळें दिपून जाऊन वाचाहीन व्हावें यापेक्षा दोषैकदृक् बुद्धि देखील वाईट नाहीं. पाश्चात्याचें शिष्यत्व योग्य आहे पण तें जगातील चढाओढींत जय पावण्यासाठीं आहे. पाश्चात्य पाडित्यामुळें घाबरून हतवीर्य होणें आणि "बाबावाक्य प्रमाण" या प्रकारची दृष्टि त्याच्याविषयीं ठेवणें, हें केवळ उद्धटपणानें पाश्चात्य पंडिताच्या लेखाचें महत्त्व कमी समजण्यापेक्षाहि वाईट आहे.

४

# नागपूरच्या गाडींत

ब्रह्मगिरि नागपुरास जाण्यासाठीं नागपूर मेलमध्यें दुसऱ्या वर्गानें प्रवास करीत होते. कल्याणच्या स्टेशनावर त्याच्या डब्यात एक नवीन गृहस्थ येऊन बसले. आलेल्या गृहस्थाचें त्याच्या डब्यात बसलेल्या दुसऱ्या एका गृहस्थाकडे लक्ष गेलें व त्यानीं "हॅलो! कोण मोरे! तुम्हीहि परत चालला काय? मला वाटलें कीं तुम्हाला आणखी कांहीं दिवस मुंबईस राहावयाचें असेल." असे शब्द उच्चारले.

"मुबईस काहीं दिवस राहण्याच्या तयारीनें आलों होतों पण मुबईला जास्त दिवस राहण्याची आवश्यकता दिसली नाहीं, तेव्हा परत चाललों." मोऱ्यानीं उत्तर दिलें.

कल्याणच्या स्टेशनावर डब्यात शिरलेल्या उतारूंकडे स्वामी ब्रह्मगिरींचें लक्ष गेलें. तेव्हा ते एकदम त्याच्याकडे वळून म्हणाले, "कोण, पर्वते!"

पर्वते ब्रह्मगिरींकडे निरखून पाहू लागले आणि म्हणाले, "चेहरा ओळखीचा दिसतो; तुम्ही मि. ब्रह्मगिरी नाहीं काय? पण आतां तुम्ही संन्याशाच्या पोशाखांत आहांत! काय, संन्यास घेतला आहे कीं लोकानीं आपणांस ओळखूं नये म्हणून ही तजवीज आहे? बाकी तुम्ही खरोखर संन्यास घेतलेला असून साध्या पोशाखांत हिंडता म्हणून मी लंडनला ऐकलेंच होतें!"

"तुम्ही ऐकलें होतें तें बरोबर होतें."

"आता कोणीकडे चाललां?"

"नागपुरास."

"मलाहि तिकडेच जावयाचें आहे. हे आमचे स्नेही बॅरिस्टर मोरे. हे तेथील ब्राह्मणेतर पक्षाचे पुढारी आहेत. ते देखील तिकडेच जाणार आहेत."

मोरे स्वामीजींकडे वळून म्हणाले कीं, "ब्राह्मण पक्ष किंवा ब्राह्मणेतर पक्ष या तऱ्हेच्या सर्व भावना व्यर्थ आहेत, आणि असले भेद करून भांडत बसणें हा सर्व मूर्खपणाच आहे असेंच आपणास वाटतें नाहीं?"

"आपल्यासारख्या सुशिक्षितास जर एखाद्या विशिष्ट पक्षास चिकटून काम करावेसें वाटतें तर ती गोष्ट मूर्खपणाची खास नाहीं. जग हें नाटक आहे आणि या नाटकात काम करू इच्छिणारानें ज्या पात्राचें काम आपल्या वाट्यास येईल तें निमूटपणें केलेंच पाहिजे. जर जगात राहावयाचे आहे, तर प्रत्येक मनुष्यास ज्या उपाधी असतात त्या नाकारून काय उपयोग?"

"तर मग मी विशिष्ट वर्गाचें हित वाढविण्यासाठीं प्रयत्न करतों याबद्दल आपण मला वाईट म्हणत नाहीं?"

"अर्थात् नाही."

"तर मग तुम्हीं माझे हेतु आणि माझ्या भावना समजूं शकाल; माझे मित्र हे विश्वामित्र पर्वते याच्याशीं माझा वारंवार वाद होतो, ते म्हणतात कीं विशिष्ट जातींचे हितसबंध पाहात बसण्याची ही वेळ नाहीं. सर्व जनतेचे हितसंबंध अनेक बाबतींत एकच आहेत, ते सर्वमान्य हितसंबंध साधण्यासाठीं सर्व सुशिक्षितानीं एकत्र झालें पाहिजे."

"पण हें तत्त्व तुम्हांस अमान्य आहे काय?" ब्रह्मगिरि म्हणाले.

"अमान्य आहेहि, आणि नाहींहि. सामान्यतः पाहिलें असतां रा. पर्वते आणि मी अशा दोघाचे विचार अनेक प्रसंगीं म्हणजे शिक्षण वाढविण्या-साठीं किंवा व्यापार वाढविण्यासाठीं काय करावें या विषयावर एकसारखेच आहेत असें दिसेल, तथापि मला ब्राह्मणेतर वर्गाची वकिली केली पाहिजे अशी माझी खात्री झाली आहे. मी रा. पर्वते याना म्हणतों कीं, तुम्ही पुढारलेल्या वर्गाचे पुढारी बना. देशाच्या स्थितीविषयीं अनेक बाजूंनीं

पाहणारा त्याच्यासारखा मनुष्य पुढारलेल्या वर्गाचा पुढारी बनला तर तो आम्हास हवाच आहे पण ब्राह्मणसदृश वर्गाचा पक्ष निराळा असणें आणि ब्राह्मणेतराचा निराळा असणें या गोष्टीच त्याना पसंत नाहींत."

"त्याना काय पाहिजे आहे ?" ब्रह्मगिरी विचारते झाले.

"त्याना ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद किंवा त्यावर रचलेले पक्ष नकोच आहेत."

"आणि तुम्हाला ?"

"पक्ष जातीच्या तत्त्वावर उभारलेले असण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं; युरोपात जातीच्या तत्त्वावर पक्ष असणें ही गोष्ट चागली धरीत नाहींत; तेथें तसे पक्ष तरी देखील असतात हें मात्र खरें; माझें असें म्हणणें आहे कीं, अनेक व्यक्ति एकत्र जमा होतात त्या काहीं सामान्य हितसंबंधामुळें जमा होतात. पक्षाशिवाय अर्वाचीन प्रकारची राज्यव्यवस्था चालावयाची नाहीं हें मत विश्वामित्रास मान्य आहे; पण त्याचें मत असें आहे कीं, हे पक्ष राजकारणाच्या किंवा अर्थशास्त्राच्या तत्त्वावर रचलेले असावेत, जातींवर रचलेले नसावेत."

"आणि तुम्हाला तसें वाटत नाहीं ?"

"मी म्हणतों कीं जातीच्या तत्त्वावर पक्ष नसून दुसऱ्याच कसल्या तरी तत्त्वावर पक्ष आहेत असें सागून जातीची भावना कायम ठेवणें यापेक्षा खरोखर जातीच्या तत्त्वावर पक्ष आहेत असें सरळ सागणें हें अधिक प्रामाणिक आहे."

"पण मी म्हणतों कीं, सामाजिक किंवा राजकीय तत्त्वावर पक्ष रचून आत जातीच्या तत्त्वावर कारवाई करणें ही क्रिया चागली नाहींच, पण जातीच्या तत्त्वावर पक्ष असणें हेंहि चांगलें नाहीं." विश्वामित्र म्हणाले.

"लोक स्वाभाविकपणें कोणत्या भावनेनें जमा होतात हें पाहणें हें पक्षरचनेचें पहिलें तत्त्व होय; पक्ष म्हणजे सामुच्चयिक हिताकारिता जुळविलेली फौज. ही लवकर कशी जुळेल हेंच राजकारणात कारवाई करणारानें पाहिलें पाहिजे. पक्षरचनेचें तत्त्व आपण लोकावर लादावयाचे कीं लोकांची

स्वाभाविकपणें सघटना कशी होते, लोकांना आपले कोणते हितसंबंध अगोदर दिसतात हें पाहून घटना करावयाची ? मला वाटतें कीं ज्या तत्त्वावर लोकसमूह आपल्याकडे जास्त येईल त्या तत्त्वावर सघटना केली पाहिजे."

" पक्ष कोणत्या तत्त्वावर तयार करावा याविषयीं काहीं नैतिक विचार नाहींच काय ? " विश्वमित्रानीं विचारलें.

" तुम्ही ज्यास नैतिक विचार म्हणता तो केवळ भाषेचा फरक आहे असें मी समजतों. आपलें हित साधणें हें पक्षातल्या व्यक्तींचें कार्य असतें, पुढारलेल्या जातींना तें कार्य साध्य होण्यासाठीं अधिक तात्त्विक भाषा वापरता येते." मोरे म्हणाले.

" पण तुम्हांला राजकारणांत केवळ जातिस्वार्थ साधण्यापलीकडे कर्तव्य दिसत नाहीं काय ? "

" ब्राह्मणेतर पक्षाचें धोरण सध्याच्या पुढाऱ्याना व्यक्त करता येत असो अगर नसो, तें व्यक्त करण्यासाठीं लागणारी दरबारी भाषा आमची मंडळी शिकली नाहींत. आमच्यापैकीं काहीं दरबारी भाषा वापरू शकतील; पण ती भाषा आमच्या पक्षातील सामान्य लोकास समजणार नाहीं. म्हणून आम्ही आपल्या इच्छा तुमच्यासारख्या दरबारी भाषेंत बोलूं इच्छीत नाहीं. पण आमच्या लोकाना काय पाहिजे तें समजत नाहीं असें नाहीं. अगदीं सामान्य लोक आपल्या आकांक्षा अगदीं स्पष्टपणें जाणतात."

" पुढारलेल्या जातींच्या लोकांना तुमच्या गरजा समजत नाहींत असें तुमचें म्हणणें आहे काय ? " पर्वते म्हणाले.

" पुढारलेल्या जातींना मागासलेल्याच्या गरजा पूर्णपणें कशा समजतील ? " ब्रह्मगिरि म्हणाले.

" पुढारलेला वर्ग आमच्याविषयीं फारसा विचारच करीत नाहीं; राष्ट्र म्हणजे खरोखर आम्ही बहुसंख्याक लोक म्हणजे कुणबी आणि महार; पण पुढारलेल्या जाती " राष्ट्र " म्हणजे ब्राह्मण अथवा " मध्यम वर्ग " समजतात." मोरे म्हणाले.

"आम्ही राष्ट्रीय हित कोणत्या गोष्टींत दुर्लक्षीत होतों तें सांगा!" पर्वते म्हणाले.

"तुम्हांला आमची आठवणच नव्हती. पुढारलेले वर्ग सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा हिंदुस्थानांत व्हावी म्हणून मागत होते. ही आमची मागणी खरोखरच नव्हती. ही केवळ पुढारलेल्या लोकाची वर्गविशिष्ट मागणी होती. ही खरोखर ब्राह्मण जातीची तरी मागणी कितपत होती याबद्दल शंका आहे. ही खेडयातल्या लोकाची मागणी नव्हतीच. गावातल्या लोकाचीहि मागणी नव्हती. सिटी आणि कँप याच्यामध्यें असलेल्या वस्तीची ही मागणी होती."

"आम्ही तुमच्याकरता काहींच केलें नाहीं काय? आम्ही ज्या सुधारणा व्हाव्यात म्हणून खटपट केली ती तुमच्याहि हिताची नव्हती काय?"

"कौन्सिलें उत्पन्न व्हावीं म्हणून पुढारलेल्या वर्गांनीं खटपट केली. आम्ही त्याबद्दल आभारी आहों, पण आमच्यासारख्या मागसलेल्या लोकाना त्याच्या गरजा पुढें माडतां याव्या म्हणून आम्हांस काहीं निश्चित प्रतिनिधि मिळावे अशी जी आमची खटपट होती तिला पुढारलेल्यांनीं विरोधच केला." मोरे म्हणाले

"पण जातिविशिष्ट प्रतिनिधि असावे हें तत्त्वच आम्हास मान्य नसेल तर?" बॅ. पर्वते म्हणाले.

"आम्ही त्यास स्वार्थ लपविण्याची दरबारी भाषाच समजतों आणि तुम्ही जर मोकळया मनानें विचार कराल तर वस्तुस्थिति तशीच आहे असें आढळून येईल. आपण आपल्या धंद्यांत केस जिंकण्यासाठीं कायद्याच्या तत्त्वाच्या गोष्टी बोलत नाहीं काय? आम्ही हें ओळखतों कीं बहुजनसमाजापासून विवाहानें वियुक्त असलेले किंवा बहुजनसमाजाशीं संघटन नसलेले लोक त्यांचे प्रतिनिधि होऊं शकत नाहींत."

"पण ब्राह्मणादि सुशिक्षित वर्गांमध्यें सामाजिक बाबतींत उदार धोरण असलेला आम्हां लिबरल्सचा वर्ग बहुजनसमाजाच्या सामाजिक आकांक्षांस अनुकूल आहे."

"पण त्या वर्गाचाहि मला विश्वास वाटत नाहीं. त्या वर्गाला आमच्या जनतेच्या अडचणी कळावयाच्याच नाहींत. गेल्या पिढींत सामाजिक सुधारणेचें मोठें स्तोम माजलें होतें, पण त्या काळच्या सुधारकाच्या मजलशींत सामान्य जनतेचे प्रश्न फारच थोडे पुढें आले. पुनर्विवाहाचे ठराव झाले, पण त्यावरून काय ठरतें ? त्यावरून एवढेंच ठरतें कीं, पुढारलेल्या जातींच्याच बायकाचा प्रश्न त्यानीं विचारासाठीं घेतला. त्यावेळची हिंदुस्थानात सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा मागणारी कॉंग्रेस आणि केवळ ब्राह्मण विधवाच्या पुनर्विवाहाविषयीं चर्चा करणाऱ्या सुधारकांच्या मजलसी ह्या दोन्ही ब्राह्मणाच्या किंवा पुढारलेल्याच्याच सस्था होत्या. हे वर्ग केवळ कारकुनीवजा धदे करणारे होत; आणि या वर्गाचें एकदर जनतेंत प्रमाण शेंकडा पांचदहा असेल. हा वर्ग आपल्या वर्गाच्या गरजा किंवा आकाक्षा बोलणार आणि त्या राष्ट्रीय आहेत म्हणून सांगणार. हा चावटपणा बद होण्यासाठीं ब्राह्मणेतर पक्षाचा अवतार होणें आवश्यक होतें. थोडक्यात सागावयाचें म्हटल्यास आम्ही पुढारलेल्या कोणत्याच वर्गावर पूर्ण विश्वास ठेवावयास तयार नाहीं."

"आपण असें समजू कीं, पुढारलेले वर्गच कौन्सिलांत असते तर त्यांमार्फत तुमची उन्नति साध्य झाली नसती काय ?"

"आमच्या वर्गाविषयीं विचार करून त्या विचाराचें महत्त्व पुढारलेल्या वर्गास पटवून देऊन त्यांच्यामार्फत आपली उन्नति साध्य करून घेण्याचा प्रयत्न करणें हा द्राविडी प्राणायाम होय. पुढारलेल्या वर्गामार्फत आम्ही गोष्टी साध्य करून घ्याव्यात त्यापेक्षा प्रत्यक्ष इंग्रज अधिकाऱ्यांस अर्ज करून का साध्य करून घेऊं नयेत ? केवळ मध्यस्थाची भिक्षुकी कायम राखावयाची एवढ्यासाठींच का आम्ही आणि सरकार यांच्यामध्यें पुढारलेला वर्ग ठेवावयाचा ? आमच्या हिताच्या गोष्टी साध्य करून घेण्याचा अधिकार आम्हीं मिळविला पाहिजे आणि नंतर तो सर्व राष्ट्राच्या हितासाठीं वापरला पाहिजे."

"ब्राह्मणेतरांच्या उन्नतीस ब्राह्मणांची जरूर नाहीं काय ?"

"कोणताहि मागासलेला वर्ग पुढारलेल्या वर्गाशीं सहकारिता

असल्याशिवाय व त्याबरोबर स्पर्धाहि असल्याशिवाय सुधारणार नाहीं. पण आम्हास आमचें भवितव्य केवळ ब्राह्मणावर सोंपवून चालावयाचेंहि नाहीं.'

" तर मग तुम्ही ब्राह्मणाची सहकारिता कशा तऱ्हेची अपेक्षिता ? "

" सामान्य जनतेचें सुख वाढावें यासाठीं जो प्रयत्न करावा लागतो तोप्रयत्न करण्यास ब्राह्मणवर्ग उपयोगी होणार नाहीं असें मी म्हणत नाहीं; उलट मी असेंहि म्हणतों कीं, ब्राह्मणादि वर्गांनें हें काम मनापासून अगावर घेतल्यास ते चागल्या तऱ्हेनें पार पाडूं शकतील, पण त्या वर्गाला तें काम करण्याची आवश्यकता वाटल्यास ते वर्ग सामान्य जनतेस म्हणजे ब्राह्मणेतर वर्गास जबाबदार झाले पाहिजेत. ब्राह्मणामध्यें शिक्षणाचा प्रसार अधिक आहे, आणि त्याची राहणदिखील ब्राह्मणेतरांपेक्षां अधिक उच्च दर्जाची आहे आणि यामुळें हें काम मनापासून अंगावर घेतल्यास ब्राह्मणेतराची राहणी आणि शिक्षण हीं दोन्ही अधिक उच्च दर्जास ते आणूं शकतील. पण त्याबरोबर हेंहि सागतों कीं आमच्या लोकाचें कल्याण व्हावें, आपलें शिक्षण वाढावें आणि आपली राहणी अधिक आरोग्यकारक व्हावी यासाठीं इग्रज जर खटपटी करूं लागले तर ते जास्त उपयुक्त होईल. मनुष्यास कोणत्या गोष्टी सुखानें राहण्यास आवश्यक आहेत याविषयीं इंग्रजांच्या अपेक्षा अधिक उच्च आहेत, व यासाठीं इग्रज घालवूनहि उपयोग नाहीं, असेंच माझें मत आहे. आणि यासाठीं इग्रज नोकरशाहीचें उच्चाटण करण्याविषयीं जो पुढारलेल्या जातींचा प्रयत्न आहे त्याविषयीं आम्ही— निदान मी तरी— अंतःकरणपूर्वक उदासीन आहे."

बॅ. विश्वामित्र आणि बॅ. मोरे या दोघामध्यें चालू असलेलें संभाषण स्वामी ब्रह्मगिरि यास बरेंच मौजेचें वाटलें; पण त्याना ज्या प्रकारचें संभाषण पाहिजे होतें त्या प्रकारचें सभाषण उत्पन्न होईल असा रंग दिसेना. बॅ. मोरे यांच्या समाषणावरून केवळ अशिक्षित आणि शिवराळ अशा ब्राह्मणेतर चळवळ्यांहून सुशिक्षित ब्राह्मणेतर पुढारी कसा भिन्न असतो याची ब्रह्मगिरींस कल्पना आली, आणि आपण ज्या प्रकारचें संभाषण करूं इच्छितों त्या प्रकारचें संभाषण हा करू शकेल असेंहि वाटलें.

ब्रह्मगिरींनीं बॅ. मोरे यांच्याकडे वळून प्रश्नोत्तरांस सुरुवात केली. ते

म्हणाले कीं, " ब्राह्मणेतरांच्या जागृतीवर माझा विश्वास आहे, व त्याची जागृति झाल्यापासून समाजाला कांहीं निश्चित फायदे होतील असें माझें मत आहे. उदाहरणार्थ, जेव्हा ब्राह्मणेतर मंडळी धार्मिक गोष्टींविषयीं चर्चा करूं लागली तेव्हां त्यांनीं स्वतन्त्र विचार उत्पन्न केला. कर्ममार्ग बाजूला ठेवून ज्ञानमार्गाचें प्राधान्य उत्पन्न करण्याचे श्रेय जनकासारख्या ब्राह्मणेतरासच आहे. त्यावेळच्या ब्राह्मणाचे विचार यज्ञविषयकच होते, म्हणजे एकाच नळकांड्यातून वाहात होते, आज जर ब्राह्मणेतर वर्ग सामाजिक, धार्मिक किंवा राजकीय विषयावर विचार करू लागेल तर तो वर्ग नवीन विचार प्रसूत करील यात शंका नाहीं. तुमचे सामाजिक भवितव्याविषयीं विचार काय आहेत? अशी कल्पना करा कीं, महाराष्ट्र हें एक राज्य आहे, त्याचे मुख्य दिवाण तुम्ही आहात, आणि तुम्हास बऱ्याच सुशिक्षित मराठ्याना आपल्या कामाबद्दल जाब द्यावा लागणार आहे तर अशा प्रसंगीं तुम्ही कोणकोणत्या गोष्टी कराल ? "

" हा प्रश्न तुम्हीं माझ्यापुढें एकदम टाकला आणि माझ्यावर नियंत्रण करणारी एक शक्ति तुम्हीं जागृत आहे असें धरून मी काय करीन असें मला विचारता, त्या ऐवजीं मी जर अगदीं स्वतंत्र असलों तर काय करीन हा प्रश्न मला विचारला तर मला उत्तर देणें सोपें होईल."

" तें का बरें ? "

" कारण कीं माझ्या मनातील विचार आजच सर्व मराठ्यास पटतील असें वाटत नाहीं. "

" तर मग तुम्हीं अगदीं डिक्टेटर असला तर काय कराल तें सांगा ! "

" पुष्कळच गोष्टी करीन, शिक्षणाकडे मी सगळ्यापेक्षां जास्त लक्ष देईन, पण शिक्षण याचा अर्थ मी व्यापक करतों. जे अनुभव सहज येत नाहींत ते मुद्दाम आणणें, ज्या गरजा नाहींत त्या उत्पन्न होणें यासारख्या गोष्टीदेखील मी महत्त्वाच्या समजतों. आणि त्याचा लोकशिक्षणांत अंतर्भाव करतों."

" अशा तात्त्विक विचारापेक्षा तुम्ही कांहीं गोष्टी निश्चयात्मक सांगाल तर बरें."

" महाराष्ट्राचा आयुष्यक्रम अधिक उच्च तऱ्हेचा होईल, आणि लोकांस उच्च तऱ्हेच्या आयुष्यक्रमाची अभिरुचि उत्पन्न होईल असे प्रयत्न मी करीन."

" ही भाषा देखील जरा गूढच होऊं लागली आहे. ही ब्राह्मणेतर भाषा नव्हे. "

" बरें आहे तर, मी अगदीं सोप्या भाषेंत सागतों. आजची राहणी अगदीं पालटून जाईल असें केलें पाहिजे. शेंकडा नव्वद लोक घाणेरड्या स्थितींतच राहतात. तर त्याची राहणी स्वच्छ, सुंदर आणि गोंडस केली पाहिजे."

" शेंकडा नव्वद लोक अस्वच्छ ? "

" हो, शेंकडा नव्वद लोक घाणेरड्या स्थितींत आहेत. कदाचित् शेंकडा पंचाण्णवहि असतील. तुम्हीं ब्राह्मण लोक शेंकडा पांच आहात त्यातले देखील शेंकडा २५।३० लोकाना स्वच्छतेनें राहणें म्हणजे काय हें समजत नाहीं असें तुम्ही कबूल करालसें वाटतें. ब्राह्मणाप्रमाणें राहणाऱ्या ब्राह्मणेतर लोकाची संख्या ब्राह्मणांच्या एकंदर संख्येइतकी देखील नाहीं."

" बरें, शेंकडा नव्वद–पंचाण्णव अस्वच्छ तऱ्हेनें राहतात, तर तुम्ही काय करणार ? "

" गेली पिढी आम्हाला सुधारणें अशक्य आहे; पण नव्या पिढीची राहणी सुधारणार; ही सुधारणा होण्यासाठीं मोठा खटाटोप करावा लागणार आहे."

" तो काय करणार ? "

" मी सरकारवर मोठी जबाबदारी टाकीन सरकारनें स्वच्छ राहणी तरुण पिढींत वाढविण्यासाठीं सक्तीच्या शिक्षणाबरोबरच स्वच्छ राहणी शिकविण्यासाठीं परिश्रम केले पाहिजेत. सर्व महाराष्ट्र म्हणजे एक कुटुंब आहे ही भावना लोकात वाढवीन, या मोठ्या कुटुंबाची इस्टेट वाढली पाहिजे म्हणजे प्रत्येक तालुक्याला एक इस्पितळ, धंदेशिक्षणाची शाळा इत्यादि गोष्टी पाहिजेत, रस्ते चांगले पाहिजेत, पार्क पाहिजेत, शहरें स्वच्छ

झालीं पाहिजेत, धुळीच्या योगानें ट्राकोमासारख्या रोगांची वाढ होते तर धूळ बंद केली पाहिजे, इलेक्ट्रिसिटीचा प्रचार वाढविला पाहिजे, लोकांना राहण्यास मुबलक जागा पाहिजे इत्यादि समाजाच्या गरजा लक्षांत घेईन."

" पण या सर्व गोष्टी कशा करविणार ? "

" मी सपाटून कर्ज काढवीन आणि उच्च राहणी वाढविण्यासाठीं घरें वाढविण्यास सुरवात करीन. आपल्याकडे बहुतेक लोकाचीं घरेंच वाईट असतात. मांगांच्या झोपड्या पाहिल्या तर कशीं तरी रचलेलीं भिंताडें आणि त्यांवर घासलेटच्या टिनांचे पत्रे ! महारांची स्थिति त्याहून बरी आहे, मराठे व ब्राह्मण यांची स्थिति या दोहोंहून बरी आहे; पण एकंदरींत सर्वच लोकांस राहण्यास जागा अपुरी असते आणि त्यामुळें स्वच्छतेची राहणी ठेवण्यास व्यत्यय येतो, तर महाराष्ट्रामध्यें एक-दोन लाख घरें वाढविण्याची खटपट करीन."

" आणि ती करण्याला लागणारा पैसा कोठून आणणार ? "

" पैसे म्हणजे परिश्रम. दुसरें कांहीं नाहीं. आज आठवड्यांतून दोन-तीन दिवस मजूरवर्ग काम करतो त्याच्याऐवजीं त्याला सहा दिवस काम करावें लागेल एवढेंच. आपल्याकडे लोक काम करीत असता त्यांच्या पोटाला लागेल इतकें धान्य आहे; दगड, माती, चुना, लाकडें इत्यादि वस्तू आपल्या देशातच उत्पन्न होतात, तर राष्ट्राची स्थावर इस्टेट वाढविणें म्हणजे राष्ट्राला काम करण्यास—म्हणजे जमिनीपासून प्राप्त होणाऱ्या मालावर क्रिया करण्यास उत्तेजन देणें आहे, दुसरें कांहीं नाहीं."

" बरें, मी सध्यां शक्याशक्यतेच्या वादविवादात पडू इच्छित नाहीं. जो मनुष्य एखादी सुधारणा करावयाची योजतो तो ती सुधारणा शक्य होण्याची खटपट करीलच. इच्छेला व्यवहाराचें स्वरूप काय द्यावें एवढाच तो प्रश्न आहे आणि माझ्या दृष्टीनें तो सोपा प्रश्न आहे. राष्ट्राची आत्मोन्नतीची इच्छाच जागृत कशी करावी हा मोठा प्रश्न आहे; मी तुम्हांला विचारतों कीं, तुम्ही दुसऱ्या कोणत्या गोष्टी करूं इच्छितां ? "

" लिहिणें, वाचणें सार्वत्रिक करीन हें सांगायलाच नको. तें करू-

ग्यास साधनें नाहींत ही सर्व ओरड लबाड दिवाणांची, लबाड नोकरशाहीची आणि लबाड जनतेची आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं, शिक्षणप्रसाराची लोकात इच्छाच नाहीं. मला सत्ता असती तर सार्वजनिक सक्तीचें मोफत शिक्षण देण्याचें काम मी करूनच दाखविलें असतें. अहो, देशावर परचक्र आलें म्हणजे कोट्यवधि रुपये कर्ज काढता तर शिक्षणासाठीं कर्ज काढायला झालें काय ? ''

" आपण तेंहि कबूल करूं कीं, सध्यांच्या लोकाना, त्याच्या प्रतिनिधींना आणि सरकारी अधिकाऱ्याना आस्था नाहीं, शिक्षणासाठीं तुम्हीं कर्ज देखील काढाल हेंहि कबूल करा, दुसरें काय कराल ? ''

" मी यापेक्षाहि दुसऱ्या गोष्टी सागू शकेन. पण त्या डीटेल्सच्या आहेत. उदाहरणार्थ, मी असा प्रयत्न करीन कीं, शिक्षकात युरोपियन स्त्रीशिक्षकांचा वर्ग वाढवावा, म्हणजे आपली राहणी उच्च तऱ्हेची करावी या कार्याची जोपासना त्या अधिक करूं शकतील. तसेंच बायस्काउटिंग सर्वत्र देशांतले सरकारी खातें म्हणून करवीन. करायला कोणत्या गोष्टी हव्यात याविषयीं अधिकार हातीं आल्यानंतरच मनुष्य विशेष विचार करूं लागतो ! ''

" पण तुमच्या हातीं अधिकार देण्यात समाजाचा अधिक फायदा आहे हें समाजास पटावें लागतें.''

" सध्यां एवढेंच सागता येईल कीं महाराष्ट्र हें मोठें कुटुंब धरून त्याचें सुख कसें वाढवितां येईल हें मी पाहत जाईन.

" कुटुंबातल्या मंडळींचें सौख्य पाहावयाचें म्हणजे त्यांना जितक्या गोष्टी जास्त मिळतील तितकें पाहावयाचें तें तर मी पाहीनच, पण महाराष्ट्र हा अनेक धंदे करणारा एक मोठा कारखाना आहे अशी कल्पना करून या कारखान्यातून जास्त माल कसा निघेल हेंहि पाहीन.''

" हीं देखील तात्त्विक भाषाच झाली; तत्त्वाच्या ऐवजीं उपमा आली एवढेंच! ''

" तर मग मी हें सांगतों कीं, विशिष्ट कल्पनांचा उत्पादक मी नाहीं; जी कल्पना निघेल ती हितकर कितपत आहे या दृष्टीनें प्रत्येक कल्पनेचा

मी स्वीकार करीन किंवा नाकार करीन आणि मला जरी कल्पना फार नसल्या तरी दुसऱ्या लोकापाशीं तरी कल्पना असतीलच; त्या माझ्याच आहेत. मी कोणत्या वृत्तीनें राष्ट्राच्या सुखाकडे पाहीन हेंच आपणांस सांगितलें."

"तुमच्यापाशीं जर देशाच्या फायद्याच्या विशिष्ट कल्पना नाहींत तर मग लोकांनीं अधिकारदानास तुम्हालाच पसंत कां करावें?"

"ब्राह्मणापेक्षा सामाजिक सुधारणेच्या नेतृत्वास माझ्यासारखा ब्राह्मणेतरच अधिक लायक आहे, असें मी समजतों; माझे कित्येक जवळचे आप्त शेतावर काम करणारे मजूर आहेत तर कित्येक गवड्याच्या हाताखालीं दगड-माती आणून देणारे मजूर आहेत. त्याच्याविषयीं मला जो आपलेपणा वाटतो तो ब्राह्मणास आज तरी वाटणें शक्य नाहीं. त्या मजुरांचें कल्याण तें माझें कल्याण ही भावना मला वाटते. त्या मजुरापेक्षा महार मजुराचा आयुष्यक्रम अधिक वाईट आहे असें मला वाटत नाहीं, किंबहुना ते लोक निराळे आहेत असेंच वाटत नाहीं. विटाळाच्या कल्पना माझ्या मनांतून इंग्लंडला गेल्यामुळें नाहींशाच झाल्या आहेत. "आपले लोक" असे शब्द म्हटले म्हणजे ब्राह्मणाच्या मनात गरीब कारकून येतात. आपल्या लोकाची सुधारणा म्हणजे मी मजुराची सुधारणा समजतों; आणि यावरून मला असें वाटतें कीं राजकीय कार्यक्षेत्रात ब्राह्मणाचें महत्त्व नाहींसें होऊन ब्राह्मणेतराचें महत्त्व वाढावें."

"तुमच्या सर्व समाजासंबंधाच्या महत्त्वाकांक्षा बऱ्याच व्यापक आहेत, हें पाहून मात्र आनंद झाला, आणि या विचारास कृतीमध्यें स्थान देण्यासाठीं जर सर्व राज्यतंत्र ब्राह्मणेतराच्या हातीं गेलें तर त्यात मला आनंद वाटेल. तुमच्या विचारास ब्राह्मणेतराची कितपत सहानुभूति आहे?"

"अहो, अडचण तर तेथेंच आहे; या तऱ्हेचा कार्यक्रम आज ब्राह्मणेतरास बिलकुल पटत नाहीं ते मला मनोराज्य करणारा समजतात; ब्राह्मणेतराची आज दृष्टि एवढीच आहे कीं कर वाढूं नयेत, जो कर उत्पन्न होणार आहे त्याचा मिळतो त्यापेक्षा अधिक फायदा ब्राह्मणेतरास मिळावा. सध्याचा ब्राह्मणेतर पक्ष सर्व जनतेचा प्रतिनिधि नाहीं. तर ब्राह्मणेतरांपैकीं जे चार

अक्षरें शिकलेले लोक आहेत त्यांचाच प्रतिनिधि आहे. आणि तेवढ्या लोकांच्याच आकांक्षा तो बोलतो. "

" तुम्ही कोणाचे प्रातीनिधि आहांत ? "

" मी कोणाचाच प्रतिनिधि नाहीं. सामान्य कुणब्यास माझ्या मनांतल्या गोष्टीच मला समजावून सागतां येत नाहींत. मला असें वाटतें कीं माझ्या हातीं सत्ता यावी; आणि मी ती सर्व जनतेच्या हितासाठीं चालवावी; त्याच्या मतानें चालवावी असें नव्हे."

इतक्यांत विश्वमित्र म्हणाले कीं, " तुमच्या आमच्या या बाबतींत कल्पना किती तरी जुळतात तर आपण दोघेहि मनोराज्य करणारे आहोंत. मी, जातिविशिष्ट गोष्टींवर पक्ष रचलेले नसावेत, सुधारणांसाठीं पक्ष असावेत हें म्हणतों त्याचें बीज तरी हेंच आहे."

" असो, तुमच्या दोघाच्या मनातले विचार मला कळले. नागपूरला आपण गेल्यावर पुन्हा भेटूं आणि पुन्हा चर्चा करूं." असें म्हणून भगवद्गीतेचें पुस्तक उघडून स्वामी ब्रह्मगिरींनीं गादीवर आपली पाठ टेंकली.

५

# पोलिटिकल क्लब कसा असावा ?

राजकीय चळवळी करण्यासाठीं मनुष्याची एकी लागते. एकी आपोआप होत नाहीं. ज्या मनुष्याची एकी हवी असेल त्या मनुष्यांची प्रथमतः ओळख झाली पाहिजे; व ओळख झाल्यानंतर परस्पराचा परस्परां-विषयीं लोभ व विश्वास हीं वाढलीं पाहिजेत. ज्या मनुष्याचा आपल्याशीं प्रत्यक्ष प्रसंग येत नाहीं त्याच्याविषयीं आपल्या मनांत सामान्यतः अविश्वास असतो, व अविश्वास असला म्हणजे मनुष्य स्वतः ओळखी करण्यास प्रवृत्त होत नाहीं. आपणांमध्यें सामान्यतः एक नियम दृष्टीस पडतो तो हा कीं, मनुष्य आपण होऊन दुसऱ्याची ओळख करण्याचा जेव्हां प्रयत्न करितो, तेव्हां दुसऱ्या मनुष्यास असें वाटतें कीं आपणांस भेटण्यास आलेला मनुष्य आपल्यापेक्षां कमी प्रतीचा आहे. नाहीं तर तो आपल्या दारीं उगाच कशाला येईल ? या प्रकारची समजूत असल्यामुळें स्वतःचा मान राखून घेऊं इच्छिणारी पुष्कळ मंडळी एकमेकांची ओळख करून घेण्याचा देखील प्रयत्न करीत नाहींत. बरें पुष्कळदां असें होतें कीं, एका मोठ्या मनुष्याची दुसऱ्यास भेटण्याची इच्छा जरी असली तरी दुसऱ्यास ती कळण्याचा संभव नसतो. यामुळें समाजांत असलेल्या निरनिराळ्या शक्तींचें एकीकरण होत नाहीं. आणि समाजानें सुव्यवस्थित रीतीनें आपला कार्यक्रम चालवावा यासाठीं शक्तींचें एकीकरण तर अत्यंत महत्त्वाचें आहे.

निरानिराळ्या लोकात परस्पराविषयीं स्नेहसंबंध वाढवून अविश्वास घालविण्यासाठीं काय सस्था आहेत, यांचा प्रथम आढावा घेऊं व तें पाहिल्यानंतर पोलिटिकल क्लबासंबंधानें आपली दिशा ठरवूं.

बहुजनांस एकत्र करणाऱ्या संस्थांमध्यें ख्रिस्ती लोकांच्या देवळांची

गणना केली पाहिजे. येथें सर्व लोक प्रार्थनेसाठीं जमतात. देवळास कांहीं लौकिक गोष्टीदेखील जोडल्या असतात;आणि तेणेंकरून परस्पराचें प्रेमसवर्धन होतें. त्या जोडलेल्या गोष्टी म्हटल्या म्हणजे "चर्च" ला जोडून चहाकॉफीची 'सोशल' असते. 'सोशल' म्हणजे लोकानीं मित्रत्वानें व आनदानें काळ घालवावा यासाठीं योजिलेला प्रसग. हे प्रसग आणल्यामुळें सस्थेचें सवर्धन होतें. सभासद एकत्र आणण्यासाठीं सप्रदायाचीं विशिष्ट तत्त्वें असतातच, पण त्या तत्त्वाच्या योगानें व्यक्ति व संप्रदाय याच्यामध्येंच बधन उत्पन्न होतें. व आनदानें काळ घालविण्यासाठीं जे प्रसंग उत्पन्न करितात त्याच्या योगाने, संप्रदायातर्गत व्यक्तिव्यक्तींत बधन उत्पन्न होऊन त्या सप्रदायातर्गत व्यक्तींची एकत्व-भावना अधिक वृद्धिंगत होते. खिस्ती 'चर्च' ऊर्फ सप्रदायसस्था मडळीस एकत्र जमवितात तें केवळ ख्यालीखुशालीसाठीं नव्हे, तर लोकाच्याकडून सघशक्तीनें अनेक कार्ये घडवून आणितात. देवळाचें उत्पन्न वाढविण्यासाठीं सभा भरवितात, "चर्च" च्या सभासदाच्या लहान लहान तुकड्या करून प्रत्येक तुकडीस काहीं कामें दिलेलीं असतात. उदाहरणार्थ, 'चर्च' च्या सभासदापैकीं जे कोणी गरीब असतील त्यास मदत करण्यासाठीं एखादी कमिटी केलेली असते. दुसऱ्या एखाद्या कमिटीस कोणी आजारी असेल तर त्याच्या समाचारास जाण्याचें काम असतें. कधीं कधीं सामाजिक व काहीं अंशीं राजकीय अशा विषयावर चर्चमध्यें व्याख्यानें होतात. हीं राजकीय व्याख्यानें सर्व पक्षास सामान्य अशा प्रश्नावर होतात. उदाहरणार्थ, एखादा प्रोफेसर आपल्या देशात जे परके लोक येतात, त्यासबंधानें आपलें कर्तव्य काय हा विषय हातीं घेतो. दुसरा, आपल्यामध्यें डायव्होर्स म्हणजे घटस्फोट फार होऊ लागले आहेत म्हणून सांगतो. तिसरा, आपल्या कोणच्या वर्गात गुन्हे फार होत आहेत, व गुन्हे कमी होण्यासाठीं काय केलें पाहिजे याचें विवेचन करितो. कोणी परदेशीं जाऊन आलेला मनुष्य मॅजिक लॅटर्नच्या साहाय्यानें व्याख्यानें देतो. याशिवाय 'आदितवाराचे वर्ग' असतात,–त्यांचा उपयोग हा कीं, सभासदापैकीं जे कोणी उल्हासी आणि बहुश्रुत असतील त्यानीं इतरास बायबलातील काहीं भाग समजावून देण्याचें काम हातीं घ्यावें. कधीं कधीं आदितवाराच्या वर्गात शिकविण्याचें काम लहान मुलांवरदेखील

सोंपविण्यात येतें. या प्रकारच्या संस्थामुळें धर्मतत्त्वें ' आपलीं ' आहेत व त्याच्यासंबधाने विचार करून प्रसार करणें आपलें कर्तव्यकर्म आहे, ही भावना लहान मुलाच्या ठायीं देखील उत्पन्न होते. चर्चमध्यें जीं 'सामाजिक' ( सोशल ) असतात त्याचा उपयोग देखील मोठाच आहे. ' चर्च 'चा जो उपाध्याय असतो तो व त्याची बायको गावातील एकमेकाच्या ओळखी करून देतात. तरुणतरुणींच्या ओळखी होण्यास चर्चचा उपयोग फार मोठा होत असल्यामुळें पुष्कळ तरुण चर्चला जाऊ लागतात. पाश्चात्य देशात प्रीतिविवाह आहे व ते प्रीतिविवाह जुळून येण्यासाठीं मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे एकमेकाच्या ओळखी होणें. आज जर ' चर्चेस ' नसतीं तर पुष्कळ लोकाचीं लग्नेंच झालीं नसतीं.

एवच ' चर्च ' हा एकतऱ्हेचा ' क्लब ' आहे. क्लब निर्हेतुक नसून सहेतुक आहे. त्यातील मुख्य हेतु म्हणजे संप्रदायातर्गत धर्मतत्त्वाचा प्रसार करणें हा होय. धर्मतत्त्वें ज्या लोकास आवडतात, व त्याच्याविषयीं विचार करण्याची ज्याची प्रवृत्ति असते त्या लोकाची ओळख करवावयाची, व त्या लोकाना आपल्या तत्त्वाचा प्रसार इतरामध्यें करण्याची संधि द्यावयाची, सामान्य जनसमूह आणि विचारी जनसमूह याची सागड घालून द्यावयाची; व अनेक लौकिक फायदेदेखील लोकास लभ्य करावयाचे. धर्मसंप्रदाय केवळ तत्त्वाच्या ज्ञानावर टिकून राहात नाहींत. मोठमोठीं देवळें, अगडबब विधि, गायन, नृत्य, गोड गोड प्रसादाची सोय, भोजनें – या गोष्टींची आवश्यकता सामान्य लोकाची भक्ति देवावर जडविण्यासदेखील लागते. ज्या ज्या देशात ईश्वरोपासना दृष्टीस पडतात, त्या सर्व देशात ईश्वराची जाहिरात देण्यासाठीं व त्यास लोकप्रिय करण्यासाठीं वरील सर्व गोष्टी अवश्य आहेत. पुराणें, कथा, कीर्तनें या गोष्टी मुख्यत्वेंकरून ईश्वराच्या व धर्मतत्त्वाच्या मोठ्या कुशलतेने लिहिलेल्या जाहिरातीच आहेत. मुसलमान लोकाच्या मशिदी एका ठराविक दिवशीं सर्व मुसलमानास एकत्र करण्याचें काम करितात. आमच्या हिंदु लोकाच्या देवळाकडून मात्र असें कार्य फारसें होत नाहीं. जेथें एकत्र बसून भजन करण्याचा प्रघात आहे त्या लोकसमूहास मात्र थोडेंसें सहेतुक क्लबाचें स्वरूप येतें. आपणामध्यें जे अनेक पंथ व संप्रदाय आहेत त्यांच्यामध्यें सार्वजनिक तऱ्हेनें उपासना करण्याचा प्रघात थोडाबहुत आहे.

ईश्वरोपासना करावयाची ती सामाजिक पद्धतीनें का करावी हा प्रश्न जसा परमार्थसाधनविषयक आहे तसाच सामाजिकदेखील आहे. धर्मसप्रदायाचा जो पारमार्थिक भाग आहे, त्याविषयीं येथें आपणास कर्तव्य नाहीं. धर्मसंप्रदायाचें जें राजकीय अगर सामाजिक स्वरूप आहे त्याविषयींचें येथें विवेचन केलें आहे.

पोलिटिकल क्लब्स ऊर्फ ' राजकीय संघ ' आणि खिस्ती चर्चें याच्यामध्यें साम्यें अनेक आहेत. तीं येणेंप्रमाणें:—

( १ ) राजकीय सघ आणि पारमार्थिक संप्रदाय हीं दोन्ही काहीं तत्त्वावर स्थापन झालेलीं असतात.

( २ ) दोन्ही सस्थाची खटपट लोकसग्रहणाकडे असते.

( ३ ) दोन्ही सस्थास स्वतःच्या उद्दिष्टानुरूप राजकीय आणि सामाजिक स्थिति निर्माण करावयाची असते.

( ४ ) दोन्ही सस्थासहि आपलें उद्दिष्ट साध्य होण्यास पुष्कळ बाबतींत सारख्याच उपायाची योजना करावी लागते. आपल्या मताचा प्रसार होण्यास, पैसा उत्पन्न होण्यास, सभासदाची संख्या वाढविण्यास जवळ जवळ सारखेच उपाय योजावे लागतात.

मनुष्यसंग्रह करावयाचा तो करण्यास मनुष्यस्वभावाचें ज्ञान तर अत्यत अवश्य होय. निरनिराळ्या प्रकारचे लोक एखाद्या सस्थेस कोणत्या आकांक्षा व इच्छा मनात धरून मिळतील ह्या गोष्टीदेखील संस्थाचालकांस लक्षात घ्याव्या लागतात. सर्वच प्रकारचे लोक आपल्याकडे ओढावेत किंवा नाहीं, आणि मनुष्यसंग्रहासाठीं वाटेल त्या उपायाची योजना करणें हें आपल्या संस्थेच्या इभ्रतीला शोभेल किंवा नाहीं, ही गोष्टदेखील निराळी. मनुष्याच्या इच्छांचें व गरजांचें ज्ञान संस्थाचालकांस पाहिजे;—मग ती संस्था केवळ मौज मारण्याकरितां असो, अगर तिच्यापुढें मोठीं थोरलीं सामाजिक, राजकीय अगर पारमार्थिक ध्येयें असोत. लोकांचें कल्याण जर करावयाचें आहे तर लोक आपणांकडे येतील असें केलें पाहिजे. ज्या गोष्टीचा अनीतीशीं संबंध असेल अशा गोष्टी करूं नयेत म्हणजे झालें. उमरावती येथील एक प्रसिद्ध वकील एकदां म्हणाले, “ काय करावें, आजकाल लोक इतके उदासीन

बनले आहेत कीं, ते व्याख्यानालादेखील येत नाहींत. परवां सर्व्हंटस ऑफ इंडिया सोसायटीच्या एका गृहस्थाचें व्याख्यान झालें. तथापि तें व्याख्यान ऐकावयास पाचच माणसें जमलीं." मीं त्यास म्हटलें, "लोक गाणें ऐकावयास येतील कीं नाहीं ?" ते म्हणाले, "होय." "तर मग गाणें आणि व्याख्यान याची सागड घालावी." असें मी उत्तर केलें. माझें असें मत आहे कीं, लोक जर अगदींच खुळे असले तर लोकाना आपल्याकडे ओढून घेण्यास व आपले शब्द ऐकावयास लावण्यास त्यास जें हवें असेल तेंदेखील केलें पाहिजे. देवावर भक्ति जडविण्यासाठीं जर आपण नाच, गाणें, आणि गोड प्रसादाची सोय करतों, तर पोलिटिकल क्लब लोकास प्रिय करण्यासाठीं तसल्या क्लबास मनोहर अंगें जोडण्यास आपण का कचरावें ? भक्ति करताना आपणास टाळ, मृदंग लागतात. प्रगल्भ विचाराच्या मासिकात आपण गोष्टी घातल्या तर तें मासिकदेखील जास्त पसरेल, व प्रगल्भ विचार प्रसृत होतील, ही गोष्ट लक्षांत आणून जर प्रगल्भ मासिकांत आपण गोष्टी घालावयास कचरणार नाहीं तर पोलिटिकल क्लबांत खेळाची सोय व गाणीं हीं तरी का घालूं नयेत ?"

वरील विधानें केवळ पाश्चात्यांचें अनुकरण करण्यास सांगण्याच्या हेतूनें करीत नाहीं, तर राजकीय संघाचें कर्तव्य लक्षात आणून करतों. पोलिटिकल क्लब कसा असावा या प्रश्नाचे उत्तर – सर्वांत उत्कृष्टपणें चाललेला असा पाश्चिमात्य पोलिटिकल क्लब पाहून व त्याचें वर्णन करून त्या वर्णनानुसार आपला क्लब असावा असें सागणें गैरवाजवी होईल. एखाद्या क्लबाचें उत्तान स्वरूप आपणास शक्य अगर इष्ट आहे असें नाहीं. देशाच्या परिस्थित्यनुरूप राजकीय चळवळींत पडूं इच्छिणारा वर्ग निमित्त होतो. आपल्या देशांत राजकीय कर्तव्येंच आपणांस थोडीं करावयाचीं असतात. त्यामुळें आपला चळवळ्या वर्ग लहानच असावयाचा. शिवाय प्रत्येक देशात राजकीय चळवळीकडे ढुंकूनहि न पाहणारा असा वर्ग असतोच. तो वर्गदेखील आपल्या देशांत आहेच. आपल्या देशातील चळवळ्या वर्ग लहानच आहे. यावरून ती उपेक्षा करण्यासारखा आहे असें मात्र नाहीं. उलट या लहान वर्गावर जबाबदारी मोठी आहे; व ज्या अर्थी या लहान वर्गाचा परिणाम बहुजनसमाजावर व्हावयाचा आहे त्या अर्थीं हा वर्ग जितका परिणतप्रज्ञ

होईल तितका पाहिजेच आहे. या वर्गाची बहुजनसमाजासबधींचीं कर्तव्यें आहेत तीं येणेप्रमाणें:—

पहिलें कर्तव्य, ज्या ज्ञानाच्या साह्यानें देशास हितावह काय आणि अनिष्ट काय या प्रश्नासबंधाने चांगला खल करिता येईल तें ज्ञान वाढविणें, व तत्सबधीं विचार नेहमीं जागृत राहण्याकरिता खल करीत राहणें.

दुसरें एक कर्तव्य म्हटलें म्हणजे, या वर्गास देशहितासबधीं विचार करून ज्या गोष्टी घडवून आणल्या असता देशहित अधिक वृद्धिंगत होईल असें वाटलें असेल त्या गोष्टी घडवून आणणें.

तिसरें एक कर्तव्य म्हटलें म्हणजे, आपल्या मृत्यूनतरदेखील देशहितासबधानें ज्याला कळकळ आहे असा वर्ग देशात राहील अशी खबरदारी घेणें.

चवथें एक कर्तव्य म्हटलें म्हणजे स्वतःस अनुकूल असा मोठा जनसमूह निर्माण करणें. कारण बहुजनसमूहाचें पाठबळ मिळाल्याशिवाय या प्रकारचें कार्य होणें शक्य नाहीं.

देशातील तत्त्ववेत्ते समाजशासनासबधाने अगर देशहित कशात आहे यासंबधानें जे विचार उत्पन्न करितात त्या विचाराचा परिणाम लोकावर एक तर केवळ लोकमत तयार होऊन होतो, अगर ते विचार कायद्याच्या स्वरूपानें अस्तित्वात येतात बौद्धिक दृष्टया श्रेष्ठ वर्गाचें वर्चस्व राज्यसूत्रावर असलें म्हणजे या लोकाच्या विचारास सामाजिक व राजकीय महत्त्व येतें. या विचाराचें राजकीय महत्त्व वाढविण्यासाठीं त्या विचाराचें प्राबल्य करविलें पाहिजे, म्हणजे त्या विचारासबधानें अनुकूलता लोकात उत्पन्न केली पाहिजे. ही अनुकूलता इतकी उत्पन्न करावयाची कीं, कायदे करणाऱ्या वर्गास ते लोक त्या विचारानुसार कायदे स्वयप्रेरणेने व लोकात प्रबल झालेल्या मतास विरोध करण्यामुळें जी अप्रियता उत्पन्न होते. ती टाळण्याच्या भीतीनें तरी पास करून टाकतील. देशावर उन्नत विचाराचा परिणाम घडविण्यास कायदे हें एक साधन होय. कायदे घडवून आणणें हें साध्य साधण्यासाठीं 'चळवळ' हें साधन होय. व चळवळ करण्यासाठीं 'पोलिटिकल क्लब' हें साधन होय. मागें विचारी

मंडळींचीं जीं चार कर्तव्यें निर्देशिलीं तीं कर्तव्ये करण्यास पोलिटिकल क्लब हें एक यंत्र आहे. आपणास परिणाम काय घडवून आणावयाचा आहे तो मनात आणून ज्याप्रमाणें यंत्रयोजना करावी लागते, त्याप्रमाणें कर्तव्यें लक्षात घेऊन पोलिटिकल क्लबाचें स्वरूप निश्चित करावें लागतें. या सघानीं काय करावें हें थोडक्यात सागावयाचें म्हटलें, तर लोकाना जागृत ठेवण्याकरिता काहीं तरी चळवळ कायम ठेवावी, सामान्य, उच्च आणि नीच या वर्गाचा सबध आणावा, आधुनिक चळवळ्या वर्ग नष्ट झाला तरी चळवळ कायम राहवी यासाठीं तरुणास उत्तेजन द्यावें, क्लबाचें चिरस्थायित्व कायम राहण्यासाठीं क्लबास काहीं मोठी मालमत्ता देणगी म्हणून द्यावी, व नवीन विचार उत्पन्न करावेत म्हणून समाजशास्त्र, अर्थशास्त्र इत्यादि शास्त्राच्या अभ्यासास उत्तेजन द्यावें.

या शास्त्राच्या अभ्यासास जे उत्तेजन द्यावयाचें तें देण्यास युनिव्हर्सिटयासारखें चागलें स्थान दुसरें नाहीं. समाजशास्त्राचा अभ्यास करणें सोपें नाहीं. हा अभ्यास करण्यास त्याच विषयास वाहिलेले लोक पाहिजेत. तसे लोक समाजात नसले म्हणजे अर्वाचीन ‘सुधारका’त आहे त्याप्रमाणें केवळ ठरलेलींच वाक्यें पुन्हा पुन्हा कटाळवाण्या अगर आलकारिक भाषेंत उच्चारणाऱ्या लोकाचा देशात सुळसुळाट होतो; व दहापाच तत्त्वें नाम० दादाभाईपासून शिकून तींच आर्तस्वरानें उच्चारणारे जाडे मुत्सद्दी तयार होतात. अडाणी सुधारक आणि अडाणी मुत्सद्दी असले म्हणजे कार्यें फलित होत नाहींत, व देशात होणाऱ्या प्रयत्नास फळ मिळेनासें झालें म्हणजे देशात नैराश्यवाद पसरतो. गेल्या पिढींतील सुधारकाना व राजकीय चळवळ्याना न रुचणारीं वाक्यें वर लिहिलीं, याचें कारण दुसऱ्याच्या अतःकरणास झोंबेलसें लिहिल्यानें मला आनद होतो असें नाहीं, तर समाजशास्त्राच्या पद्धतशीर अभ्यासाचें महत्त्व मला दाखवावयाचें आहे, व पूर्वोक्त चळवळ्याच्या कार्याची किंमत शास्त्रीयदृष्टया अभ्यास करणाऱ्याला किती वाटते हें स्पष्ट भाषेंत कळवावयाचें आहे, एवढेंच. पोलिटिकल क्लबास या शास्त्राच्या अभ्यासास युनिव्हर्सिटयाइतकें जरी उत्तेजन देता येणार नाहीं

तरी बक्षिसें लावून संशोधकाकडून संशोधन करवून घेता येईल, व या तऱ्हेनें उत्तेजन देता येईल

'राजकीय क्लब' जे स्थापन होतात ते केवळ तात्त्विक विचार करून आपण ज्या गोष्टी करायच्या म्हणून ठरवितों त्या गोष्टींचा प्रसार करण्याकरिताच स्थापन होत नाहींत. मनुष्याच्या ज्या इच्छा असतात त्या त्यास घडवून आणावयाच्या असतात, व त्या घडवून आणण्यासाठीं संघ निर्माण होतात. जनसमूहापैकीं ज्या कोणत्या वर्गास आपले हित साधावयाचें असतें तो वर्ग आपल्या हिताच्या रक्षणार्थ धडपडेलच. तसेच देशहित कशाने साधणार आहे, याचा निश्चय झाला म्हणजे त्यासंबंधाच्या सिद्धान्ताचा प्रसार करावयाचा असतो. कांहीं व्यक्तींची अशी खात्री होते कीं, अमुक मार्गानें देशहित होणार, त्या प्रश्नासंबंधानें आता विनाकारण खल करून वेळ दवडण्यात अर्थ नाहीं आता खल करावयाचा तो केवळ लोकास आपल्यासारखें करण्यासाठीं. 'कार्यकारी' असे जे क्लब होतात ते केवळ याच प्रकारचे होत. 'वावदूक' क्लब खरोखर तत्त्ववेत्त्याचा होय, तो राजकीय म्हणजे राज्यशासनावर परिणाम करणारा नव्हे या प्रकारच्या कार्यकारी राजकीय क्लबानीं जें काम करावयाचे त्याचे आता आपण वर्गीकरण करू.

पहिलें काम म्हटलें म्हणजे, जीं मतें क्लबास मूलभूत असतील त्यांचा व देशाच्या उन्नतीसाठीं काय केले पाहिजे यासंबधींच्या विचाराचा प्रसार करावयाचा. प्रसार करावयाचा म्हणजे जीं मतें अगर माहिती समाजाच्या अगर देशाच्या ज्या भागात नसेल त्या भागात उत्पन्न करावयाची. कांहीं क्लब पक्षमूलक असावयाचे, आणि ते तसे असलेच पाहिजेत. तथापि असल्या क्लबानीं आपल्या केवळ पक्षविशिष्ट कल्पनाच लोकात पसरावयाच्या, अगर तेवढ्याचेंच चर्वितचर्वण करावयाचें असें करू नये. कारण असल्या एका क्लबात एकतर्फीच मतें प्रतिपादिलीं जातात, व त्याचा पुनरुच्चार ऐकण्यापलीकडे त्या क्लबाच्या सभास जाऊन कांहीं फायदा होणार नाहीं, असें लोकास एकदा समजलें म्हणजे त्या क्लबाकडे कोणी ढुंकून पाहणार नाहीं. तथापि देशहिताच्या सर्वसामान्य गोष्टींची चर्चा त्या क्लबात होऊ लागली

म्हणजे बरेच लोकहि त्या क्लबात व्याख्यानासाठीं येऊ लागतील. असें झाल्यानें इतर लोकहि प्रथमत· तिकडे जाऊ लागतील, व कांहीं काळानें त्या सस्थेचे अभिमानीदेखील होतील. सामान्य लोकास राजकीय सघात ओढणें हें सघाचे दुसरे काम आहे. राजकीय क्लबात, आपल्या क्लबाचें महत्त्व गावात स्थापन करण्याकरिता जितका इतर दिखाऊपणा लागेल तितका केला पाहिजे, व बहुजनसमाजास ज्या गोष्टी आवडतात त्या गोष्टींचा अतर्भाव केला पाहिजे. पुढारी होऊ इच्छिणाऱ्या मनुष्यास आपल्याकडे लोक ओढून घेण्यासाठीं ज्याप्रमाणे पोषाखाचा डामडौल, घोडागाडी, या सर्व गोष्टी ठेवाव्या लागतात व निवडणुकीच्या दिवसात सभासद होऊ इच्छि-णाऱ्यास मतदाराना मेजवान्या वगैरे द्याव्या लागतात, त्याचप्रमाणें एखाद्या राजकीय सप्रदायाची गोष्ट आहे.

पूर्वी ज्या वेळेस धर्मज्ञान लोकास करून द्यावयाचे होतें त्या वेळेस धर्मज्ञानप्रसारार्थ चळवळ करणाऱ्यानीं एका गोष्टीवर जोर दिला. ते म्हणत, धर्मज्ञान हें केवळ पडिताकरिता नाहीं, तर स्त्री-शूद्राकरिता आहे शासन-धर्माच्या म्हणजे राजकीय तत्त्वाविषयीं बोलतानादेखील ह्याच वाक्याचा पुनरुच्चार केला पाहिजे राजकीय चळवळी केवळ कायदेपडिताकरिता नाहींत, तर स्त्री-शूद्राकरितादेखील आहेत. महाराष्ट्रात जे जे क्लब आहेत ते ते कसे असावेत हें सागत बसण्यापेक्षा त्यात आढळून येणाऱ्या दोषाची नामावलि वाचली म्हणजे अधिक उपयोग होईल

आपल्या क्लबातील एक मोठा दोष म्हटला म्हणजे, तो क्लब फक्त पाढरपेशाचाच होतो हा होय. आपल्या क्लबातून कुणबी, मराठे, वाणी, मारवाडी इत्यादिकाचा समावेश करण्याचा आपण प्रयत्न करीत नाहीं. अर्थात् आपल्या चळवळी काय काय होतात, आपलीं ध्येयें काय आहेत इत्यादि कल्पना मारवाडी, शेतकरी, दुकानदार इत्यादिकामध्यें शिरत नाहींत; व त्यामुळें त्याच्या साहाय्यास व सहानुभूतीस आपण मुकतों. वर्गणी गोळा करावयाची झाली तर तिचा बोजा पाढरपेशावरच पडतो, इतरावर पडत नाहीं. आपण पाढरपेशे लोक राष्ट्रापासून इतके अलिप्त असता राष्ट्राच्या प्रतिनिधीचें पद आपणास आहे असा हट्ट धरून बसतों हा आपला

निव्वळ दुराग्रह आणि उद्धटपणा आहे. बहुजनसमाजाचे आपण प्रतिनिधी आहोंत असा हट्ट धरताना आपल्या आधळेपणाखेरीज तिऱ्हाइतास काय बरे दिसून येणार आहे ?

आपल्या क्रबामध्यें स्त्रीवर्ग तर मुळींच नाहीं. सुखदुःखाचे भागीदार आपण पुरुषच आहोत, स्त्रीवर्ग जणू काय अस्तित्वातच नाहीं. 'देश' मरो अगर जळो,–बायकाना त्याच्याशीं काहीं कर्तव्य नाहीं, अशीच आपली भावना आहे कीं काय कोण जाणे. स्त्रियाचें राजकीय कर्तव्य आज अगदीं सक्षिप्त असलें तरी तें अगदीं नाहीं असे नाहीं. ज्या विचारानीं पुरुष प्रेरित होतात त्याचा प्रसार स्त्रियातदेखील झाला पाहिजे. तसें झालें नाहीं तर आपल्या गृहसौख्यावर व तसेंच कर्तव्यबुद्धीवर अनिष्ट परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. एकच उदाहरण घेतों. कल्पना करा कीं, एखाद्या मनुष्यास देशाकरिता स्वार्थत्याग करावयाचा आहे. या स्वार्थत्यागाचें महत्त्व कळण्याइतकी व त्याच्या त्या इच्छेबद्दल नवऱ्याविषयीं आदरबुद्धि वाटण्याइतकी तरी त्याच्या बायकोची बौद्धिक स्थिति असली पाहिजे. ती तशी नसली तर बायकोस नवऱ्याविषयीं आदर वाटणार नाहीं. एखादी मोठी नोकरी सोडून देणाऱ्या नवऱ्याबद्दल त्याच्या बायकोस, त्याच्या नोकरी सोडण्यानें तिच्या सुखात अतर पडल्यामुळें आदर न वाटता तिरस्कार वाटेल. व दुसऱ्या बायकाच्या घरची मडळी कसे पैसे मिळावितात आणि तुम्ही मिळवीत नाहीं असें सागून ती त्याचा जीव नकोसा करील. लोकाच्या मनात एखाद्या मनुष्याविषयीं सन्मान आहे; तथापि त्याच्या बायकोच्या मनात बिलकूल नाहीं, अशा गोष्टी थोड्या थोडक्या नाहींत. विद्या म्हणजे काय ? कोणास विद्वान् म्हणावयाचें या कल्पना अशिक्षित स्त्रियास येणारच नाहींत. आणि विद्वान् नवऱ्याचा विद्येबद्दल अशिक्षित स्त्रियास अभिमानदेखील वाटणार नाहीं. त्याच्या तर्कशास्त्राप्रमाणें जो मनुष्य अधिक पैसे मिळावितो तो अधिक विद्वान्. नवऱ्याविषयीं बायकोच्या मनात आदरबुद्धि वाढावी ही गोष्टी अनावश्यक आहे हें स्त्रीशिक्षणास अत्यंत नाके मुरडणारे लोक देखील म्हणावयाचे नाहींत. राजकीय चळवळींमध्यें पडून स्वतःचें अकल्याण करून घेणारा नवरा सन्माननीय आहे हें जर स्त्रियास भासणें समाजास अवश्य असेल तर शासनविषयक व पक्षविषयक कल्पना थोड्या अंशीं तरी स्त्रियात उत्पन्न झाल्य

पाहिजेत. पोलिटिकल क्लबामध्यें स्त्रियाचा प्रवेश करवून राष्ट्रहिताच्या कामासाठीं त्याच्या बुद्धीप्रमाणें काहीं अशीं तरी त्यास लावणें हें राष्ट्रास हितावह होईल. सध्याच्या स्थितींत बायकाच्या उत्साहनाशक शब्दानीं स्वतःची तगडीमोड करून घेऊ इच्छिणाऱ्याने एक तर अविवाहित राहिलें पाहिजे; अगर मी वाटेल तें करीन, तू चुलीपुढें स्वयपाक कर व दुसरें काहीं एक करू नको – असे बोलून प्रसगीं यष्टिप्रयोग करून बायकोस गप्प केलें पाहिजे. अगर अडाणी बायकोच्या बुद्धीनें आपल्या आयुष्याचें अगर कर्तव्याचे नियमन करून घेतलें पाहिजे.

सघानीं आपलें काम करताना एक कर्तव्य विसरता कामा नये, तें हें कीं, आपल्या देशात जो एकलकोंडा स्वभाव आहे तो घालवून देऊन लोकास सघेच्छु बनविले पाहिजे. जे लोक सघेच्छु नसतील त्यापेक्षा केवळ चहा पिण्याकरिता आणि विडया ओढण्याकरिता एकत्र जमणारे लोक देशहिताच्या दृष्टीनें अधिक चागले हें लोकास बजाविलें पाहिजे.

आपल्या देशात लोकात मिळून मिसळून वागण्याची सवय बिलकूल नाहीं "आपण बरे कीं आपलें घर बरें" हें तत्त्वज्ञान आपल्या हाडींमासीं खिळलेले दिसतें. एकीकडे तर आपण आम्हास स्वराज्य हवें असें म्हणतों, व समतेच्या कल्पना इंग्रजी ग्रथातून शिकून त्याचे गोडवे गातों, व दुसरीकडे पाहिलें तर आपलें आचरण त्या कल्पनाच्या अगदीं विरुद्ध असतें. ज्या गावात वकील वगैरे मडळींचा क्लब असतो त्या गावात त्या क्लबासंबधानें विलक्षण गप्पा पसरलेल्या असतात. एक म्हणतो, तेथें ब्राह्मण लोक 'मटन' खातात. दुसरा म्हणतो, त्या क्लबाचे दारूचे बिल दरमहा पाचशें रुपयावर होतें ! याचें कारण एवढेच असतें कीं, ज्या ठिकाणीं काहीं विवक्षित मडळी-खेरीज करून इतर कोणी जात नाहीं त्या मडळीसबधानें बऱ्याच वेड्या-वाकड्या कल्पना लोकात पसरवावयाच्या म्हटल्या तरी तें शक्य होतें. शिवाय एकत्र जमून गप्पा मारण्यासाठीं व विनोदानें काळ घालविण्यासाठीं पैसे खर्चणें हें तर लोकास अजून शिकावयाचेंच आहे. पुष्कळ लोक जेथें जाण्यास पैसे पडतात तेथें जात नाहींत, व आपण का जात नाहीं असा कोणीं प्रश्न विचारला म्हणजे स्वतःचा कजूषपणा स्पष्टपणें न सागता त्या संस्थातले दोष

काढण्यास प्रवृत्त होतात एवढेंहि येथे सागितलें पाहिजे कीं, आपल्याकडील क्लबासारखे निर्हेतुक सघ पुष्कळ लोकाम आवडणार नाहींत. ज्याप्रमाणें पुष्कळ लोकास तत्त्ववेत्त्याच्या मडळींत चहा-काफीची सोय करणें अवश्य वाटते, व ती केली नाहीं तर तो सघ आवडत नाहीं, त्याप्रमाणें निव्वळ चहा-कॉफीच्या क्लबात वेळ दवडणे ' विचारी लोका 'स आवडत नाहीं. क्लब चागला लोकप्रिय व सर्वमान्य होण्यास शरीर व मन या दोहोंसहि पुष्ट करणाऱ्या व आनदविणाऱ्या गोष्टी पाहिजेत. येथें कोणी असा प्रश्न उपस्थित करील कीं, राजकीय म्हणजे शासनविषयक प्रश्नावर लोकामध्यें विवक्षित स्थिति उत्पन्न करण्यासाटीं केवळ बुद्धिगोचर वादविवादाखेरीज अन्य उपायाचा उपयोग करावा कीं नाहीं? लोकामध्ये जर एखादे मत पसरवावयाचें असेल तर तेथें चहा-कॉफीचा उपयोग का करावयाचा? मतें लोकास सागावींत म्हणजे झालें. आपणाकडे लोक ओढून घेण्याचें कारण काय? अनुयायी उत्पन्न का करावयाचे, शिष्टमडळें का बनवावयाचीं?

याला उत्तर एकच आहे. मनुष्यस्वभाव केवळ मतार्थी नाहीं. एखाद्या राजकीय अगर धर्मविषयक अगर परमार्थविषयक सप्रदायाचे लोक अनुयायी बनतात ते केवळ विवक्षित तत्त्वें त्यास पटलीं म्हणून बनतात असें नाहीं. कित्येक लोक तर आपणास चार चागली मित्रमडळी मिळाली म्हणून एखाद्या साप्रदायाच्या सघाचे सभासद होतात कित्येक लोक असे आहेत कीं, एखाद्या सघानें प्रत्येक सभासदाकरिता काहीं बिल्ला वगैरे काढला म्हणजे तो बिल्ला आपणास वापरावयास सापडावा म्हणून सभासद होतात मला अशी अनेक पदवीहीन व ज्ञानहीन मडळी ठाऊक आहेत कीं त्याच्या दृष्टीने रॉयल एशियाटिक सोसायटीचे सभासद का व्हावयाचें,-तर आपल्या नावापुढें एम. आर ए एस. अशीं अक्षरे लिहिता यावींत. काहीं मडळी एफ् टी एस्. हीं अक्षरे नावापुढे लिहिता यावींत याकरिता थिऑसफीच्या अव्वल दिवसात त्या सस्थेचे सभासद झाली होती एखाद्या संस्थेचे गोंडे अगर बिल्ले अगर दुसरीं उपकरणें आपल्या अगारवाद्यावर नाचविण्याची इच्छा सार्वत्रिक आहे. लोकास परमार्थसाधन शिकवून त्याचा उद्धार करावा, या इच्छेनें स्थापन झालेल्या सस्थादेखील आपलें उत्पन्न वाढविण्यासाठीं व लोकास अधिकाधिक उपदेश करण्यासाठीं लागणारें लोकसाहाय्य व द्रव्य-

सामर्थ्य वाढविण्याच्या हेतूनें उपदेशाखेरीज इतर उपायाची उपेक्षा करीत नाहींत, व केवळ विद्वान् लोकाच्या मडळ्या आपलें अस्तित्व कायम रहावें यासाठीं दिखाऊ पदवीस भुलून आपणाकडे येऊ पाहणाऱ्या लोकाची उपेक्षा करीत नाहींत, तर शासनविषयक विचाराचा प्रसार करण्यासाठीं स्थापन झालेल्या मडळ्यास हीं उपकरणे अधिकच अवश्य होत.

लोकहितार्थ ज्या कल्पना राजकीय सघात वागत असतील त्या कल्पनाचा प्रसार होऊन लोकमत अनुकूल झालें म्हणजे, त्या कल्पनाचा परिणाम शासनयत्रावर घडविणें हें त्या कल्पनासबधाचें दुसरें कर्तव्य होय. मतदार लोकास एकत्र करणें, त्यास आपल्याकडे ओढून घेणे, त्यास विचाराची तालीम देणें हें आणखी एक कर्तव्य होय. ज्या शहरात राजकीय सघ असेल त्या शहरात जे मत देणारे लोक असतील त्याच्याकडे वारवार जाऊन त्यास सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे. शहरातून जे मतदार आहेत त्याच्याकडे वर्षातून केवळ एकदा जावयाचें असें करणे बरोबर नाहीं. कल्पना करा कीं, एक मनुष्य वर्षातून एकदाच मतवाल्याकडे जातो, व दुसरा मनुष्य या मतवाल्यास वारवार भेटत असतो या दोन प्रकारच्या मनुष्यात वारंवार भेटणारा मनुष्य अधिक यशस्वी होईल यात शका नाहीं. कर्तव्यबुद्धीचा विचार जरी घटकाभर बाजूस ठेवला व स्वत.ची महत्त्वाकाक्षा तृप्त करणें हा विचार जरी मनात आणला तरी तेवढ्यावरून मतदाराशीं अधिक सबध ठेवण्याचे काम अवश्य होईल. मतदार लोक आजकाल आपल्या शहरातून शिक्षणानें व सस्कृतीने कमी योग्यतेचे असतात, पण तेवढ्यावरून त्याच्याशीं बोलणें चालणें व दळणवळण ठेवणे हें हलकेपणाचें आहे असें नाहीं लोकास राजकीय हक्क देण्याचे जे हेतू आहेत त्यात खालच्या व वरच्या लोकात दळणवळण वाढवावे, व खालच्या लोकाची सस्कृति सुधारावी हा तर प्रधान हेतु आहे. अशिक्षित लोकामध्यें अनेक दोष असतील, तथापि कर्तव्यबुद्धीची जागृति ह्या वर्गात करून देणें हें अगदींच अशक्य आहे असें नाहीं चागल्या व लोकहितार्थ झटणाऱ्यास आपलें मत आपण द्यावें ही इच्छा अडाणी लोकातदेखील असते. पण आज मत देणाऱ्या लोकास उमेदवार वर्षातून एकदा काय ते भेटतात, व मत मागण्यासाठीं येतात. त्यास आज 'गोडबोले'हि सारखाच आणि 'नसरवानजी'हि सारखाच. दोघेहि दूर दूर राहणारे

व वर्षातून एकदा तोंड दाखविणारे. अशा वेळेस मतदारानीं तरी काय करावें ? गोडबोले तत्त्ववेत्त्यापेक्षा गुत्तेवाला साहेब नसरवानजीच त्याच्या असला तर अधिक ओळखीचा असावयाचा. मतदारास वर्षभर आपल्या सघाशीं सबध ठेवण्यास जर उत्तेजन दिलें तर मतदाराची बौद्धिक स्थिति सुधारेल. मतदारास आपलीं मतें व विचार सागण्यात कमीपणा कोणासहि येणार नाहीं. राजकीय संघ निर्माण व्हावयास व त्यास अडाणी लोक जोडावयास खरी अडचण बहुजनसमाजाची हीन स्थिति आहे हें नसून, खऱ्या पुढाऱ्याच्या अगीं अवश्य असलेल्या गुणाचा अभाव आहे सुशिक्षितानीं अशिक्षिताकडे कसें जावें, व राजकीय विचाराची तालीम लोकास कशी द्यावी, व कल्पनायुक्त मनुष्यानीं इतर लोकास आपल्याकडे ओढून घेऊन सस्था हस्तगत कशा करून घ्याव्यात या महत्त्वाच्या विषयावर पुढें कधीं तरी लिहीन.

६

# नगरसंवर्धन आणि नगरसौंदर्य

आपल्या देशात म्युनिसिपालिट्यांची कर्तव्यासंबधानें कल्पना फारच कोती आहे.

शहर अगर संस्थान यांची स्वकर्तव्यासंबंधानें जी कल्पना असते, तीस दोन कारणें असतात. एक तर राज्यपद्धतीप्रमाणें शहराचें कर्तव्य काय, व राज्याचें म्हणजे संस्थानाचें अगर देशाचें कर्तव्य काय, हें कर्तव्याची वाटणी होऊन ठरलेलें असतें. उदाहरणार्थ, जर शहर हेंच स्वतंत्र संस्थान असलें तर परराज्याबरोबर राजकारण शहरास करावें लागतें. मग हें, शहर एका मोठया राज्याचा भाग असेल तर तो व्यवहार शहरास करावा लागत नाहीं. राष्ट्राच्या अंतर्व्यवस्थेंत शहराचें काम शहराकडे किती सोंपवावें, व किती सोंपवू नये हें निश्चित नसतें. यासंबंधानें पुष्कळ ठिकाणीं भेद आढळून येतो.

नगर अगर राष्ट्र यांची स्वकर्तव्यकल्पना निश्चित होण्यास दुसरें एक कारण असतें. आपल्या सत्तेखालीं जो जनसमूह आला असेल, त्यासंबधानें आपलें ध्येय काय? या विषयावर त्या राष्ट्रातील तत्त्ववेत्ते जे विचार प्रगट करतील, त्या विचाराचा परिणाम लोकांवर व लोकनियुक्त सत्ताधारी वर्गावर होतो

ग्रीससारख्या देशात शहर म्हणजे एक तऱ्हेचें राज्यच होतें. तेथें शहरासंबधानें नागरिकांचीं कर्तव्यें काय आहेत यासंबधाची कल्पना देखील उज्ज्वल होती. इंग्रजींत 'सिटिझन्' याचा अर्थ केवळ शहरात राहणारा इतकाच नाहीं, तर एखाद्या रियासतींत राहणाऱ्या सर्व लोकांस व विशेषें-करून त्या रियासतीचें सूत्रचालन ज्या लोकांच्या हातीं अंशेकरून असतें त्यास हा शब्द लावण्यात येतो. ते सर्व लोक शहरातच राहणारे नसतात. तथापि सर्वच लोकांस 'सिटिझन्' म्हणजे 'नगरवासी' असा शब्द

लावण्यात येतो याचें कारण ग्रीस देशात जी परिभाषा ठरली ती इंग्रजींत राहिली हें होय. मराठींत आपण नागरिक हा शब्द लावतों याचें कारण इंग्रजी शब्दाचें आपण रूपातर केले हें होय. पडिता रमाबाई यानीं 'नागरिक' या शब्दास आक्षेप घेऊन "जानपद" हा शब्द सुचविला होता, पण तो रूढ झाला नाहीं "नाकरिक" हा शब्द सस्कृतमध्यें 'सभ्याचारयुक्त मनुष्य' या अर्थानें वापरतात. असो. सध्याच्या परिस्थितींत ग्रीकाची उज्ज्वल कल्पना व्यवहार्य नाहीं तथापि त्याचीं ध्येयें जर आपण लक्षात ठेवलीं तर बराच फायदा होणार आहे. प्राथमिक शिक्षण व शहराची साफसफाई, पाण्याचा पुरवठा व रस्त्यात दिवे लावणें यापलीकडे आपल्या नागरिकत्वाच्या कर्तव्या-विषयींच्या कल्पना जात नाहींत, परतु आपल्या त्या कल्पना अधिक विस्तृत व्हाव्यात यासाठींच हा लेख लिहीत आहे.

## जनपदाच्या संस्कृतींत नगराचें स्थान

आज आपल्या देशात शहर म्हणजे केवळ राष्ट्रभाग ऊर्फ जनपदाचा भाग आहे व शहराचें कर्तव्य आपल्या लक्षात येण्यासाठीं राष्ट्रामध्यें शहराचें स्थान काय या विषयाकडे आपण प्रथम लक्ष दिलें पाहिजे

शहर हें सस्कृतीचें केंद्र होय आसपासचीं खेडीं आपल्या अनेक गरजा शहरात जाऊन भागवतात ज्या गोष्टी खेड्यात मिळत नाहींत त्या शहरात मिळतात नाटकगृहें, विद्यापीठें, पुस्तकालयें इत्यादि गोष्टींमुळें देखील अनेक लोकाचे पाय शहराकडे वळतात चागले कपडे शिवणारे शिंपी, कुशल सुतार, सोनार, लोहार, चाभार इत्यादि वर्ग शहरात असतात, यासाठीं चागल्या मालाचे ग्राहक शहराकडे धाव घेतात. बहुतेक खेड्यात वाण्याचीं दुकानें देखील चागलीं नसतात. त्यामुळें तो सौदा देखील खेड्यातील लोकास शहरातच करावा लागतो.

खेड्यात होणारा माल ज्या लोकास विकून टाकावयाचा असतो त्या लोकास तर शहरातच यावें लागतें. शिवाय शेतकामासारखें काम बहुतेक लोकास कंटाळवाणें वाटतें, व यासाठीं नोकरी मिळाली तर ती शहरातच पहावी अशी पुष्कळ लोकास इच्छा असते. शहराची भरभराट अर्थात् लोकास अनेक कामाकरिता शहरात यावें लागतें या गोष्टीवरच अवलबून

असते. जें शहर लोकास आपल्या व्यापारधंद्यासाठीं अगर इतर गरजा भागविण्यासाठीं शहरात येणाऱ्यास उत्तेजन देईल तें शहर अधिक भर-भराटेल यात नवल तें कोणतें ? शहराच्या कार्यकारी संस्थेचें म्हणजे म्युनिसिपालिटीचें अथवा तेथील नगरहितेच्छु नागरिकाचें कर्तव्यकर्म कोणतें हें ज्यास समजून घ्यावयाचे असेल, त्याने जनपदाची कोणतीं कामें शहर करितें याचें सूक्ष्म अवलोकन करावें. व शहर सुधारण्याकरिता म्हणजे शहराकडून जनपदाची सेवा अधिक चागली घडवून आणण्याकरिता प्रयत्न करावा शहराची उत्तरप्रकारें सेवा करावयाची म्हणजे राष्ट्राची सेवा करण्यात आपल्या शहरास उत्तम प्रकारें मदत करावयाची हें होय. म्युनिसिपालिटी सर्व लोकाचें हित साधण्याचा सर्व लोकानीं एक होऊन प्रयत्न करण्यासाठीं निर्माण झालेली मडळी होय. ही गोष्ट ज्याच्या हृदयास पटली तोच मनुष्य म्युनिसिपालिटीचा सभासद होण्यास योग्य होय. शहरा-तील लोकानीं म्युनिसिपालिटीचें वर सागितलेलें कर्तव्य लक्षात ठेवून सभासदाकडून सद्भावानें काम करून घ्यावें. जो मनुष्य हें काम करण्यास योग्य नसेल त्यास घालवून देण्याचा प्रयत्न करावा.

शहरात येणाऱ्या लोकाचें वर्गीकरण करून त्या वर्गाच्या वृद्धीस कोणत्या गोष्टी कारण होतात याचा विचार करू. पहिला वर्ग कायमच राहणाऱ्याचा हा वर्ग बराच मोठा असतो. "कायमचा रहाणार" या शब्दाचा अर्थ एवढाच कीं, त्याचे उपजीविकेचें स्थान शहरच आहे या वर्गात अनेक प्रकारच्या लोकाचा समावेश होतो. सरकारी नोकर, उच्च प्रकारच्या धंद्यातील लोक ( उदाहरणार्थ डॉक्टर, वकील वगैरे, दुकानदार, कारागीर, ठोक व्यापार करणारे, दलाल, कारखानदार इत्यादि माणसें ) या वर्गात येतात शहरातील लोक परस्परावलबी असावयाचेच व यामुळें बहुतेक धंदे शहरात चालतात उदाहरणार्थ, सुताराम सोनाराची गरज असतेच, या दोघास व इतर धंद्यातील लोकास शिंप्याची गरज असते; सर्वच लोकास न्हाव्याची गरज असते परस्परावलबनानें बहुतेक धंदे चालतात. तथापि या लोकाचे उत्पन्न काहीं अशीं बाहेर गावाहून येणाऱ्या लोकावर अवलबून असतें. शहराची लोकसख्या केवळ कायमच्या परस्परा-वलंबी धंद्यानें वाढत नाहीं, लवकरच समाजाची वाढ थाबते. शहरात

लागणाऱ्या गरजा निरनिराळ्या वर्गांकडून जोंपर्यंत पूर्ण झाल्या नाहींत व जोंपर्यंत एखाद्या धंद्यास .वाजवीपेक्षां अधिक किफायत होते तोंपर्यंत ती गरज पुरविणारा वर्ग वाढतो व समाजाची वाढ लवकरच खुंटल्यासारखी होते; अगदींच खुंटली नसेल तरी वृद्धि मंदगतीनें होते.

शहरांत कायमच्या राहणाऱ्या लोकांची वृद्धि होण्यास दोन गोष्टी कारण होतील. एक तर सर्व धंद्यांस जो आश्रय केवळ एकाच शहरांत राहणाऱ्यांना परस्परांकडून मिळतो त्यापेक्षां निराळें कांहीं तरी द्रव्यसाधन झालें पाहिजे. तसें द्रव्यसाधन झाल्याशिवाय शहराची वृद्धि होणार नाहीं, एवढेंच नव्हे तर खेड्याचें शहरहि बनणार नाहीं. न्हावी, शिंपी, सोनार, लोहार हे तर खेड्यांपाड्यांतून देखील असतात व खेडयामध्यें देखील परस्परांकडून आश्रय मिळतो. असें असतां देखील खेडयांची लोकवस्ती फारशी वाढत नाहीं. केवळ एका स्थानावर राहणाऱ्या लोकांकडून मिळणाऱ्या परस्पर आश्रयाखेरीज जर इतर कोणताहि आश्रय कोणत्याहि स्थानांतील लोकांस मिळाला नसता, तर शहरें उत्पन्नच झालीं नसतीं व खेडयाखेरीज देशांत दुसरें कांहींही नसतें. तथापि वस्तुस्थिति अशी नाहीं.

निरनिराळ्या धंद्यांतील स्थानिक अन्योन्याश्रयाखेरीज शहराच्या वृद्धीस व पुष्कळ अंशीं अस्तित्वासच कारण गोष्ट म्हटली म्हणजे शहरांतील लोकांचा व राष्ट्रामधील इतर लोकांचा संबंध ही होय. हा संबंध अनेक प्रकारचा असतो. एक तर शासनविषयक संबंध होय. पुष्कळ शहरें तालुक्यांचीं, जिल्ह्याचीं अगर सबंध राज्याचीं ठिकाणें असतात. तालुका, जिल्हा, प्रांत, राष्ट्र यांतील पैसे गोळा केले जाऊन, ते कांहीं विवक्षित ठिकाणीं खर्च केले जातात व तो खर्च नगरांच्या स्थापनेस अनेक प्रसंगीं कारणीभूत होतो.

आपल्या देशांत बहुतेक जीं मोठीं शहरें आहेत त्यास कारण हेंच आहे. काहीं मोठीं शहरें जिल्ह्याचीं ठिकाणें आहेत, कांहीं प्रातांचीं ठिकाणें आहेत व कांहीं संस्थानांच्या राजधान्या आहेत. शहरांतील लोकाचा व राष्ट्रांतील इतर लोकांचा दुसरा आणखी संबंध म्हणजे व्यापार-विषयक, शिक्षणविषयक, इत्यादि प्रकारचा होय. बहुतेक प्रसंगीं शासन-

विषयक संबंध असला म्हणजे इतर प्रकारचा संबंध आपोआपच उत्पन्न होतो. खेड्यातील अधिक खर्च करणाऱ्या लोकांचा म्हणजे उच्च तऱ्हेच्या गरजा भागविण्याची सोय राजधानीच्या शहरात उत्पन्न होते. शहर आसपासच्या खेड्यातील लोकांच्या गरजा जसजशा अधिक चांगल्या तऱ्हेनें भागवितें, तसतसें शहराचें वैभवहि वाढत जातें

शहराचा संबंध केवळ आसपासच्या खेड्यांशींच नसतो, तर इतर शहरांशीं देखील असतो, व एखादे शहर अधिक सुधारलेलें म्हणजे इतर शहरांच्या गरजा भागविण्यास अधिक समर्थ असलें म्हणजे इतर शहरें-देखील त्या शहराच्या वृद्धीस कारणीभूत होतात.

आपल्या शहरातून त्यांच्या नेहमींच्या कर्तव्यापैकीं पुष्कळ कर्तव्यें चांगल्या तऱ्हेनें बजावलीं जात नाहींत, हें दाखविण्यासाठीं एकदोनच उदाहरणें देतों

नामदार गोखल्यांनीं प्राथमिक शिक्षण सक्तीचें करण्याचा अधिकार म्युनिसिपालिट्यांस द्यावा असें बिल पुढें आणलें व तें अनेक प्रसंगीं फेंटाळून लावण्यात आलें, सरकारचें कर्तव्य कसेंहि असो, तथापि म्युनिसिपालिट्यांनीं आपलें कर्तव्य केलें आहे काय? ज्या म्युनिसिपालिटीस यासंबंधाचा अधिकार हवा असेल, तिनें जर आपणापुरता तो अधिकार मागितला व त्याच्याबरोबर तें शिक्षण देण्यासाठीं आम्ही काय करणार आहों, किती खर्च करण्यास तयार आहों, सरकारनें खर्च किती केला पाहिजे यासंबंधींची एखादी पद्धति तयार केली, व तिला मंजुरी मिळण्यासाठीं खटपट केली, तर आपलें करणें फुकट जाईल असें वाटत नाहीं. म्युनिसि-पालिट्यांस अधिकार देण्याचें बिल पास करून मग काहीं म्युनिसिपालि-ट्यांनीं ही गोष्ट केली काय, आणि त्यांनीं चळवळींत पुढाकार घेऊन स्वतःपुरती मागणी करून तो अधिकार मिळविला काय, परिणाम सारखाच होणार. जें शहर ऊर्फ म्युनिसिपालिटी जिवंत असल्याप्रमाणें आचरण करील त्याच शहरास प्राथमिक शिक्षणाचा लाभ होणार. शहरातच जर जीवन नसेल तर कायद्यानें कितीहि सवलती दिल्या तरी त्या व्यर्थ होत.

आपलें नित्य कर्तव्य करावयास शहरानें काय केलें पाहिजे हें समजण्यास आणखी एक उदाहरण देतों.

आपल्या अनेक शहरात पाण्याचा जसा पुरवठा व्हावयास पाहिजे तसा होत नाहीं तो व्हावा यासाठीं काय करावें हें सांगणे माझें काम नाहीं; या विषयाकडे पुष्कळ म्युनिसिपालिट्यांचें लक्ष लागलें आहे तो पुरवठा कसा व्हावा हेंहि मोठें गूढच आहे. तथापि यासंबधानें म्युनिसिपालिटयास एक गोष्ट करता येण्यासारखी आहे. ती ही कीं, त्यानीं स्वतः काय काय खटपटी केल्या याचा साद्यन्त वृत्तान्त देणारें छापील पत्रक काढावे, हा प्रश्न सोडविण्यासाठीं तो लोकांच्या पुढे मांडावा, पाण्याचा पुरवठा उत्तम करण्यासाठीं काय करावें या संबधाने योजनात्मक निबंध मागवावेत व पांचदहा हजार रुपयाचें बक्षीस लावावें. तसे केलें म्हणजे अनेक माणसें आपले डोकें चालवू लागतील व उपाय शोधण्यासाठीं परिश्रम करतील. पुष्कळदा असें होईल कीं कोणा एकाने काढलेली योजना जरी पूर्ण यशस्वी झाली नाहीं तरी अनेक मंडळींनें काढलेल्या कल्पना वाचून फायदा होईल, व पाण्याचा प्रश्न जरी पूर्णपणें सोडविला गेला नाहीं तरी तो सोडविण्यास बरीच मदत होईल.

**प्रगतीचें अर्थशास्त्र**—एकदा राजधानींतील गरजा पुरविणारा वर्ग व राष्ट्रातील गरजा यांचें समीकरण झालें व राष्ट्रातील राहणी व गरजा यामध्यें बदल पडला नाहीं व राष्ट्राचा इतर राष्ट्राशीं फारसा व्यापार नसला म्हणजे राष्ट्राची वाढ खुटते. मागणी व पुरवठा यांचे एकदा समीकरण झालें व मागणीच्या आकारात अगर स्वरूपात फेरबदल झाला नाहीं तर समाजाची वाढ खुटते, हा अर्थशास्त्राचा सिद्धान्त लक्षात ठेवावा. मागणी व पुरवठा यांचें समीकरण वारंवार होऊं पाहत असतें. व यासाठीं दुसऱ्या काहीं गोष्टींना जर यामध्यें पडून ती स्थिति टाळली नाहीं तर वाढ खुटणें हा स्वाभाविक परिणाम आहे. सृष्टीचा क्रम अशेंवरून राष्ट्राची वाढ खुंटविण्याचा आहे असें म्हटलें पाहिजे. वाढखुटीस अवरोध करणाऱ्या गोष्टी कोणत्या आहेत याचा विचार करिता खालील गोष्टींस महत्त्व द्यावेंसें वाटतें.

नव्या गरजाची वाढ ही दोन तऱ्हेनें होते; एक तर "आकारानें" ती वाढ होते म्हणजे पूर्वोपभुक्त वस्तूंचाच अधिक खप होतो. दुसरी तऱ्हा म्हटली म्हणजे "प्रकारानें" नवीनच चिजा निर्माण होतात व त्याचा

खप होऊ लागतो. उदाहरणार्थ, पूर्वी जर लोकास वर्षातून दर माणशीं एकच धोतरजोडी पुरत असेल पण पुढें दोन लागू लागल्या तर ती आकारानें वाढ झाली. पूर्वी लोकास वर्तमानपत्रें, गोष्टींचीं पुस्तकें लागत नव्हतीं, आता तीं लागू लागलीं आहेत, हें प्रकारानें झालेल्या वाढीचें उदाहरण होय. वर आकाराने झालेल्या वाढीचे जें उदाहरण दिलें तें व्यक्तीच्या दृष्टीनेंच दिलें आहे. समाजाच्या दृष्टीनें देखील गरजाची आकाराने वाढ होत आहे. एक तर प्रत्येक व्यक्तीस लागणाऱ्या वस्तू व्यक्तीसच अधिकाधिक लागू लागतात, व दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे समाजातील उच्च स्थितींत राहणाऱ्या लोकास लागणाऱ्या वस्तू इतर खालच्या दर्जाच्या लोकासहि लागू लागतात. या दोन कारणामुळें समाजातील गरजाची आकारानें वाढ होते.

प्रकारानें जी वाढ अधिक होते त्याचेहि काहीं प्रकार आहेतच एक तर पूर्वी ज्या वस्तूचा लोकाकडून उपयोग होत असेल त्याच वस्तु लोकास लागतात, पण अधिक चागल्या प्रकारच्या त्यास अवश्य होतात. आपणामध्यें या दृष्टीने देखील गरजाची वाढ होत आहे. आज ज्या प्रकारच्या कापडाचे कपडे लोक वापरीत आहेत त्यापेक्षा उद्या चागल्या कापडाचे कपडे लोक वापरू लागले म्हणजे गरजेंत प्रकारानें बदल झाला असे होईल अगदीं नवीन गरजा लोकास भासू लागल्या म्हणजे दुसऱ्या तऱ्हेची प्रकारानें वाढ झाली.

**प्रगतीचें अर्थशास्त्र व पुणेकरांची वृत्ति**—लोकाच्या गरजाची वाढ झाली म्हणजे समाजाची अनेक प्रकारानें प्रगति कशी होते याचें दिग्दर्शन वर झालेंच. जें शहर इतर शहराच्या व खेड्याच्या गरजाचा पुरवठा करील त्या शहरास प्रमुखत्व येतें. ही गोष्ट जास्त जास्त स्पष्ट करून दाखविण्यास आपण एकच व जवळचेंच उदाहरण घेऊ. आज महाराष्ट्रात पुणें शहर जें प्रमुखत्व पावलें आहे, त्याचीं कारणें दोन तीन आहेत. एकतर मुबई सरकारचीं काहीं ऑफिसें पुण्यास आहेत व त्यामुळें पुण्यास काहीं प्रमुखत्व आहे., पुणें पेशव्याची राजधानी असेल पण तेवढ्यावरून आज त्याचें प्रमुखत्व नाहीं. पूर्वी जरी पुणें कसेंहि असलें व लोकाना

पुण्यास कशाकरिताहि जावें लागत असलें तरी आज त्याचें काय? पुण्यास आज जर कांहीं महत्त्व असेल तर तें दोनच कारणानीं — एक तर तें शिक्षणाचें स्थान आहे व दुसरें 'केसरी' पत्र तेथें निघतें. आपण जर एका दृष्टीनें विचार केला तर अर्वाचीन पुणें शहराचा कर्ता पुरुष एकच आहे असें दिसतें आणि तो पुरुष म्हणजे विष्णुशास्त्री चिपळूणकर हा होय. पुण्यातील अत्यंत प्रमुख अशी शिक्षणसंस्था त्याच्याच परिश्रमानें अस्तित्वात आली व 'केसरी' पत्राचें संस्थापकत्व बहुतांशीं त्यासच दिलें पाहिजे. पुण्यातलि अनाथ बालिकाश्रम, सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी इत्यादि संस्था म्हणजे विष्णुशास्त्र्याच्या पूर्वपरिश्रमाचें विकसन होय त्यानें जगविलेली टोळी एक राहो अगर तींत भांडणें होऊन दोन विभाग होवोत, त्या प्रत्येक विभागाचे कसेंहि विकसन होवो, उत्पादकाचें उत्पादकत्व त्यामुळें जात नाहीं. आजचें पुणें म्हणजे बहुतांशीं विष्णुशास्त्र्याची कृति होय. विष्णु-शास्त्र्याच्या उदाहरणावरून एकच मनुष्य कर्तुत्ववान् असला म्हणजे आपल्या शहराची वृद्धि कशी करतो तें दिसून येईल.

पुण्याचें अर्थशास्त्र फार कोतें आहे हें वर विधान केलें, तथापि असें समजू नये कीं हें अर्थशास्त्र आजकालचें कोतें आहे. त्याचीं मुळें फारच खोल गेलीं आहेत. पुणें शहरास ड्रेनेज असावें म्हणून सरकारची फारच खटपट होती. तथापि काटकसरी पुणें शहरानें हें ड्रेनेज लौकर येऊ दिलें नाहीं व सध्याचें पुण्याचें ड्रेनेज देखील शोकास्पद स्थितींत आहे. पेशवाईच्या काळीं पुण्याचें व मराठी राज्याचें अर्थशास्त्रदेखील फारच कोतें होतें. मराठी राज्याच्या आर्थिक स्थितीसंबंधानें तेथील इंग्रज वकील सर चार्लस मालेट यानें मोठी मार्मिक टीका केली आहे व त्या टीकेपासून बराचसा बोध आम्ही महाराष्ट्रीयानीं घेतला पाहिजे. "सांपत्तिक दृष्टीनें मराठ्याचें ज्ञानसर्वस्व म्हणजे कंजुषपणा. मराठ्याच्या अंगीं रसिकता नाहीं व नगरशोभेच्या कल्पनाहि नाहींत. मुसलमान राजे मोठ्यामोठ्या इमारती बांधतात व तेणेंकरून आपलें नगर शृंगारतात. जो पैसा खर्च होतो त्याच्या योगानें उदमी आणि कारागीर श्रीमंत होतात व तोच पैसा सरकारास पुनः कराच्या रूपानें घेता येतो. परंतु मराठ्यांच्या तिजोरींत पैसे जातात ते व्यापारांत खेळत नाहींत, यामुळें मराठ्यांची सांपत्तिक स्थिति अशी

सुधारावी तशी सुधारत नाहीं" अशा अर्थाची जी मालेट यानें टीका केली तींत बरेंच तथ्य आहे. जर एखादें शहर आपल्या सुधारणुकीसाठीं बराच पैसा खर्च करील तर त्याच्या योगानें त्याचें नुकसान न होता फायदाच होतो, त्या सुधारणाच्या योगानें शहरातील सपत्ति वाढण्यास बरेंच उत्तेजन येतें उदाहरणार्थ, पुणे शहरानें जर विजेचे दिवे पुण्यात आणावयाचें मनात आणलें तर त्याच्या योगानें शहरास बराच फायदा होणार आहे. ज्या शहरात विजेची शक्ति उपलब्ध होते तेथें अनेक लहान सहान धदे चालतात. विजेचे पखे उपलब्ध झाले म्हणजे लोकास अधिक काम करण्यास उत्साह येतो. विजेचे दिवे वगैरे केवळ चैनबाजीच्या वस्तु नाहींत. इग्रजाच्या व अमेरिकन लोकाच्या राहणींत ज्या अनेक गोष्टी शिरल्या आहेत त्या केवळ सदरहू लोकास अधिक चैनबाजीची अपेक्षा आहे एवढ्याकरिताच नव्हत. सापत्तिक स्थितीचें सवर्धन करण्यास त्याचा फार उपयोग होतो

**नवीन सुधारणेचा शिरकाव आणि अर्थवृद्धि यांचा परस्पर-संबंध**—ज्या नवीन सुधारणा देशात शिरतात त्याच्या योगानें जीवित कष्टमय होतें. यासाठीं आपणास नवीन सुधारणाच नकोत व तें कष्टमय जीवितहि नको, अशी भावना पुष्कळ लोकाची असते ही वृत्ति धरून राहणाऱ्यास एकच उत्तर आहे कीं, देशाची सापत्तिक स्थिति सुधारण्या-साठीं प्रत्येक मनुष्यास अर्थार्जनाकरिता झटलें पाहिजे. लोकास अर्थार्जना-साठीं झटण्याकारिता ज्याच्यायोगानें भाग पडेल अशा गोष्टी झाल्या पाहिजेत. लोकास पैसे मिळविण्याची आवश्यकता वाटू लागली, खर्चच निभेनासा झाला म्हणजे पैसे कसे मिळवावे हे उपाय आपोआपच सुचतात. आपणाकडे आम्हास काम मिळत नाहीं म्हणून लोक ओरड करतात, पण कामाला चागलीं माणसें मिळत नाहींत असा बोभाटा त्याहूनहि मोठा आहे. झटून काम करणारा व अगीकृत कार्यांत यश सपादन केलेंच पाहिजे म्हणून खटपट करणारा मेहनती असा वर्ग आम-च्यात अजून निर्माण झाला नाहीं. कोंकणस्थ ब्राह्मणाची जात आणि

पारशाची जात याची तुलना केली तर आपणास असें दिसून येईल कीं, दारिद्य जितकें कोंकणस्थ ब्राह्मणात आहे तितकें पारशात नाहीं. पारशाची जात लहान आणि आटपशीर आहे व कोंकणस्थ ब्राह्मणाची नाहीं असें म्हणावें तर तेंही बरोबर होणार नाहीं. कोंकणस्थाची लोकसख्या फार तर सव्वालाख असेल व पारशाची जवळ जवळ एक लक्ष आहे. आम्हामध्यें शिक्षण नाहीं असें म्हटल्यास तें देखील बरोबर होणार नाहीं कोंकणस्थात जितका उच्च शिक्षणाचा प्रसार झाला आहे, तितका पारशात नाहीं पारशास शभर दीडशे रुपये उत्पन्न असलें तर त्यास आपण झगर्दी शोचनीय स्थितींत आहों असें वाटते. व ज्या कोंकणस्थास इतकें उत्पन्न असेल तो आपणास सुखवस्तु समजतो. याच उदाहरणावरून आमच्या सापत्तिक स्थितींतील तफावत लक्षात येईल. पारशी लोक व्यापारात पडल्यामुळे हा फरक झाला आहे. आज पारशी गृहस्थास आपल्या जातभाईमध्यें सन्मान्य होण्यासाठीं जितकें धडपडावें लागतें तितकें कोंकणस्थास धडपडावें लागत नाहीं. एखाद्या समाजाची त्या समाजातील व्यक्तीसबधानें जी आकाक्षा असते ती आकाक्षा पूर्ण करण्यासाठीं धडपडावें लागतें. कुणब्यात एखादा मनुष्य सरकारी नोकरी करू लागला व कदाचित् मामलेदाराच्या जागेपर्यंत पोंचला म्हणजे त्या जातींत तो मोठा मनुष्य होतो. जातीच्या आकाक्षेनें व्यक्तीच्या महत्त्वाकाक्षेचें क्षेत्र मर्यादित होतें. समाजाच्या सुखाच्या व तदनुषगानें सुखवस्तूपणाच्या कल्पना जसजशा वाढत जातील तसतसें व्यक्तीस द्रव्यार्जन करणें भाग पडेल. पारशामध्यें तीस चाळीस रुपये किंबहुना शभर रुपये महिना मिळविणाऱ्याचे लग्न होणें देखील कठीण होतें.

नवीन सुधारणाचा समाजातील सापत्तिक स्थितीशीं दोन प्रकारें संबध येतो. एक तर समाजाच्या नवीन गरजा सुधारणेमुळें वाढतात व लोकास जास्त मेहनत करणें भाग पडतें. दुसरा एक सबध म्हटला म्हणजे नवीन सुधारणेचें ग्रहण करण्यामुळें प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें द्रव्यार्जन करण्यास मदत होते.

प्रत्यक्ष मदत म्हटली म्हणजे नवीन गोष्ट शिकून त्या ज्ञानाचा उपयोग द्रव्यार्जनाकडे मनुष्य करितो. ज्या मनुष्यास स्वतःच्या धद्याचें

आजतागायतचें सर्व ज्ञान असतें, त्यास तो मनुष्य स्वतंत्र धंदा करणारा असला तर धंद्यात फायदा अधिक होतो व तो जर नोकर असला तर अधिक पगार मिळतो. अप्रत्यक्ष फायदा म्हटला म्हणजे मनुष्याच्या संवयीवर सुधारणेचा परिणाम घडतो. उदाहरणार्थ, जो मनुष्य खुर्च्या-टेबलें वापरतो त्याच्या बैठ्या संवयी कमी होतात, व तो उत्साहानें काम करणारा बनतो. या गोष्टी न वापरणाऱ्या मंडळींत उत्साह व काम करण्याचा नेट नसतो असें म्हणणें चुकीचें होईल. तथापि एवढें मात्र खरें कीं, जर या गोष्टी वापरणारा वर्ग घेतला व या चिजा न वापरणारा पण त्याच सांपत्तिक स्थितींतला असा दुसरा वर्ग घेतला आणि या दोन वर्गांची तुलना केली तर असें दिसेल कीं, या गोष्टी वापरणारा वर्ग अधिक उत्साही आढळेल. ही गोष्ट बूट-पाटलोण्याची टर उडविणाऱ्या गृहस्थानीं लक्षात ठेवावी.

**नवीन सुधारणांसंबंधाने समाजाचें कर्तव्य**—नवीन सुधारणा घेऊन स्वतःची उन्नति करून घेणें हें जसें व्यक्तीचें कर्तव्य आहे, त्याप्रमाणें त्यास उत्तेजन देणे हें समाजाचें कर्तव्य आहे. समाजाचें कर्तव्यकर्म समाजानें कसें बजवावें या प्रश्नास उत्तर असें आहे कीं, ज्या सार्वजनिक संस्थाच्या योगाने समाज अगर समाजभाग एकवटतो, त्या संस्थाच्या मार्फत समाजानें आपलें कर्तव्य बजावलें पाहिजे. या प्रकारच्या सार्वजनिक संस्था म्हणजे म्युनिसिपालिट्या, लोकलबोर्ड, प्रांत, इलाखा इत्यादि होत. लोकास स्वराज्य पाहिजे तें एवढ्यासाठींच कीं देशांत स्वतःच्या उन्नतीच्या ज्या कल्पना प्रसृत होतील, त्याचा परिणाम देशावर अगर देशभागावर घडावा

शहराची कायमची लोकवस्ती कशानें वाढते याविषयींचे नियम वर दिलेलेच आहेत. हे नियम लक्षात ठेविले म्हणजे शहराची लोकवस्ती वाढण्यासाठीं म्युनिसिपालिटीनें, म्हणजे शहराच्या उन्नतीची जबाबदारी ज्या मंडळावर सोपविली जाते त्या मंडळीनें, काय केलें पाहिजे हें सहजच स्पष्ट होईल एक तर शहरानें नवीन कारखाने आपल्या हद्दींत उत्पन्न व्हावेत यासाठीं खटपट केली पाहिजे, शहरातल्या लोकाचा व शहरात येऊं इच्छिणाऱ्या लोकाचा जीवितक्रम ज्या गोष्टींनीं सुलभ होईल त्या गोष्टी केल्या पाहिजेत. एखादी नवीन सुधारणा शहरात आली म्हणजे

तिचा एकदर जनस्थितीवर परिणाम काय होतो हें पाहण्यासाठीं आपण एकच उदाहरण घेऊ कल्पना करा, ज्या गावात पूर्वी छापखाना नव्हता त्या गावात आज सुरू झाला, तर त्याबरोबर टाईप जुळवणारे लोक पाहिजेतच. छापखाना उत्पन्न झाला म्हणजे नवीन प्रकारचे कामकरी उत्पन्न होतात एवढेंच नव्हे, तर लोकाच्या गरजावरहि परिणाम होतो. लोकास ज्या गरजा पूर्वी भासत नसतलि त्या गरजा पुढें भासू लागतील, व दुसऱ्या अनेक गोष्टी करण्यास उत्तेजन येईल. कधीं जुन्या धद्याच्या घटनेंत फेरफार होतो व कधीं नवीन धदाहि उत्पन्न होतो. छापखाना गावात असला म्हणजे त्या गावात जर कोणास एखादें वर्तमानपत्र काढावयाचें असेल तर तें काढणें सुलभ होईल छापखान्याच्या अनुषगाने वाढलेला धदा देखील पूर्वीच्या धद्यावर परिणाम घडवील जर वर्तमान-पत्रकार चतुर असेल तर आपल्या गावातील लोकास कोणत्या तऱ्हेची माहिती पाहिजे हे पाहून ती त्यास उपलब्ध करून देण्यासाठीं खटपट करील. गावात एखादे चागले वर्तमानपत्र नियत असलें म्हणजे लोकामध्यें वाचनाची अभिरुचीहि वाढू लागते. छापखान्याचा आणखी एक उपयोग म्हटला म्हणजे जर गावातील लोकास आपला माल डब्यात वगैरे घालून दुसरीकडे पाठवावयाचा असेल तर त्यास आपलीं लेबलें वगैरें छापून घेता येतात, व व्यापारी लोकाच्या कचेरीमध्येंसुद्धा छापील नमुन्याचा बराच शिरकाव होतो तथापि छापखाना जर गावात नसेल तर परगावच्या छापखान्यातून नमुने वगैरे छापून आणण्याच्या भानगडींत कोणी पडत नाहींत व तुम्हीं आपल्या कामास लागणारे नमुने स्वतः न आखता छापूनच घ्या असें व्यापाऱ्याचें मन वळविण्यासाठीं कोणी परगावचा छापखानदार खटपट करणार नाहीं. तसेंच एखाद्या गावात वर्तमानपत्र निघू लागलें म्हणजे तें एका गावाचा ग्राहक व दुसऱ्या गावाचा विक्री करणारा याचा सबध जोडणारें साधन होतें. एवच, वर्तमानपत्र व छापखाना याच्यासारखी नवीन सुधारणा गावात आल्यामुळें गावातील रीतीभातींत तसेंच श्रमजीवी सघाच्या घटनेंत, काहीं नवीन धदे करणारे लोक उत्पन्न झाल्यामुळें फेरबदल होतो. तसेंच, विक्री करणारा आणि ग्राहक एकमेकापासून दूर दूर असले तरी त्याचे सबध जुळले जातात. तसेंच गावातील व्यापाऱ्याचीं नावें

परगावच्या व्यापाऱ्यास कळतात, व येणेकरून क्रयविक्रयाच्या घटनेंत बराच फेरफार होतो. एवच, नवीन सुधारणा गावात आली असता गावाचें अनेक तऱ्हेनें हित होतें. फार कशाला? एखादा नवीन वैद्य देखील पूर्वी वैद्य नसलेल्या गावात गेला म्हणजे त्या गावाकडे इतर गावातील रोगी येऊ लागतात

म्युनिसिपालिटीचें दुसरें कर्तव्य म्हटलें म्हणजे जे लोक गावात येऊ पाहतील त्याचें आयुष्य सुखकर करणे हें होय. एखाद्या शहरामध्यें कायमची वस्ती करून रहाणाऱ्या लोकात मजुराचाहि वर्ग बराच मोठा असतो. एखाद्या म्युनिसिपालिटीनें जर काम मिळवू इच्छिणाऱ्या लोकास कोठें काम मिळेल याची माहिती देण्याचें खाते उघडलें, तर तें कामावर ठेवणाऱ्या लोकास व तसेंच कामावर राहणाऱ्या लोकास अधिक हितावह होईल. अमेरिकेत तर म्युनिसिपालिट्या आपल्या गावात मजुराचा तुटवडा पडू नये म्हणून कारखानदाराशीं संबध ठेवतात, व त्याच्या गरजा लक्षात घेऊन इतर गावात जाहिरातीहि देतात नगर कसें वसवावें ही कला अमेरिकेंत बरीच पूर्णत्वास पोहोंचली आहे, व ही कला उत्तम प्रकारें जाणणाऱ्यास, लहान पण धाडसी म्युनिसिपालिट्या चागले पगार देऊन पदरीं ठेवतात व नगराची वृद्धि करण्याचे काम त्याच्यावर सोपवितात. दुसऱ्या ठिकाणचें भाडवल आपल्या शहरात ओढून आणावयाचें, आगमनेच्छु कारखानदारास व मजूरदारास माहिती पुरवावयाची, तसेंच आपल्या गावात ट्राम्वेसारख्या सुधारणा आणण्यासाठीं प्रयत्न करावयाचा, आपल्या गावात कोणचा माल होतो त्या मालाची व तो माल उत्पन्न करणाऱ्या लोकाचीं वार्षिक पुस्तकें वगैरे काढून जाहिरात द्यावयाची, इत्यादि कामें तिकडील "टाऊन बिल्डर" करितो. पुष्कळदा असें होतें कीं, एखादा कारखाना अमुकच ठिकाणीं निघाला याचें कारण दुसरें तिसरें काहीं नसून त्या गावचा "टाऊन-बिल्डर" स्मितमुख, मधुर भाषण करणारा व आपल्या कामात वाकबगार आहे एवढेंच असतें. हिंदुस्थानामध्यें म्युनिसिपालिट्या गावातील उदमी लोकाच्या हितासाठीं धडपडतील तर गावाचें फारच चागले कल्याण होईल. व्यापारासबधीं माहिती गोळा करणें व ती लागेल त्यास पुरविणें हें काम म्युनिसिपालिटीनें आपल्याकडेसच घेतलें पाहिजे असें नाहीं, तर आपल्या

गानात ‘ चेंबर ऑफ कॉमर्स ’ ऊर्फ व्यापारी मंडळ घडवून आणण्यासाठीं नगरहितेच्छु अधिकारी पुरुषानें खटपट केली असता पुष्कळ काम होईल. आपल्या व्यापाराची वृद्धि करणें हें सार्वजनिक संस्थाचे मुख्य कर्तव्यकर्म आहे. ही कल्पना अमेरिकन लोकाच्या मनावर इतकी ठसली आहे कीं, ते म्हणतात, “परदेशीं जें कॉन्सल पाठवावयाचे त्याचे काम दुसरें तिसरें कांहीं नाहीं परदेशीं पाठविलेला कॉन्सल केवळ स्वदेशाचा ‘मालखपव्या’ होय.”

शहरात जाऊन राहण्यात लोकाचा आणखी एक हेतु म्हटला म्हणजे शिक्षणविषयक होय. जी म्युनिसिपालिटी आपल्या शहरातील शिक्षणसंस्था अधिकाधिक चांगल्या करण्याची खटपट करील ती आपल्या शहराची वृद्धि करण्यात अधिक यश पावेल.

शहरात वस्ती करण्याचा आणखी एक हेतु म्हटला म्हणजे शहरातील राहणी होय. खेड्यातील राहणें कंटाळवाणें असतें व शहरातील राहणे चित्तवेधक असते. आपल्या शहरातील राहणी सुधारण्याचा प्रयत्न शहरातील पुढाऱ्यानीं व म्युनिसिपालिटीनें केला पाहिजे. नाटकगृहें, खुलीं मैदाने, बागा वगैरे स्थलें निर्माण केलीं पाहिजेत. ज्या शहरामध्ये लोकास फिरावयास वगैरे जागा आहे अशीं शहरें आज महाराष्ट्रात नाहींतच असें म्हटलें तरी चालेल निरुपायास्तव आज आपण शहराबाहेरच्या ज्या रस्त्यावर कमी धूळ असेल अशा रस्त्यावर फिरावयास जातों, तथापि जर आपल्या शहरात खुलें मैदान वगैरे असतें तर आपला फिरावयास जाण्याचा प्रघात बराच वाढला असता आपल्या स्त्रियास तर फिरण्यास जाण्यास मुळींच जागा नाहीं व यामुळें ज्या स्त्रियास फिरावयास वगैरे जाण्याची इच्छा असेल त्यास ती पूर्ण करिता येत नाहीं ज्या शहरात फिरण्यास चांगली सोय असेल व स्त्रियामध्यें फिरावयास जाण्याचा प्रघात रूढ होईल त्या शहरास अधिक शोभा येईल यात नवल कोणतें ? महाराष्ट्रातील कांहीं शहराच्या बाहेर बऱ्याच अंतरावर खुल्या जागा वगैरे आहेत, पण त्या शहरापासून फार दूर आहेत, व ज्यास गाडीघोडा ठेवण्याचें सामर्थ्य असेल त्यासच ह्या जागेचा उपयोग करून घेता येतो. सरकारनें युरोपियन लोकाच्या सोईसाठीं मोठालीं मैदानें युरोपियन वस्तीजवळ करावयाच

हट्ट धरला तर सरकारबरोबर एतद्देशीयानीं थोडेबहुत भाडलें पाहिजे. सध्या आपली ह्या बाबतींत तर अतिशय अनास्था आहे व ही अनास्था जोंपर्यंत राहील तोंपर्यंत सार्वजनिक पैशाचा उपयोग युरोपियन लोकाच्याच सुखाकरिता केला जाईल.

पार्क्स अगर फिरावयाच्या मोकळ्या जागा जर करावयाच्या असल्या तर त्यास उत्तम स्थान म्हटलें म्हणजे आपल्या देवळासभोंवतालची जागा हें होय. देवळासभोंवतीं जर आपण खुलें मैदान उत्पन्न केलें तर त्याची लोकप्रियता अधिक वाढेल. व विशेषेकरून आमच्या स्त्रियाना तर त्याचा फार चागला उपयोग होईल. ज्या गोष्टींस नावें ठेवतात त्या गोष्टी करू नयेत ही वृत्ति आम्हा महाराष्ट्रीयात बरीच आहे व सर्व गोष्टींचा विचार केला असता ती चागली आहे असेंहि म्हणता येईल.

जर एखादी बाई केवळ फिरावयास म्हणून निघाली तर तिला तिच्या आसपासच्या व परिचयाच्या बायका हंसतील. तथापि देवदर्शनास कोणी गेलें तर त्यास कोणी नावें न ठेवता उलट चागलेंच समजतील. परपरेस धरून सुधारणा करावयाची याचा अर्थ एवढाच कीं सध्याच्या असलेल्या रीतीभाती पूर्णपणें लक्षात घेऊन त्या रीतीभातींसच नवीन सुधारणा टाचावयाच्या. तसें केल्यानें त्या सुधारणा सार्वत्रिक होतात व ज्या गोष्टी सार्वत्रिक होतील त्याच गोष्टी समाजात कायमच्या राहतील. यास आणखी एक उदाहरण देतों. शहरातील सर्व स्त्रियानीं एकदा तरी जमावें अशी लोकाची इच्छा असते. परतु ती इच्छा फलद्रूप होण्यासाठीं जुन्या चालीचाच अवलब केला पाहिजे व त्या चालींप्रमाणें अवश्य होणाऱ्या कार्याचें क्षेत्र विस्तृत केलें पाहिजे. उमरावती येथील वनितासमाजानें चैत्रातील हळदकुकू सार्वजनिक करण्याचा प्रघात केला. त्यास बरेच यश आलें. असो येथें आपल्या देवळाच्या व्यवस्थेसबधीं थोडेसें विषयातर केले पाहिजे. उमरावती येथीलच आणखी एक उदाहरण घेऊन देवळासबंधानें काय केलें पाहिजे याचें विवरण करतों. उमरावती येथील अबाबाईचें सस्थानच घ्या ना! याचें वार्षिक उत्पन्न तेरा हजार व खर्च आठ हजाराच्या आत आहे पैशासबधानें देवळाची स्थिति इतकी असताहि त्यात समाधान-

कारक अशी काय सुधारणा केली पाहिजे इकडे फारच थोड्यांचें लक्ष जातें. देवळाची व्यवस्था अडाणी मंडळींच्या हातीं असेल असें म्हणावें तर तसेंहि नाहीं. देवळाच्या कमेटीवर गांवातील कित्येक प्रमुख वकील, शाळामास्तर देखील आहेत व देवळाचे एक चिटणीस तर बी. ए., एलएल. बी झालेले वकील आहेत. या कमेटींत जुन्या लोकांचा भरणा असेल तर तसेंहि नाहीं. सुदैवानें "आम्ही सुधारक पडलों, आम्ही देवीच्या देवळात कसें जावयाचें ?" असल्या तऱ्हेचे मूर्ख विचार जे दुसऱ्या शहरात पुष्कळ दृष्टीस पडतात ते उमरावतींतील प्रमुख सुधारकाच्या मनास देखील शिवत नाहींत. असले सुधारकहि देवीच्या कामात थोडेंबहुत लक्ष घालतात. असें असता, देवीच्या देवळात जर सुधारणा झाली नाहीं तर याचें कारण दुसरें तिसरें कांहीं नसून, एक तर कल्पनाचा अभाव होय अगर कल्पना कृतींत उतरविण्यासाठीं लागणाऱ्या नेटाचा अभाव होय. या देवळाची इमारत भव्य आहे, पण ती आसपास वेडींवाकडीं घरें उभारल्यामुळें अगदी लोपून गेली आहे. शिवाय देवळाच्या आसमतातील स्थिति निर्मल नाहीं. एवढ्यामुळेंच या संस्थानच्या सौंदर्याची माती झाली आहे. याच्या योगानें शहरास जी शोभा यावयाची त्या शोभेस शहर सर्वस्वी मुकलें आहे, व या देवळाच्या पुढेंच आसमतात जागा मिळवून जर तेथें बाग उत्पन्न केली अगर निदान भोंवतालीं कुंपण घालून आत स्वच्छ वाळू आणून टाकली व बसावयासाठीं बाकें मांडिलीं तर या संस्थानास अधिक शोभा येईल, देवळाची लोकप्रियता अधिक वाढेल, व देवळात न जाणाऱ्या मंडळींसहि देवळात जाण्याची स्फूर्ति होईल. सध्या हें संस्थान आपल्या पैशाचा व्यय चांगल्या रीतीनें न करता केवळ सावकारी करण्याकडे व भाडें वसूल करण्याकरिता घरें पैदा करण्याकडे करीत आहे असें ऐकतो.

शहरामध्यें भासून येणारी खुल्या मैदानाची अडचण दूर करण्यासाठीं एका अमेरिकन शहरानें जो उपाय योजिला होता त्या उपायाचा निर्देश येथें केला असता तो थोडा मनोरंजक होईल असें वाटतें. अमेरिकेत एक शहर १०।१२ वर्षांच्या अवधींत इतकें भरभराटलें कीं, त्याची लोकसंख्या थोड्याशा हजाराहून २॥ लाखावर गेली ! शहराच्या कर्त्या पुरुषाचें लक्ष व्यापारी मंडळाच्या सोयीकडे, कारखानदारास उत्तेजन

देण्याकडे व प्राथमिक व दुय्यम शिक्षणाकडे वेधलें गेल्याकारणानें शहराच्या सौंदर्यवृद्धीकडे गेलें नाहीं आरोग्याच्या प्रश्नामुळें खुल्या जागाची आवश्यकता लोकास भासू लागली; तथापि त्याकडे शिस्तवार लक्ष देण्यास शहरास म्हणजे शहराचें कामकाज पाहणाऱ्यास अवकाश नव्हता. शहरातील लोकाचे डोळे आपल्या शहरात हिरवा भाग वाढलेला पाहण्यासाठीं उत्सुक झाले होते. अशा वेळेस त्यानीं युक्ति योजिली ती ही. शहरात ज्या ज्या बखळी रिकाम्या पडल्या होत्या, त्यापैकीं बहुतेक शहराच्याच मालकीच्या होत्या. त्यानीं काहीं भाजीपाला वाढविणाऱ्या माळ्यास बोलावून काहीं वर्षांच्या करारानें त्या त्याच्या स्वाधीन केल्या व त्यास तेथें भाजीपाला वाढाविण्यास सागितलें. त्या बखळींत शहरानें काहीं दोनएक यार्ड रुंदीचे पायरस्ते ठेविले व त्या पायरस्त्यावर बाकें बसविलीं. असो.

शहरामध्यें फिरण्यासाठीं व हवा खाण्यासाठीं निरनिराळ्या ठिकाणीं बागा व मैदानें असावींत. व्यायामाच्या दृष्टीनें व हवेच्या शुद्धीच्या दृष्टीनें अशा जागा फारच उपयोगी आहेत. जर जागा नसेल तर बेधडक वस्तीचीं घरें पाडवून व त्यासाठीं कर्ज करून खाली मैदाने तयार केलीं पाहिजेत, जेथें जेथें बखळ सापडेल तेथें तेथें तिचा उपयोग केला पाहिजे. पुण्यासारख्या शहरात ही सुधारणा अगोदर झाली पाहिजे व ती तेथें झाली म्हणजे काहीं अनुकरणशील शहरातहि पसरेल.

**नाशाचें अर्थशास्त्र**—पुण्यासारख्या शहरात म्युनिसिपालिटीनें बरीच घरपाडी केली म्हणजे पुण्याची सुधारणा अनेक तऱ्हेनें होण्याचा सभव आहे. आज अत्यत आळशी, साहसशून्य, हातपाय न हलविणारे, व जेटा मारून बसून देशोद्धाराच्या अगर वेदान्ताच्या गप्पा मारीत बसणारे कर्तव्यशून्य लोक जर कोठे सापडत असतील तर ते पुणें शहरात होत पुण्यातील मोडकीं घरें व स्वस्त घरभाडे व पुष्कळ लोकाचीं स्वतःचीं घरें याचा परिणाम लोकास आळशी करण्याकडे होत आहे. घरभाड्याची फारशी काळजी नाहीं व इतर खर्च ( म्हणजे जेवण वगैरेचा ) काहीं कमी करून व सुखाची कल्पना कोती करून कसा तरी भागवायचा एवढेंच आज पुणेंकराचें व्यावहारिक अर्थशास्त्र

झालें आहे वऱ्हाडातील एका वकिलानें विनोदानें बोलताना पुणेकराच्या अर्थशास्त्राचे दुसरें कलम असें सागितलें कीं, पुणेकराची पैसा मिळविण्याची दुसरी एक युक्ति म्हटली म्हणजे, आपला मुलगा कसें तरी करून एकदा बी. ए. करावयाचा व त्यास वऱ्हाडातील कोणी तरी सासरा पाहून त्या सासऱ्याजवळून दोन हजार रुपये हुडा मागावयाचा!! या प्रकारच्या विधानात अतिशयोक्ति फारच आहे यात शका नाहीं; तथापि पुणेकराविषयीं बाहेर कशा कल्पना पसरत आहेत याच्यासबधानें थोडीशी कल्पना येईल. काहीं असो, पुणे शहरात आज कर्तृत्व व साहस बरेंच कमी होत चाललें आहे, असें मला वाटतें. जर जीवनकलह पुण्यात अधिकाधिक कठीण होईल तरच त्याची स्थिति सुधारेल. पुष्कळ रिकामटेकड्या लोकाचीं घरें म्युनिसिपालिटीनें विकत घेऊन तीं पाडून टाकिलीं म्हणजे पुण्यात थोडाबहुत पैसा खेळता होईल व पुष्कळास पुणे शहर सोडून जीवनार्थ दुसरे कोठें जाण्याची स्फूर्ति होईल. पुण्यात पुष्कळ सुशिक्षित वर्ग रिकामा आहे व इतरत्र सुशिक्षित वर्गाची जरूर आहे. वऱ्हाडात तर हा वर्ग पुरेसा नाहीं व शिक्षणखात्यास त्याची चणचण बरीच भासत आहे. आमच्या सुशिक्षित वर्गानें लेखनव्यवसाय देखील जितका हातीं घ्यावयाला पाहिजे तितका घेतला नाहीं. वऱ्हाडात व मध्यप्राताात पदवीधर वर्ग येऊन त्यानीं वर्तमानपत्रासासारखा धंदा हातीं घेतला तर तो किफायतशीर होईल व तो पुष्कळ ठिकाणीं चालेल असो. पुणे शहरात घरपाडी करून तें सुधरावयाचें व तेथें खुलीं मैदानें वगैरे उत्पन्न करावयाचें काम केल्याने लोकास जास्त व्यायाम मिळत जाईल हा अप्रत्यक्ष फायदा लहानसहान आहे काय? घरें पाडण्याचा सल्ला म्हणजे पूर्वार्जिताचा नाश करण्याचाच सल्ला होय, असें म्हणून जर कोणी नावें ठेवील तर त्यास माझें हेंच उत्तर आहे कीं, नाश देखील प्रगतीचा स्नेही आहे व नाशकर्ती विद्यादेखील लोकास यावयास पाहिजे अर्थशास्त्री मडळीनें नाश करण्यापासून प्रगति केव्हा होते ह्या विषयाकडे लक्ष दिलें नाहीं. मला सध्या या विषयावर सविस्तर लिहिण्यास अवकाश नाहीं. तथापि येथें काहीं उदाहरणें व विचार देतों त्यावरून नाशकर्त्या विद्येचें महत्त्व काहीं अशीं लोकाच्या लक्षात येईल व सुधारणा करण्यासाठीं पूर्वार्जितापैकीं काहींचा निर्दयपणें नाश करणें किती महत्त्वाचें आहे हें

कळण्यास मदत होईल. पुष्कळदा नाश हा सुधारणेस कारण होतो शहराचा घाणेरडा भाग पाडून टाकून शहर कसें सुधारता येतें याची कल्पना मुंबई-करास व मुंबईचे अवलोकन करणारास होईल. पुष्कळदा नाश करण्यास खालील गोष्टी प्रवृत्त करतात

शहराचा चांगला सभ्य लोकांचा राहण्याचा भाग बदलून निराळा उत्पन्न होतो. शहराची सभ्य वस्ती मध्यभागातून जाऊन शहराच्या आसमंतात उत्पन्न होते. असें झाल्यामुळे "शहराचा मध्यबिंदु" म्हणजे जेथें शहरातील व्यवहाराच्या मुख्य घडामोडी होतात तो भाग देखील पूर्वीपेक्षा निराळा होतो. जेथें पूर्वी सुखवस्तु लोकांची वस्ती असेल तेथें अगदीं गरीब लोक येऊन राहतात व तेणेंकरून जीं घरें मध्यभागावर असून चांगल्या स्थितींत होतीं तीं घरे अगदीं मोडकळीस येतात. शहराच्या त्या भागाची जागा खरोखर बहुमूल्य असते. तथापि दुकानास अगर व्यवहारास तें ठिकाण त्याच्या कामास येण्याजोगीं घरें नसल्यामुळें नालायक होतें. तेथील घरें जर निराळ्या पद्धतीचीं झालीं तर ती जागा पुष्कळदा दुकानास अगदीं लायक होते ही गोष्ट लक्षात आणून सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें त्या जागेचे स्वरूप बदललें पाहिजे व पूर्वस्वरूपाचा निर्दयपणें नाश केला पाहिजे.

एखाद्या गिरणींत काहीं यंत्रें नवीन असलीं तरी काढून टाकावीं लागतात. यंत्रामध्यें काहीं नवीन सुधारणा झाली म्हणजे बाजारच्या किंमतींत फेरबदल होतो. जो कारखानदार आपल्या गिरणींत जास्त काम देणारीं यंत्रें वापरतो तोच यश पावतो व जो कारखानदार यंत्र नवेंच घेतलें आहे तें मोडींत कसे काढावें याचा विचार करीत बसतो तो नाश पावतो. लोक जितके जितके आपला फायदा कशात आहे हें मोजण्यात दक्ष होतील तितके तितके ते पूर्वसंग्रहाचा नाश करण्याच्या बाबतींत देखील निर्दय होतील. नाश केव्हा करावा हें आपल्या लोकास समजलें पाहिजे व तो विचार अमलात आणण्या-संबधानें त्वरित बुद्धि झाली पाहिजे. आपण नेहमीं या बाबतींत चुकत असतों. एखादी घरातील खुर्ची मोडकी झाली म्हणजे आपणातील पुष्कळ लोक घरामध्यें तिची अडगळ ठेवितातच मोडकें सामान घरात ठेविल्यानें

घराची जागा किती अडते व ती जागा खुली केली तर तिचें भाडें काय येईल व साठवून ठेवलेल्या मोडक्या वस्तूस पुढें काय किंमत येईल अगर नाहीं या प्रकारच्या गोष्टींकडे आपण फारसें लक्षच देत नाहीं असें म्हटलें तरी चालेल.

गिरणींतील यंत्रे जशीं द्रव्योत्पादनाचीं साधनें आहेत त्याप्रमाणेंच शहरातील रस्ते, शहराची मांडणी, शहरातील शिक्षण, तेथील लोकांच्या सवयी, राहणी वगैरे सर्व गोष्टी द्रव्योत्पादनास उत्कर्षक आणि अपकर्षक असतात. या सर्व गोष्टींचा शहरानें विचार करावा व त्याप्रमाणें वृद्धि कोणच्या गोष्टींची करावयाची, फेरबदल कोणत्या गोष्टींत करावयाचा व तो फेरबदल करण्यासाठीं नाश कशाचा करावयाचा यासंबधानें आपला कार्यक्रम ठरवावा.

**शहरांतील येत्याजात्या वर्गासंबंधानें शहराचें कर्तव्य**— शहरातील कायमची वस्ती वाढण्यासाठीं आतापर्यंत कांहीं सूचना झाल्या; आता शहरामध्यें तात्पुरती लोकवस्ती अधिक वाढावी यासाठीं काय केलें पाहिजे, हें सुचवितों. जीं यात्रेचीं गावें आहेत तेथें केवळ यात्रेमुळेंच लोकवस्ती तात्पुरती वाढणार आहे, तथापि यात्रेकरूंची व्यवस्था चांगल्या प्रकारें होत आहे असें वाटत नाहीं. अनेक हालअपेष्टा सोसून केवळ आमच्या भाविकपणामुळें लोक यात्रा करतात, व यात्रेच्या गावाच्या संपत्तीची वृद्धि करतात या यात्रेकरूंच्या संबधाचें कर्तव्य म्हणजे त्यांचा तेथील निवास सुखकर करणें, हें आपल्या यात्रेच्या शहराच्या व्यवस्थापकांच्या ध्यानींमनीं देखील येत नाहींसें दिसतें. या लोकांच्या सोयीसाठीं शहराने आपल्या खर्चानें कांहीं चांगल्या, सुंदर व हवाशीर इमारती उत्पन्न केल्या तर लोकांस यात्रा अधिक सुखकर होईल व यात्रेमुळें शहरात होणारें मृत्युसंख्येचें प्रमाण बरेंच कमी होईल. नाशिक शहराचीच गोष्ट घ्या येथे जवळ जवळ वर्षांतून बारा महिने यात्रा असते व यात्रेकरूंस केवळ भिक्षुकांच्या येथें राहण्याखेरीज दुसरा इलाज नसतो नाशिक हें शहर अत्यंत मागासलेलें असल्याकारणानें व त्यातील भिक्षुकांचा वर्ग तर आरोग्यविषयक कल्पनामध्यें अधिकच मागसला असल्याकारणानें आरोग्यविषयक कल्पना ज्यांच्या अधिक पुढें गेल्या असतील त्यास असल्या ठिकाणीं राहण्याची सोय नाहीं.

तथापि म्युनिसिपालिटीनें जर या वर्गाकरिता इमारत बांधिली व भाडें वसूल करण्याचा उपक्रम केला तर नुकसान न होता फायदाच होईल. एवढें मात्र खरें कीं, सिंहस्थाच्या पर्वणीसारख्या प्रसंगीं येणाऱ्या लोकांस पुरेल अशी इमारत बांधणें शक्य नाहीं व त्यानें फायदाहि होणार नाहीं. जरी नवीन इमारती बांधणें शहरात शक्य नसले, तरी शहरातील इमारतींसंबंधानें खडतर नियम करणे व ते लोकांस पाळावयास लावणें व ज्या भिक्षुकांस आपल्या घरीं यात्रेकरूंची उतरावयाची सोय करण्याची इच्छा असेल त्यांच्याकरिता स्वतंत्र परवान्याची पद्धत काढणें, जे लोक म्युनिसिपालि-टीच्या नियमाप्रमाणे घरें बांधतील त्यांसच ते परवाने देणें, इत्यादि गोष्टी म्युनिसिपालिटीस करणें शक्य आहे. पंढरपुरात देखील यात्रेकरूंस बराच त्रास होतो. विशेषेंकरून पैसे उकळणाऱ्या बडव्यांनीं देवळांत इतकी अव्यवस्था माजविली आहे कीं, 'नको हें देवदर्शन' अशी भावना पुष्कळांस होऊं लागली आहे. रामेश्वर येथील देऊळ आज सरकारी नियंत्रणाखालीं असल्यामुळें सध्या तेथें फारशी अव्यवस्था नाहीं आपल्या देवळांत जर फार अव्यवस्था राहू लागेल व त्या अव्यवस्थेचे निरसन करण्यासाठीं लोकमत जागृत झाले नाहीं व ती दूर करण्यासाठीं प्रयत्न सुरू झाले नाहींत, तर ती व्यवस्था देखील हळूहळू सरकारच्या हातीं जाऊं लागेल असें वाटतें. पूर्व-काळीं लोकांचा असा एक भाव होता, कीं, यात्रा जितकी दुर्घट व कष्टानें भरली असेल तितकें त्या यात्रेंत पुण्य अधिक, पण तसा भाव आज राहिला नाहीं. आज लोकांस सोयींची व सुलभ अशी यात्रा झाली पाहिजे. यात्रेकरूंशिवाय शहरात मधून मधून येणारा असा बराच मोठा वर्ग आहे. आपल्याकडे अमुक एक वारीं बाजार भरतो अशीं शहरें अनेक आहेत बाजार करण्यासाठीं येणारा वर्ग केवळ विक्री व खरेदी यासाठीं येतो असें नाहीं, तर तोच वर्ग आपले काहीं दिवस शहरात आनंदानें घालवावे व 'एक पंथ दो काज' करावें या हेतूनें देखील येतो. जर शहरात मौजा मारण्याची संधि नसती तर पुष्कळ खेड्यातील लोक बाजार करण्यासच आले नसते. उमरावती येथें बुधवारच्या बाजाराला खेड्यातून जो कुणबी येतो तो त्याच रात्रीं नाटक पाहून परत जातो. तसेंच रविवारच्या बाजारासाठीं येणारी पुष्कळ मंडळी एक दिवस अगोदरच म्हणजे शनिवारीं

रात्रीं उमरावतीस येतात व आदल्या दिवशीं नाटक पाहून दुसऱ्या दिवशीं बाजार करितात. हा प्रकार पाहून काहीं तत्त्ववेत्ते कुणब्याची कींव करतील पण तशी कींव करण्याचें कारण नाहीं. पैसा असल्याशिवाय खर्च होत नाहीं व आमच्यातील किंवा कोणत्याहि देशातील कनिष्ठ वर्गापाशीं पैसा असला म्हणजे तो खर्च व्हायचाच.

नाटक पाहण्याचा चैनीचा प्रकार श्रेष्ठ प्रकारच्या चैनीमध्यें घालता येईल. तथापि जर श्रेष्ठ प्रकारच्या चैनीकडे लोकाचें लक्ष न वेधिलें तर कानिष्ठ प्रकारच्या चैनीकडे व मनोरंजनाकडे लोकाची प्रवृत्ति होईल; यासाठीं श्रेष्ठ प्रकारचे चैनीचे व मनोरंजनाचे मार्ग समाजानें अधिकाधिक खुले केलें पाहिजेत नाटक पाहण्याच्या योगानें आमच्यातील खालच्या दर्जाच्या राहणींत हळूहळू पण बराच फेरबदल होत चालला आहे, असे सूक्ष्म दृष्टीनें पाहता दिसून येईल. उदाहरणार्थ, आमच्यातील श्रेष्ठ वर्गाची राहणी कशी असते याचें ज्ञान कनिष्ठ वर्गाच्या लोकास होण्यास नाटकाखेरीज दुसरा मार्गच नसतो व हीं नाटकें पाहिल्यानें आपल्या लोकास पोषाखाच्या कल्पना व निराळ्या प्रकारची भाषा हीं खेडयामध्यें शिरतात.

राष्ट्र बनवावयाचें म्हणजे समाजातील निरनिराळ्या वर्गाच्या आचारामध्यें, विचारामध्यें, अभिरुचीमध्यें, भाषेमध्ये सारखेपणा उत्पन्न करावयाचा. आजच्या जातिभेदानें तुकडे पडलेल्या समाजस्थितींत, बहुजनसमाजाची निरक्षरता असल्यामुळें श्रेष्ठ प्रतीच्या लोकाच्या आचारविचाराचा खालच्या वर्गांत मिशनरीपणा करण्यासाठीं नाटकाखेरीज आज अन्य साधन नाहीं. ही गोष्ट नाटकाविरुद्ध ओरड करणारे तत्तवेत्ते विसरतात असें दिसतें. खेडयातील लोकास शहरात येण्यास उत्तेजन देण्यासाठीं प्रदर्शने वगैरे भरविलीं पाहिजेत. जीं शहरें अधिकाधिक प्रदर्शनें भरवितील तीं राष्ट्रामध्यें साहजिक पुढारीपणा पावतील

**नगरसौंदर्यः**—आतापर्यंत शहराच्या सुधारणेंसबंधानें जे विचार व्यक्त केले ते केवळ लोकाच्या सोयी व सांपत्तिक हित या दृष्टीनें केले. शहर शोभिवंत करण्यासबंधानें जे विचार व्यक्त केले ते वरील दोन गोष्टींचें विवरण करताना केवळ अनुषंगानेंच व्यक्त केले. शहराच्या व्यवस्थापकाचें

कर्तव्य वरील दोन गोष्टी केल्यानें सपतें असें नाहीं. शहर सुदर देखील करावयास पाहिजे. ज्याप्रमाणें आपण एखादें घर बाधीत असता केवळ सोयीकडे लक्ष दिल्यानें भागणार नाहीं, त्याप्रमाणेंच नगररचनेची गोष्ट होय, नगररचना सुदर असली पाहिजे. इटली, फ्रान्स, इग्लड, अमेरिका या देशात नगरसौंदर्याचें महत्त्व लोक चागलेंच ओळखू लागले आहेत. तिकडील एखादें लहानसें खेडें का असेना, त्याच्या सौदर्यवृद्धीकडे लोकाचें लक्ष असतेंच. आपल्या लोकात सौंदर्याभिज्ञता फारशी नाहीं. ती आपणात उत्पन्न झाली म्हणजे तिचा परिणाम प्रत्येक गोष्टीवर घडून येईल. एखाद्या खटपटी मनुष्याने शहराचें सौदर्य वाढविण्यासाठीं हातीं सत्ता आली असता खडतर उपाय योजिले तर तो मनुष्य लोकात प्रिय न होता अप्रिय होईल. जी परिस्थिति शहरात उत्पन्न करावयाची असेल त्या परिस्थितीची आवश्यकता अनेक तऱ्हेची चर्चा करून लोकास भासवून दिली पाहिजे. ज्याप्रमाणे एखाद्या राष्ट्रास स्वतत्रता कोणी मिळवून दिली, तथापि त्या स्वतत्रतेची महती राष्ट्रातील व्यक्तींस भासून आली नाहीं म्हणजे ती स्वतत्रता देखील टिकावयाची नाहीं; स्वतत्रता मिळवून देणारा मनुष्य निजधामास गेला म्हणजे त्या राष्ट्राची लवकरच राखरागोळी उडते, त्याप्रमाणेंच सुधारणाची गोष्ट आहे सुधारणा कोणावरहि सर्वस्वी लादता यावयाची नाहीं. नगरसौदर्याची अभिरुचि लोकात उत्पन्न केली पाहिजे व काहीं थोड्या अशीं–पण फारच थोड्या अशीं–सुधारणा लादण्याचें प्रयोजन एवढेंच कीं, नव्या गोष्टीसबधानें सामान्य जन साशंक असतो व काहीं अशीं त्यास भीत देखील असतो. तथापि एकदा एखादी सुधारणा आली व तिची सवय लोकाना झाली म्हणजे तिच्याशिवाय लोकाचें चालेनासें होतें. सुदर वस्तू पाहण्याची व सुदर शहरें पाहण्याची लोकास सवय झाली म्हणजे बेढब व घाणेरडीं शहरें दृष्टीस दुखावितात. ज्याप्रमाणें एखादा मनुष्य सगीतशास्त्र शिकला म्हणजे बेसूर गाणें त्याच्या कानास दुःख देतें, त्याप्रमाणेच दृष्टिसुखाची देखील गोष्ट आहे. अमेरिकेंतून मनुष्य जाऊन आला म्हणजे हिंदुस्थानातील दैन्य अगोदर दृष्टीसच त्रास देतें.

शहराचें सौदर्य सुधारावयाचें तें केवळ आपल्या दृष्टीचें कोड पुरविण्यासाठीं नव्हे, त्याचे सापत्तिक स्थितीवर देखील परिणाम घडून

येतात जे लोक आपलें शहर अधिक सुदर करतील ते आपल्या शहराची संपत्ति देखील वाढवितील. आज पॅरिस शहराम जें वैभव आहे व उत्पन्न आहे त्याचा बराच भाग तें शहर पाहण्यासाठीं आलेल्या लोकाकडून आहे या रीतीनें जो प्रत्यक्ष फायदा होतो त्यापेक्षा व्यावहारिक दृष्टया अप्रत्यक्ष फायदा बराच आहे ज्या लोकाची अभिरुचि देखील सुशिक्षित आहे त्या लोकात ती प्रत्येक वस्तूच्या घडणीवर परिणाम करिते शहराचें सौंदर्य काहीं अशीं सुशिक्षित अभिरुचीचें फल होय व काहीं अशीं कारण देखील होय. अभिरुचि सुशिक्षित झाले म्हणजे लोकास प्रत्येक वस्तु दिसण्यास सुदर अशी हवी असते, व त्या देशाचे कारागीर नेहमींच्या उपयोगाच्या चिजामध्यें आधकाधिक सौदर्य वाढविण्याचा प्रयत्न करितात. आपणास काहीं एक वस्तु खरेदी करावयाची झाली म्हणजे आपण तिच्या कामचलाऊ उपयुक्ततेकडे जसें लक्ष देतों, तसें सौदर्याकडेहि देतों जर आपणास एखादा चाकू घ्यावयाचा असेल तर आपण त्याची धार पाहतों. पुस्तक विकत घेताना केवळ आतील मजकुराकडेसच लक्ष देतों असें नाहीं तर त्याच्या छपाईकडे, कागदाकडे देखील पाहतों. जीं मासिके आपलें बाह्याग सुधारण्याची खटपट करितात तीं आपला खप वाढवितात. एवच जर आपण आपल्या राष्ट्रातील अभिरुचीचा विकास केला व चित्रादि ललितकलाचें शिक्षण जर आपल्या सर्व लोकास दिले तर आपल्या अपेक्षा देखील वाढतील. मग आपल्या देशातील कारागिरीस चित्रादि ललितकलाचे शिक्षण मिळवून जिनसा निर्माण कराव्या लागतील व आपल्या व्यापारास अधिक उत्तेजन येईल. मनोहर दिसणारा आपल्या देशातील माल परदेशीं देखील खपावयास लागेल आणि आपले ग्राहक व आपले कारागीर याची अभिरुचि एकच तऱ्हेची बनविली व ती उच्च प्रकारची केली म्हणजे आपल्या श्रेष्ठ प्रतीच्या गरजा परदेशीयास पुरवणें अशक्य होईल

आज आपल्या देशातील अभिरुचि सुधारली नाहीं व आजच शहराचे व्यवस्थापक सौदर्याचीं तत्त्वें लोकावर दडपू लागले तर तें लोकास आवडणार नाहीं. शिवाय दुसरी एक गोष्ट अशी आहे कीं आज ज्याची सौंदर्याभिज्ञता वाढली आहे, असा आमच्यात वर्गच नाहीं व त्यामुळें शहर सुदर करण्यासाठीं नगराचे व्यवस्थापक खडतर उपाय योजतील असा

संभवच नाहीं. आमच्या शहरात आज इतकी घाण आहे कीं, आमच्या शहराच्या पुढाऱ्याची नाकेंच कोणीं कापून नेलीं आहेत कीं काय असें पुष्कळास वाटण्याचा संभव आहे

आज आपणास फार तर शहराचें सौंदर्य बिघडविणाऱ्या ढोबळ चुकापासून अलिप्त राहता येईल. आपल्या शहराचें सौंदर्य वाढवावें अशी ज्याची इच्छा असेल त्यानीं खालील गोष्टी म्युनिसिपालिटीकडून घडवून आणवाव्यात.

शहराच्या ज्या भागात सुंदर बंगले असतील त्याच भागात सर्वत्र दुकानें घालूं देऊं नयेत; व लहानसान झोंपड्या बांधू देऊं नयेत. ज्या लोकाच्या सुंदर घराशेजारीं घाणेरडीं घरें बांधण्याचा कोणी इरादा करील तर त्याविरुद्ध म्युनिसिपालिटीकडे त्यानीं आपला जोराचा निषेध कळवावा. घाणेरडें घर जवळ बांधू दिल्यानें आपल्या जागेची किंमत कमी होते. म्हणून कोर्टांत नुकसानीचा खटला आणला तरी देखील चालण्यासारखें आहे. आपल्या देशात यासंबंधानें अनास्था फार मोठी आहे, कलकत्त्यास तर फारच दिसून येते. एखाद्या सुंदर राजवाड्यासारख्या तीन चार लाख रुपये किंमतीच्या घराशेजारींच झोंपड्या बांधल्या जातात व त्यात अगदीं निकृष्ट दर्जाची व अत्यंत घाणेरडी वस्ती येऊन राहते. घरें कशीं असावींत यासंबंधीं म्युनिसिपालिट्यानीं कायदे केले पाहिजेत. तसेंच शहरातील मुख्य रस्ते सुंदर ठेवण्याचा प्रयत्न केला पाहिजे. एखाद्या सुंदर रस्त्यावरच खाटकाचें, भडभुंज्याचें अगर मिठाईवाल्याचें दुकान येऊं देऊं नये. हे सर्व दुकानदार घाणेरडीं लखतरीं वापरणारे असतात. जे माल तयार करतात तेच लोक माल विक्रीत बसतात. या कारणानें त्याना स्वच्छ कपडे घालून विक्रींत बसणें शक्यच नाहीं. असलीं दुकानें गल्ल्याकुच्च्यातूनच असलेलीं बरीं. शहरातील श्रेष्ठ आणि सुशिक्षित वर्गाचें अशिक्षितास व घाणेरड्या लोकास शिस्त लावून देणें हें कर्तव्यकर्म आहे, ही गोष्ट आपण विसरतों असें दिसतें. कलकत्त्यात तर काहीं दुकानदार दुकानाच्या पुरोभागींच आपल्या अंगास तेल चोपडीत बसतात. असल्या प्रकारचे देखावे डोळ्यास

अत्यंत दुःसह होतात. असले देखावे दृष्टीस पडत असले म्हणजे त्या भागातून सभ्य स्त्रियास जाण्याची देखील लाज वाटेल. असल्या दुकानदारास शहर पोलीसकडून पकडून जर पचवीस तीस रुपये दंड करविला तर त्याचें वर्तन सुधारेल असें वाटतें. नागरिकांनीं कसें वागावें या संबधींचीं फलकें काढून जरी म्युनिसिपालिटीच्या लोकांनीं वारवार उपदेश केला, तरी तो हवाच आहे. कायदा करण्याच्या अगोदर लोकास असा उपदेश केलेला बरा. कारण कायद्यास अनुकूल असें लोकमत जोंपर्यंत तयार झालें नाहीं, तोंपर्यंत त्या कायद्याचा भंग लोकाकडून वारवार होणार व सर्वांवरच फिर्याद करून त्यास शिक्षा करणे हें शक्य नसतें. जो कायदा अमलात आणावयाचा तो आणण्याअगोदर त्या नियमाने वागणारे काहीं लोक तयार झाले पाहिजेत, म्हणजे त्या लोकांचें कायद्यास पाठबळ मिळतें व ही गोष्ट गैरशिस्त आहे हें लोकास भासविण्यास ते लोक उपयोगीं पडतात. समजा, दुकानदाराच्या शिस्तीसंबधानें काहीं नियम शहरानें केले व त्या नियमाप्रमाणें वागणारे काहीं दुकानदार अगोदरच असले तर ते दुकानदार त्या प्रकारच्या नियमाचें समर्थन इतर दुकानदारापाशीं बोलताना करतील. फायदे कळविणें, महत्त्व कळविणें, उपदेश करणें या गोष्टी अगोदर करून मागाहून थोडी सक्ती केली पाहिजे

असो, या विषयावर लिहावें तेवढें थोडेंच आहे मी येथें जे लिहिलें आहे, त्याचाच थोडाबहुत विचार केला व निरनिराळया शहराच्या व्यवस्थापकानीं व प्रमुख नागरिकानीं थोडया अशानें तरी पूर्वोक्त विचार कृतीत उतरविण्याची खटपट केली म्हणजे पुष्कळ झालें.

७

# आई आणि मुलगी

बाळचें लक्ष आपणावरून उडालें आणि सत्यबाला ही या संग्रामात अधिक यशस्वी झाली, हें पाहून पुरुषस्वभावाविषयीं अनेक विचार मंजुळेच्या मनात उद्भवले. "पुरुष लग्न करतात तें कशासाठीं?" असा आपल्या मनाशीं प्रश्न करून तिनेंच उत्तर दिले, "छे, हा विचार करण्यास आपणास साहित्यच कोठे आहे? बहुतेक पुरुषाचें लग्न आजपर्यंत त्याच्या आईबापानींच करून दिलेलें असतें. अलीकडे आपले स्वातंत्र्य वापरू पाहणारे बरेचसे तरुण आपणास जितक्या मुली सांगून येतील त्यातील बरीशी पाहून निवडावी, एवढेंच करतात. अशा प्रसगीं त्याना त्याच्या जातींतीलच मुली सागून आलेल्या असतात. आपलें लग्न ठरविण्याच्या बाबतींत आपण अगदीं स्वतंत्र आहों असे समजणारे बाळसारखे तरुणच विरळा. तर बाळसारखी वृत्ति आपणास इतराच्या अनुभवावरून येण्याजोगी नाहीं. आपणास तो सोडून गेला आहे, यावरूनच जे काय समजायचें ते समजावें"

बाळच्या अनेक गोष्टी तिला आठवल्या तेव्हा तिनें आपलें बाळविषयीं पुढीलप्रमाणें मत बनविले "बाळच्या मनात औदार्य आहे, दुःखिताविषयीं अनुकपा आहे, पण जेव्हा लग्नाचा प्रेरक हेतु अनुकपा असणार, वैयक्तिक प्रेम असणार, तेव्हा दुसरी अनुकपनीय स्त्री त्यास भेटली म्हणजे पहिली स्त्री मागे पडणार." सत्यबालेविषयीं पुन्हा विचार करून ती म्हणाली, "पण छे! केवळ अनुकपा हीच भावनाहि लग्नास प्रेरक होत नाहीं, तर जेव्हा अनुकपनीय स्त्रीकडे पुरुष वळतो तेव्हा एक तर त्याचीच स्थिति अनुकपनीय झालेली असते. त्याचेच लग्न कठीण झालें असून तो औदार्याचा आव आणीत असतो. जेव्हा अनुकपनीय तरुणीकडे वळण्याचें तें कारण नसतें, तेव्हा आपली जाहिरात व्हावी अशी वृत्ति त्याच्या मनात प्रधान असते.

म्हणज आपण रूढीविरुद्ध वागलों, आणि दुःखपकातून दीन गाईस बाहेर काढलें, अशाबद्दल आपली वर्तमानपत्रकारानीं पाठ थोपटावी अशीं त्याची इच्छा असते. तर जातीबाहेर लग्न करणारा तरुण प्रेमापेक्षा अन्य भावनानीं जेव्हा प्रेरित झालेला असतो, तेव्हा तो आपल्या हातात आला आहे असें स्त्रीनें कधींच समजू नये प्रेमशास्त्र गहन असेल, पण विवाहशास्त्र त्याहूनहि गहन आहे. कारण विवाहास जे अनेक हेतु प्रयोजक होतात, त्यातील प्रेम हा अनेकापैकीं एक हेतु आहे. आणि अनेकाच्या बाबतींत तो कमी महत्त्वाचा आहे. बाळ हा लोकप्रशसेच्या लोभाने अशीच आत्मवचना करून घेत आहे. नवऱ्यानें टाकून दिलेल्या स्त्रीस घटस्फोट मिळवून देऊन मग तिच्याशीं लग्न करावें हा हेतु ज्या अर्थी बाळच्या मनात प्रधान आहे, त्या अर्थी प्रेमाची खरी भावना त्याच्यामध्यें अजूनहि जागृत झालीच नाहीं, तर आत्मप्रशसेची हाव हाच त्याच्या मनातील प्रबळ मनोविकार असला पाहिजे अशा परिस्थितींत स्त्रियानीं वागावें तरी कसें ! पुरुषाच्या मनात कधीं प्रेमाचे कधीं काल्पनिक कर्तव्याचे, तर कधीं किफायतीचे हेतु उत्पन्न होऊन ते त्यास आज या स्त्रीकडे तर उद्या त्या स्त्रीकडे असें फिरवीत असतात

"स्त्रीनें तरी काय करावें ! आपले प्रेम पुरुषप्रेमासच अर्पण करावें ही भाषा काव्याची झाली पण पुरुषाचें प्रेम तरी कशा प्रकारचें आहे ? तें कितपत स्वार्थमूलक आहे, याचा आम्हास पत्ता कधींतरी लागेल काय ! लग्न झाल्यानतर अनेक वर्षांनीं नवऱ्याचें प्रेम आपल्यावर नाहीं याची बायकाना जाणीव होते, व मग माझ्या पैशासाठीं तू माझ्याबरोबर लग्न लावलेंस वगैरे आरोप त्या नवऱ्यावर करू लागतात. ते आरोप खरे असोत अगर नसोत, पण खरे आहेत असें जरी धरलें, तरी त्यात गैर तें काय आहे ! स्त्रीपाशीं जें काहीं असेल त्यावर लुब्ध होऊन पुरुषानीं तिच्याशीं लग्न लावावें ही गोष्ट गैर तरी का ! एक पुरुष स्त्रीच्या रूपावर लुब्ध होईल, तर दुसरा सुशिक्षिततेवर लुब्ध होईल, आणखी तिसरा एखादा पुरुष ती स्त्री जर बऱ्याच वजनदार कुळातील असेल तर तिच्यामार्फत सामाजिक दृष्ट्या आपली उन्नति होईल अशा भावनेनें लग्न लावील यापैकीं एक भावना अश्रेयस्कर व दुसरी श्रेयस्कर असें म्हणण्याचें आपणास काय प्रयोजन आहे ! या चार भावनाप्रमाणेंच आपल्या प्रशंसेची भावना बाळ

यास जगाच्या भोंवऱ्यात गटगळ्या खावयास लावीत आहे. हा गटंगळ्या खाईल तेव्हा आपल्याकडे येईल व मग आपण त्यास चार शहाणपणाच्या गोष्टी सागू " इत्यादि विचार मजुळेच्या मनात येऊ लागले.

या विषयावर चर्चा तरी कोणाशीं करावी हेंच मजुळेला कळेना. खरें सौहृद असलेली किंबहुना आपणाशीं समरस होईल अशी कोणतीच स्त्री तिला दिसली नाहीं. "आपल्या अडचणींची जाणीव कुलीन घराण्यातील सुशिक्षित स्त्रियास असणें शक्य नाहीं. शिक्षणाच्या योगानें आपले जे स्थित्यतर झालें आहे, त्या शिक्षणासबधीं सहानुभूति आपल्या आईस नाहीं कीं बापास नाहीं. आपली आई नायकीण असूनहि स्वत:स मोठी प्रतिष्ठित समजते. आणि ही तिची मनोवृत्ति मला मुळींच समजेनाशी होते. जी बोलून चालून नायकीण तिला प्रतिष्ठितपणा कोठून येणार ? आईच्या मनात आपल्या प्रतिष्ठितपणाची भावना आहे व माझ्यात ती नाहीं. म्हणजे माझे शिक्षण माझा हीनत्वाचा गंड ऊर्फ Inferiority Complex वाढविण्यासच कारण झालें काय ? आईला प्रतिष्ठितपणा कसा काय वाटतो याची आपण तरी ओळख कोठें करून घेतली आहे ? आई आणि मुलगी याचें अत:करण जर परस्परास कळत नाहीं, तर बाहेरील जगानें तरी त्याचें अत:करण समजून घेणें कसें शक्य होईल आणि तें समजून घेण्याची फिकीर तरी का करावी ? "

या प्रकारचे विचार उद्भूत होऊन शेवटीं " आपली आत्मोद्धाराची कल्पना आपल्या पूर्वपरपरेवरच रचणें श्रेयस्कर आहे. बाहेरील उपटसुंभ जगानें आमच्याकरिता जे नियम केले असतील अगर जो उन्नतीचा मार्ग दाखविला असेल त्याकडे वळून आपण आत्मवचना करून घेता कामा नये, " या प्रकारची मनोवृत्ति मजुळेच्या मनात बाळोबाला सत्यबालेनें आकर्षित केलें आहे याची जाणीव झाल्यानतर थोडक्याच दिवसात उत्पन्न झाली. आणि त्याबरोबर चद्रराव लटके याच्याविषयींदेखील तिच्या मनात सहानुभूति उद्भूत झाली.

आपली कौटुबिक हकीगत तरी आपणास कोठें ठाऊक आहे, असा विचार तिच्या मनात आला. आणि आपण त्याविषयीं आईला पृच्छा केलीच पाहिजे असें तिनें ठरविलें.

" आई, तू आपली सर्व हकीगत मला खरी खरी सांगशील काय?" असें विचारण्याचें मजुळेनें धैर्य केलें.

" मी तुला नाहीं कधीं म्हटलें ? " आई उत्तरली.

" तू काहीं चोरून ठेवणार नाहींस ? "

" मी चोरून ठेवण्यासारखें काहीं केलें नाहीं. मी नायकीण आहे ही गोष्ट जगजाहीर आहे."

" तू नायकीण म्हणजे केवळ बाबाचीच आहेस काय ? "

" ते विलायतेहून आल्यापासून त्याचीच आहे. ते येण्यापूर्वीं मात्र माझी स्थिति अगदीं निराळीच होती. मी ठमामावशींच्या चार पोरींपैकीं एक होतें, आणि ती सांगेल तो पुरुष मला स्वीकारावा लागे."

" मग ? "

" तुझे बाबा विलायतेहून आल्यानंतर त्यांनीं माझा पत्ता काढला. त्याची व माझी पूर्वींची ओळख होती आणि मग त्यांनीं मला ठमामावशी-पासून सोडविलें."

" सोडविलें म्हणजे ? "

" सोडविलें, याचा अर्थ मी जवळजवळ तिची गुलामच होतें. तिनें मला गायन वगैरे शिकविलें होतें पण ती मला पगार अगदीं थोडा देत होती. आणि मला पुरुषाकडे पाठवून माझ्यापासून होणारें उत्पन्न ती मिळवीत होती."

" मग तू त्याविरुद्ध काहीं केलें नाहींस ? "

" काय करावें हेंच आम्हाला समजत नव्हतें. तुझ्या बाबांनीं मला सोडविलें, त्या वेळेस मी एकोणतीस वर्षांची होतें मला पगार थोडा होता. दारावर येणाऱ्या वस्तु विकत घेण्यासाठीं मला आग्रह केला जाई. मला माझे कपडे स्वतः घ्यावे लागत. त्यामुळें लागणारा पैसा मला ठमामावशी कर्जाऊ देत असे आणि त्यामुळें वर्षानुवर्षें मी कर्जातच होतें. माझें देणें साडेतीनशें रुपये होतें. तें तुझ्या बाबांनीं दिलें आणि त्याच्या बंगल्यात मला त्यांनीं आणून ठेवलें."

" तुझ्यावर त्यांचें प्रेम पूर्वीपासून होतें काय ? "

" असलेंच पाहिजे ओळख तर होतीच. प्रेम असल्याशिवाय त्यांनीं एवढा खर्च केला नाहीं."

" मग त्यांनीं लग्न कसें केलें ? त्यांनीं लग्न केलें, त्यामुळें त्याना मी हलक्या कुळातली वाटत आहे. तू त्याना लग्न कसें करू दिलेंस ? लग्नाला तू काहींच अडचण केली नाहींस काय ? "

"मुळींच नाहीं. उलट त्यांनीं लग्न करावें, या गोष्टीला मी उत्तेजन दिलें."

" आई ? "

" काय ? "

"तुला माझ्या— आपल्या अपत्याच्या— हिताची काळजी नव्हती काय ? "

" मला काळजी पुष्कळच होती आणि आहे. डॉक्टराच्या लग्नाला प्रतिबंध केल्यानें आपलें कल्याण झालें नसतें. जें झालें तें कल्याणकारकच झालें आहे, असें मला वाटतें. "

" तें कसें ? "

" ज्या लोकांचीं लग्नें एका अंगवस्त्राला ठेवल्यामुळें होत नाहींत, त्याना पुढें आपण कायमचें हलक्या स्थितीप्रत आलों आणि आपलें कुळ कायमचें हलकें बनलें, असें वाटतें. आणि पुढें त्या स्त्रीविषयीं द्वेष उत्पन्न होतो. ब्राह्मण-शेणव्यासारख्या जातींच्या पुरुषाला आपण चांगल्या कुळात राहण्याची संधि का नाकारावयाची ? तर त्याचा पैसा एकसारखा आपल्याला मिळावा म्हणून ! पण यात पुरुषाचें कल्याण होत नाहीं. तो आपल्या जातीला आणि तिच्या सदृश समाजाला कायमचा मुकतो. त्याची महत्त्वाकांक्षा नाहींशी होते चांगले लोक बरोबरीच्या लोकातच वागत हिंडत असले म्हणजे मोठेपणाची इच्छा त्याच्या मनात कायम राहते. त्याचे आप्तसंबंधीं वगैरे मोठे लोक असतात. तथापि ते एका नायकिणीबरोबर राहिले म्हणजे त्याच्याकडे कोणी प्रतिष्ठित लोक जाणार येणार नाहींत आणि त्यामुळें पैसा मिळविण्याची इच्छा देखील त्याच्यामध्यें

नाहींशी होते. माझें तुझ्या बाबावर खरें प्रेम आहे. त्यानीं आपल्या जातीला माझ्यासाठीं मुकावें असें मला वाटत नाहीं. माझ्याशीं लग्न करावें असा मीं आग्रह धरला नाहीं. माझ्याशीं रजिस्टर लग्न करावयास डॉक्टराना सांगा, म्हणून कांहीं मडळींनीं मला उपदेश केला; पण तो मी मुळींच मानला नाहीं."

" तूं चूकच केलीस आई ! "

" मीं मुळींच चूक केली नाहीं मला दोष देण्यात तूच चूक करीत आहेस. तुला जग मुळींच समजलें नाहीं."

" कसें काय तें मला सांग ! तुझें करणें मला खरोखरच समजत नाहीं ! "

" तूं खरें बोलत आहेस. तुझ्या कल्पनाच चुकीच्या झाल्या आहेत. तू शाळेंत गेल्यामुळें आपल्या लोकाची खरी रीत तुला गैर वाटू लागली आहे. मी खरोखर तुझ्या शाळेंत जाण्याच्या विरुद्धच होतें. पण तुझ्या बाबाचा आग्रह होता म्हणूनच तुला शाळेंत पाठविलें. मी लग्न लावून त्याचा फायदा काय केला असता किंवा माझा फायदा काय केला असता ? तर ते मला पुढें पुढें आपणास तारुण्यात मोह पाडणारी म्हणून माझा द्वेष करू लागले असते. आणि त्याच्याहि आयुष्याचें स्वारस्य निघून गेलें असतें."

" म्हणजे ? लग्नात कांहीं फायदा नाहीं काय ? "

" जें लग्न जातींत नाहीं, तें नाटकी लग्न होय अशा लग्नानें इंग्रज लोकात मिसळताना प्रतिष्ठितपणा येत असेल; पण जेव्हा इंग्रज लोकाच्या घरीं जाण्याचा मला ते आग्रह करीत, तेव्हा ते मला आपली मैत्रीण बनवीत, आणि मलाहि त्याच्याबरोबर हिंडण्यात कमीपणा येत नसे."

" पण लग्नाच्या अपत्याना कायदेशीर वारसाचे हक्क आहेत ! "

" म्हणजे तुझें शेवटीं पैशावरच बोलणें आलें ! इंग्रजानीं तुला हेंच नीतिशास्त्र शिकवलें असें दिसतें. मनात हेतु पैशाचा—म्हणजे वारसाहक्काचा ठेवायचा, आणि बोलताना गप्पा मात्र नीतीच्या मारावयाच्या ! "

" तसें नव्हे आई, मी पैशाच्या दृष्टीनें बोलत नाहीं. मला बाबाच्या

पैशाचा लोभ नाहीं. तूं मिळविलें आहेस, तें मला पुरून उरेल इतकें आहे."

"तू औरसपणाच्या गोष्टी करता करता जशी शेवटीं वारसाहक्कावर आलीस, तशींच इतर माणसें येतात. तू ऐकलेली भाषा पुन्हा वापरलीस एवढेंच. पण त्या नितिशास्त्राच्या मागें केवळ पैशाच्या गोष्टी आहेत, हें तूं ओळखलें नाहींस."

"पैसे असलेले लोक बायकोशिवाय दुसरें अंगवस्त्र बाळगतातच; हें सर्वच लोकात आहे. आणि तुझ्या वडिलानीं जर लग्न केल्यानतरच मला ठेवून घेतलें असतें तर मी त्याच्यापाशीं राहिलें का नसतें? राहिलेंच असतें. त्यानीं लग्न करण्याच्या अगोदरच मला ठेवून घेतलें. एवढयाबद्दलच त्यानीं आता लग्न करू नये, करायचें असेल तर माझ्याशींच राजिस्टर्ड पद्धतीनें लग्न करावें, असा आग्रह धरणें आणि त्याचें स्वाभाविक आयुष्य बिघडविणे हें निव्वळ आपलपोटेपणाचें झालें असतें. तथापि माझी तशी आपलपोटेपणा करण्याची इच्छा नव्हती. ते मला आपली मैत्रीण म्हणत, तर मलाहि असें वाटू लागलें कीं आपण त्याच्याशीं खऱ्या मित्राप्रमाणें वागलें पाहिजे. आणि म्हणूनच त्यानीं आपला स्वाभाविक आयुष्यक्रम सुरू करावा, आणि माझ्याशीं मित्रत्वाचें नाते ठेवावें, असेंच मला वाटलें. या माझ्या वृत्तीमुळे माझाहि फायदा झालेला आहे."

"तो कसा काय?"

"मीं असें ठरविले कीं त्याच्या पैशावर आपण अवलंबून राहवयाचें नाहीं. आपलपोटेपणाचे विचार माझ्याहि मनात येत. पैशाच्या तहानेंमुळे एके दिवशीं मला माझी पैसे मिळविण्याची योग्यता अचानक कळून आली. मुबईला धर्मार्थ चार जलसे करण्यात आले होते. त्या जलशात मीं गावयास जावें, अशी त्यानीं सोय केली. पहिल्या जलशात माझें गाणें झाल्यानतर एकदम मी लोकात प्रसिद्ध झालें. पुढच्या जलशाचीं तिकिटें भराभर खपलीं आणि माझ्यामुळें इतका फायदा त्या सस्थेस झाला, हें लक्षात घेऊन त्या सस्थेनें मला प्रत्येक खेळाचे पंचवीस याप्रमाणें शभर रुपये दिले. त्यानतर मला एकेका रात्रीच्या गाण्याचे दोनशें रुपये मिळाले आहेत. या दोनशें रुपयानीं जो आनद झाला, तो पुढें कधींच झाला नाहीं.

या आनंदाचा दुसरा एक परिणाम झाला. तुझ्या वडिलाची मी खरोखर मित्र बनावें, आश्रित नसावें, अशी भावना माझ्या मनात उत्पन्न झाली, आणि मीं त्याना ती गोष्ट बोलूनहि दाखविली. त्याना ती कल्पना आवडली. ते म्हणाले,

'गायिका या नात्यानें तू स्वतंत्रपणें धंदा करशील, तर मी तुझा धंदा वाढविण्यासाठीं हवी ती खटपट करीन.'

"त्यानीं कांहीं दिवस माझें व्यवस्थापकाचें काम केलें मी त्याच्या राहण्याचा बगला सोडून दिला; पण जवळच एक लहानशी बगली भाड्यानें घेऊन राहिले; आणि लोकानी मला विनाकरण त्रास देऊ नये, यासाठीं म्हणा किंवा माझ्यावर आपला एकट्याचा काहीं हक्क आहे अशी जाणीव असल्यामुळें म्हणा, त्यानीं एक शीख दरवान ठेवला आणि माझ्या नावाची पाटी बाहेर लावली. ती पाटी मला आवडत नव्हती, म्हणून मीं दोनचार महिन्यानीं ती काढूनच टाकली. कारण दोनचार महिन्यात माझी अवश्य ती प्रसिद्धि झाली."

"मग पाटीवर तू नाव कसें काय लिहिलेंस ? रगू नायकीण असेंच लिहिलेंस काय ?"

"नाहीं. काय लिहावयाचें तेंहि मीं ठरवू शकलें नाहीं. त्यानींच पाटीवर 'मिस् रंजिता वेरेंकर' असें नाव लिहिलें होतें."

"तरीच तुला विचक्षणा 'रजिता' या नावानें ओळखत होती ! आणखी पाटीवर काय लिहिलें होतें ?"

"पाटीवर गायिका आणि नर्तकी असें लिहिलें होतें आणि भेट-याची वेळ सध्याकाळीं चार ते सहा दिली होती. या वेळेखेरीजकरून मला दुसऱ्या कोणत्याहि वेळेला लोकानीं भेटू नये, हा नियम कडकपणें अमलात आणण्याचें त्या शीख दरवानावर सोपविलें होतें. पुढें मी आपले साथीदार ठरविले आणि लोकाच्याकडे गायनाला जाऊ लागलें. पण कोठेंहि गायनाला गेलें म्हणजे तो शीख मजबरोबर नेहमीं असे आणि त्यामुळें माझ्याशीं फाजीलपणा करण्याचें धैर्य कोणासहि होत नसे."

"आपल्या घरीं जो संगीताचा पुस्तकसंग्रह आहे तो तूं केव्हां आणलास? तो तू आणलास कीं बाबानीं तुला दिला?"

"माझें घर नवीन स्थापन झाल्यानंतर तुझ्या बाबानीं, लोकांनीं मला भेटावयाचा दिवाणखाना कसा सजवावा, हें स्वतःच ठरविलें. माझें मराठी चार यत्तापर्यंत शिक्षण झालेंच होतें. पण संस्कृतमध्यें र, ट, फ तरी करता यावें, म्हणूत त्यानीं मला शिकविण्यासाठीं एक शास्त्री ठेविला. त्यानीं माझ्याकडून शेंदोनशें निवडक संस्कृत श्लोक पाठ करून घेतले त्यात काहीं संगीतरत्नाकरातले तर काहीं भरताच्या नाट्यशास्त्रातले असें होते म्हणजे लोकांशीं संभाषण करतांना कसल्यातरी व्याख्या सांगणारे एकदोन संस्कृत श्लोक म्हटले म्हणजे श्रोते मंडळी दिपून जात आणि त्यामुळें माझ्या ज्ञानाचीहि तारीफ थोडीबहुत सुरू होई. लोक भेटावयास येणार त्या वेळेस टेबलावर कोणते तरी संस्कृत ग्रंथ, त्याप्रमाणेंच मराठी पुस्तकें उघडीं ठेवलेलीं असावींत, म्हणजे मी शास्त्रीय तऱ्हेनें संगीताचा अभ्यास करणारी आहे, असा लोकांत बोभाटा होई.

"मी शास्त्र मुळींच शिकलें नाहीं आणि जुन्या संस्कृत ग्रंथाचा माझ्या आजच्या गायनकलेला काहीं उपयोग आहेसें मला वाटत नाहीं. पण मला संस्कृत ग्रंथाचें ज्ञान आहे, अशी प्रसिद्धि माझे साथीदार करीत. मीं संस्कृत शिकविणाऱ्या शास्त्रीबुवाना किती लठ्ठ पगार देतें, हें फुगवून सांगत. थोडक्यात सांगायचें म्हणजे, पहिल्याच वर्षांत माझें सुमारें दोन हजार रुपये शिल्लक पडले. तेव्हा डॉक्टरानीं मला भायखळ्याजवळ काहीं जमीन घेऊन दिली त्या वेळेस ती दोन रुपये वार होती. आज तिच्या आसपासची जागा पन्नास रुपये वार झाली आहे. आणि मी अर्ध्या जागेंतच इमारत बांधली, ती देखील कर्ज काढूनच बांधली. तें कर्ज मला डॉक्टरानीं दिलें आणि तेवढ्यात इमारत पुरी झाली नाहीं, तेव्हा ती इमारत पुरी करण्यासाठीं डॉक्टराच्या ओळखीच्या एका सॉलिसिटरमार्फत पैसे मिळविले.

"अशा तऱ्हेनें माझ्या इस्टेटीला प्रारंभ झाला. मीं डॉक्टराचे पैसे पुष्कळदा घेतले आहेत; त्याप्रमाणेंच जेव्हा डॉक्टराना पैशाची जरूरी

लागली, तेव्हा त्यानीं काढलेल्या कर्जाबद्दल मीहि जामीन राहिलें आहे. थोडक्यात सागावयाचें म्हणजे, मी स्वतत्र राहू लागल्यापासून जवळ जवळ पहिल्याच महिन्यापासून पैशाच्या दृष्टीनें अगदीं स्वतत्र आहे. तू झालीस त्या वेळीं तुला देणगी म्हणून तुझ्या बाबानीं तुझ्या नावावर हजार रुपये ठेवले तेवढेच. ते मधून मधून मला देणग्याहि आणीत. पण डॉक्टराचें लग्न झाल्यानतर त्याच्या मुलींना मी पुष्कळच देणग्या दिल्या आहेत; आणि डॉक्टराच्याकडून मजकडे जवळ जवळ काहींच येत नसल्यामुळें डॉक्टरीण-बाईहि माझा द्वेष करीत नाहींत.

"बायकाच्या मत्सरात देखील प्रेमापेक्षा पैशाचा सबध जास्त असतो, ही गोष्ट मला पक्की ठाऊक आहे. आपल्या नवऱ्याचे पैसे दुसऱ्या बाईकडे जात नसले, तर बायका दुसऱ्या बायकाचा द्वेष करीत नाहींत, एवढेंच नाहीं, तर काहीं ठिकाणीं दुसऱ्या श्रीमत विधवाचे पैसे आपल्याकडेच यावेत, यासाठीं त्या श्रीमत विधवाशीं प्रेम जुळविण्यास आपल्या नवऱ्याना उत्तेजनच देतात, अशीं उदाहरणें या मुबईत मी पुष्कळच पाहिलीं आहेत."

"भायखळयाजवळील आपल्या इमारतीशेजारची अर्धी जमीन कोठें गेली?"

"इमारती बाधल्यानतर पाच वर्षांनीं जागेच्या किंमती वाढल्या, आणि ती जागा मीं पधरा हजार रुपयास इमारतीवरील कर्ज फेडण्यासाठीं विकली."

"डॉक्टराच्याकडून आपण पैसे घ्यावयाचे नाहींत, उलट आपणच त्याना पैशाची मदत करावयाची, अशी वृत्ति ठेवण्यात आपला काय फायदा झाला?"

"मी स्वतंत्र आहे आणि माझ्या पैशाबद्दल व कर्जाबद्दल मीच जबाबदार आहे; आणि आपण आपला स्वतत्रपणे मार्ग काढला पाहिजे, ही भावनाच माझ्या उन्नतीच्या मुळाशीं होती. आज डॉक्टरापेक्षा आपली इस्टेट जास्तच झालेली आहे, ही गोष्ट तुला ठाऊक असेल. डॉक्टरावरच मी अवलबून असतें, तर त्याना खूष कसें ठेवावें व त्याना कसें ओरबाडून घ्यावें इकडेच माझें लक्ष गेलें असतें. पण स्वतंत्र धदा करणारी स्वतंत्र व्यक्ति या नात्यानें मी वागू लागल्यामुळेंच माझें हित झालें आहे.

# ८

# लोकाभिरुचि आणि साहित्यशास्त्र

प्रत्येक कृति उत्पन्न होते तेव्हापासूनच तिचें परीक्षण लोकाकडून होऊ लागतें. तें परीक्षण शब्दानीं नेहमीं व्यक्त होतें असेंहि नाहीं. तें परीक्षण अगर मत शब्दानीं जरी व्यक्त झाले नाहीं तरी तें तें कृतीनें व्यक्त होतें. लढवय्ये–मुत्सद्दी याना हा नियम जसा लागू आहे तसाच तो कवींनाहि लागू आहे. मराठी कविता जितकी जुनी आहे तितकेंच तिचें परीक्षणहि जुनें आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं. मराठी कवितेचा जर इतिहास लिहावयास पाहिजे तर त्याबरोबर तिच्याबरोबर जन्मास आलेल्या परिक्षणाचाहि इतिहास लिहिला पाहिजे; किंबहुना कवितापरीक्षणाच्या इतिहासाशिवाय कवितेचाहि इतिहास अपूर्ण होईल असें म्हटलें तरी चालेल.

काव्यपरीक्षणाच्या इतिहासाचें वाङ्मयेतिहासात जसें महत्त्व आहे तसेंच त्याचें साहित्यशास्त्राच्या इतिहासात महत्त्व आहे सस्कृतामध्यें जें साहित्यशास्त्र झालें, तें लक्षात घेऊन जुनें मराठी वाङ्मय उत्पन्न झालेलें नाहीं. सस्कृत साहित्यशास्त्रावरील अनेक ग्रथ प्रचलित देशी भाषातील वाङ्मयाचा बराच विकास झाल्यानतर झाले आहेत उदाहरणार्थ: जगन्नाथ रायाचा रसगगाधर हा ग्रथ तर अत्यत अर्वाचीन होय हा ग्रथ तयार झाला तेव्हा हिंदी, मराठी, गुजराती, बगाली इत्यादि भाषात वाङ्मयहि पुष्कळ तयार झालें होतें पण संस्कृत साहित्य–शास्त्रावरील ग्रथकारानीं या नव्या वाढीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. नवीन प्रकारच्या ग्रथाकडे लक्ष देऊन जे काहीं तात्त्विक नियम निघतील त्या नियमाचा अजूनहि अतर्भाव जुन्या साहित्यशास्त्रात करण्याची क्रिया अजूनहि झाली नाहीं. या नवीन विकासा-कडे कोणत्या दृष्टीनें पहावें हेंदेखील सस्कृत साहित्यकारास समजलें नसावें

असें दिसतें. अर्वाचीन काळच्या वाङ्मयपंडितास जुन्या साहित्यशास्त्रास अर्वाचीनत्व आणणें हें एक महत्त्वाचें अभ्यासक्षेत्र आहे.

नवीन वाङ्मयावर तत्कालीनाकडून विचार झाला नाहीं असें नाहीं. पण त्या विचाराचेंहि महत्त्व संस्कृत साहित्यशास्त्रकारास नव्हतें. त्यास कारणें अनेक आहेत. या नवीन उत्पन्न होणाऱ्या वाङ्मयाला एक तर काव्य म्हणण्याची इच्छा नव्हती; किंवा प्राकृताचें वाङ्मय, आणि त्यावर प्राकृताची टीका, हीं विचारात काय घ्यावयाचीं अशा प्रकारची वृत्ति संस्कृत साहित्यशास्त्राच्या ग्रंथकारात असावी.

पण साहित्यशास्त्रकाराची ही प्राकृत वाङ्मयाकडे दुर्लक्ष करण्याची वृत्ति बरोबर नाहीं. कारण या वृत्तीनें त्यानीं आपल्या ग्रंथाची वाढ खुटविली असेंच म्हणावें लागेल. ज्ञानेश्वरीसारख्या वेदान्तग्रंथाला काव्य या सदरात घालता येत नाहीं म्हणून त्यानीं त्याकडे दुर्लक्ष केलें, तर त्यात त्याचा दोष नाहीं. तथापि " पृथ्वीराजरासा " " अल्हखंड " वगैरे हिंदी ग्रंथाचा तरी त्यानीं विचार करणे अवश्य होतें. त्यानीं त्यावेळेसच जर विचार केला असता तर आतापर्यंत भारतीय साहित्यशास्त्राला निराळें वळण लागून गेलें असतें.

लोकाची आवडनिवड, कवीची कृति आणि साहित्यशास्त्र याचा अन्योन्य संबंध काय काय असतो याविषयीं अगोदर थोडेंसें लिहिलें पाहिजे.

साहित्यशास्त्र हें वाढतें शास्त्र आहे. नवें वाङ्मय उत्पन्न होतें तसतशी त्यावर लोकाची आवडनिवड व्यक्त होते आणि ती आवडनिवड नियम उत्पन्न करून शास्त्र वृद्धिंगत करते.

साहित्यशास्त्राचे नियम तयार झाले म्हणजे काव्यपरीक्षक त्या नियमाप्रमाणें कवि चालला आहे किंवा नाहीं हें पाहू लागतात, काव्य-परीक्षकाच्या या प्रकारच्या टीकेमुळें कित्येक लेखक भितात तर कित्येक दांडगाई करून पुढें जातात. ते असें समजतात कीं, साहित्याचे नियम सूचक किंवा मार्गदर्शक आहेत, त्याचें दास्य उपयोगी नाहीं. ज्या अर्थीं साहित्यशास्त्र हें लोकाच्या आवडीनिवडीचें शास्त्र आहे. त्याअर्थीं लोकाची

आवडनिवड ही प्रधान आहे आणि साहित्यशास्त्राचे जमा झालेले नियम अप्रधान होत. लोकाची व्यक्त झालेली आवडनिवड नियम शोधू पहाणाऱ्या तत्त्ववेत्त्याच्या साहित्यशास्त्राच्या घटनेस मदत करते. हें तत्त्व ओळखून धैर्यवान कवि आपली कृति साहित्याचे नियम झुगारून प्रत्यक्ष जनतेपुढें नेली पाहिजे आणि तीवर प्रत्यक्ष जनतेचें मत घेतलें पाहिजे, हें ओळखतात. या प्रकारचे कवि काव्यौघास निराळे वळण देतात. एवढेच नव्हे तर साहित्यशास्त्राचीहि सुधारणा करतात.

लोकाची आवडनिवड निर्दोष असते असे नाहीं. पण ती समजून घेतली पाहिजे. उत्तम कलेचा कवि देखील प्रथम लोकाना अप्रिय असणें शक्य आहे, पण कवि चागला असला तर त्याच्याशीं जनतेचा विरोध फार दिवस रहात नाहीं. उत्तम कवि आपली आवड लोकाच्या मनात स्थापन करील. कवीच्या अभिरुचीप्रमाणें लोकाभिरुचि तयार होणें शक्य आहे, ही गोष्ट दूरदर्शी कवि समजून असतो.

लोकाच्या आवडीनिवडीचे परीक्षण करणें व ती आवड जाणून लिहिणें ही क्रिया प्रत्येक लेखक करीत असतो जो लेखक आपण असें करीत नाहीं असें म्हणतो, तो एक तर आपण काय करीत आहों याविषयीं अज्ञानी असला पाहिजे, किंवा स्वतंत्र वृत्तीविषयीं खोटी बढाई मारणारा असला पाहिजे.

लोकाच्या आवडीनिवडी काहीं अशीं प्रत्यक्ष ग्रथाच्या वाचनानें उत्पन्न झालेल्या असतात, तर काहीं अंशीं पूर्व ग्रथावर व्यक्त झालेल्या मतामुळेंच उत्पन्न झालेल्या असतात त्या व्यक्त झालेल्या मताचा परिणाम उत्तरकालीन अभिरुचीवर घडतो. हें लक्षात घेऊन टीकावाङ्मय लोकभिरुचीचें निर्णायक कितपत झालें हें आपणास पाहिलें पाहिजे. अभिरुचीचा आपण इतिहास लिहू लागलों तर काव्यपरीक्षणाचा इतिहास हा लोकाभिरुचीच्या इतिहासाचा भाग होईल. व अभिरुचीचा इतिहास हा वाङ्मयेतिहासाचा भाग होईल. वाङ्मयाचा इतिहास अभिरुचीच्या इतिहासावाचून समजावयाचा नाहीं. आणि यासाठीं लोकाचीं काव्यविषयक मतें निरनिराळ्या काळीं कशीं व्यक्त झालीं व बदलत गेलीं हें पाहिलें पाहिजे आणि त्यात काहीं विकास झाला असेल तर तोहि शोधून काढला पाहिजे.

## काव्यपरीक्षक आणि जनता.

जनता हें काव्याचें शेवटचें न्यायासन आहे. आणि काव्यपरीक्षक हें मधलें न्यायासन आहे ज्याप्रमाणें शेवटचें न्यायासन पुष्कळदा खालच्या कोर्टांचा निकाल कायम करतें व कांहीं प्रसंगीं अगदीं फिरवून टाकतें त्याप्रकारची स्थिति वाङ्मयक्षेत्रातहि आहे. किंबहुना अशीहि उपमा देता येईल कीं काव्याचा विरुद्ध परीक्षक हा वादी आहे आणि ग्रंथकार हा प्रतिवादी आहे, आणि काव्याकडे अनुकूल वृत्तीनें पाहून त्याचें परीक्षण करणारे टीकाकार हे प्रतिवादीचे वकील आहेत. व काव्याविरुद्ध खटला जनतेच्या दरबारात अनेक वर्षें चालत राहून त्याचा निकाल होतो, आणि तो देखील न कळत होतो. जनता एकच निकाल देते आणि तो म्हटला म्हणजे काव्य जिवत रहाणार कीं मरणार याविषयींचा असतो. ज्याप्रमाणें खालच्या कोर्टाचा निकाल व विरुद्ध किंवा तर्फेच्या वकीलाचीं बोलणीं हीं अंतिम न्यायाधिशाचें मत बनविण्यास उपयोगी पडतात, त्याप्रमाणेंच काव्य परीक्षकवर्गाचें म्हणणें जनतेस आपला निर्णय ठरविण्यास उपयोगी पडतें. आणि या दृष्टीनें टीकाकाराच्या वाङ्मयाचें महत्त्व आहे. ज्याप्रमाणें वेडेवाकडें आणि चुकानीं भरलेलें भाषण करू नये म्हणून वकिलाच्या भाषणावर कोर्टाची टेहळणी असते त्याप्रमाणें दीर्घकालानें निकाल देणारी जी जनता तिच्या तर्फेनें टीकाकाराच्या वाङ्मयावरहि विचार झाला पाहिजे चांगल्या टीकेची निर्भर्त्सना हीं जर समाजात नसतील तर टीकाकार हे अगदीं बेजबाबदार होतील प्रामाणिक व मार्मिक टीकेबद्दल अभिज्ञता देखील ताबडतोब होत नाहीं. ती व्यक्त होण्यासाठीं देखील काळ लोटावा लागतो. वाङ्मयपरीक्षणाचे इतिहास यासाठींच उपयोगी पडतात.

काव्यपरीक्षणाच्या इतिहासाचें दुसरें एक महत्त्व आहे. तें म्हटलें, म्हणजे टीकाकारलेखकास त्याचें कार्य काय आहे तें समजून यावें. मार्मिक, जबाबदार आणि दूरदृष्टि टीकाकारास आपण टीका करताना वाङ्मयाच्या विशिष्ट विकासास मदत करीत आहों कीं अपकर्ष करीत आहों याची कल्पना असणें अवश्य आहे. काव्यपरीक्षण कोणत्या बाजूनीं चालू आहे, कोणत्या बाजूंनीं चालू नाहीं हें टीकाकारास समजलें पाहिजे. काव्यपरी-

क्षणाचा व अभिरुचीचा स्थूल इतिहास टीकाकारास ठाऊक असला म्हणजे त्याची टीका देखील उत्तरोत्तर अधिक सुशिक्षित होत जाईल.

महाराष्ट्रीय काव्यपरीक्षणाच्या इतिहासात आपणास काहीं विकास दृष्टीस पडतो. मुद्रण केलेल्या काळापूर्वी टीकालेखन फारच संक्षिप्तप्रकारें होई तर मुद्रणकलेच्या आगमनानंतरच्या काळात विस्तृत होऊं लागलें. तथापि पूर्वपरंपरेची वृत्ति पूर्वी काय होती व ती बदलत कशी गेली हें देखील पहाणें एक तऱ्हेचा इतिहास दाखवील आणि तो इतिहास महाराष्ट्रातील वाङ्मयेतिहासाचा किंवा बौद्धिक इतिहासाचा महत्त्वाचा भाग होईल.

मराठी काव्याचें परीक्षण करण्याची पद्धति, ब्रिटिश राज्यानंतर जेव्हा निबंध लिहिण्याची पद्धत सुरू झाली तेव्हापासूनच उत्पन्न झाली असें म्हणता येणार नाहीं. त्या पूर्वीच्या काळात देखील लोकांना मतें होतीं व तीं मतें ते व्यक्त करीत असत त्या मताचें विवरण मात्र करण्यात येत नसे. ज्याप्रमाणें जेवणारा मनुष्य कोणाचा स्वयंपाक चांगला हें सांगू शकतो पण तो स्वयंपाक चांगला कां हें त्याला सांगता येणार नाहीं, त्याप्रमाणेंच काव्याचें आहे. ज्याला जें काव्य आवडतें तें तो पाठ करतो किंवा गातो आणि या रीतीनें तो आपली आवड व्यक्त करतो. अमुक एक काव्य लोकप्रिय कां झालें हें तत्त्ववेत्ता सांगावयाचा प्रयत्न करतो पण तो जनतेच्या आवडीनिवडीचें स्पष्टीकरण करतो.

आपल्या पूर्वजांनीं जुन्या कवींविषयीं ज्या आवडी व्यक्त केल्या त्याच्या आवडीच्या अवलोकनापलीकडे आपण आज बरेंच गेलों आहों व थोडीशी विवेचक शक्तीहि खर्च केली आहे. तथापि पूर्वींच्या लोकमतांत महत्त्वाचा बदल झाला आहे असें वाटत नाहीं.

सुश्लोक वामनाचा अभंग वाणी प्रसिद्ध तुकयाची
ओंवी ज्ञानेशाची किंवा आर्या मयूरपंताची ॥

असें प्रल्हाद बडव्याप्रमाणें आजचा वाचक देखील म्हणेल.

महाराष्ट्रीयाच्या काव्याभिज्ञतेचा इतिहास द्यावयाचा म्हणजे दोन गोष्टी करावयाच्या. काव्यविषयक जी सामान्य चर्चा निरनिराळ्या ग्रंथ-

कारानीं केली असेल तिचें स्वरूप दाखवावयाचें आणि त्याप्रमाणेंच विशिष्ट कवि घेऊन त्याच्या काव्याची अभिज्ञता समकालीनानीं व उत्तर कालीनानीं कशी दाखविली हें दाखवावयाचें. चालू समाज जेव्हा अभिज्ञता दाखवितो तेव्हा ती अभिज्ञता त्या कालातीलच तरुणाच्या मनावर परिणाम करून वाङ्मयाच्या पुढील प्रवाहाचें स्वरूप ठरविते. उलटपक्षीं जें वाङ्मय उत्पन्न होतें त्याच्या ग्रहणानें कांहीं अशीं समकालीनाची व बऱ्याच अशीं उत्तरकालीनाची अभिरुचि बनते. एवंच काव्याची अभिज्ञता, आणि उत्पादन या गोष्टी परस्परावर परिणाम करणाऱ्या आहेत. वाङ्मयाचा इतिहास लिहिताना जें वाङ्मय उत्पन्न झालें त्याच्या कडेसच लोकाचें लक्ष वेधतें आणि वाङ्मयेतिहासात निरनिराळ्या काळातील वाङ्मयाचें स्वरूप पाहून आजचा लेखक अभिप्राय देतो. तथापि प्रत्येक काळात लोकमत होतें आणि तें परिणामकारी होतें आणि भावी वाङ्मयाच्या स्वरूपाचें कांहीं अशीं निर्णायक होतें ही गोष्ट प्राधान्यानें पुढें आणण्यासाठीं लोकाच्या अभिज्ञतेचाच इतिहास निराळा काढून मांडल्यास एकंदर वाङ्मयाच्या इतिहासास मदत केल्यासारखें होईल. एवढेंच नव्हे तर ज्या बाजूकडे पुष्कळ लोकाचें लक्ष जात नाहीं ती बाजू चवाठ्यावर मांडल्यासारखेंच होईल.

काव्याभिज्ञता दोन तऱ्हेनें व्यक्त होते. लोक जेव्हा काव्यविषयक तात्त्विक चर्चा करतात तेव्हा आपलीं मतें प्रदर्शित करतात, व त्याप्रमाणेंच दुसऱ्या एखाद्या कवीवर मत देतात तेव्हा तीं प्रदर्शित करतात. या दोन्हीं तऱ्हानीं महाराष्ट्रीय अभिरुचीचा इतिहास देता येण्याजोगा आहे. " कवित्व हें नोहे टाकसाळी नाणें " असें जेव्हा तुकाराम वदतो तेव्हा तो काव्यविषयक निरपेक्ष विचार व्यक्त करतो. तसेंच—

" ज्ञानेश्वरी पाठीं । जो वोवी घालील मऱ्हाटी ।
तेणें अमृताचे ताटीं । जाण नरोटी ठेवली ।। "

असें जेव्हा एकनाथ सांगतो तेव्हां तो कवितेविषयीं सापेक्ष मत व्यक्त करतो. आपणास या दोन्हीं प्रकारचें साहित्य जमा करून महाराष्ट्राच्या

काव्यविषयक सापेक्ष अभिरुचीचा आणि निरपेक्ष कल्पनाचा इतिहास द्यावयाचा आहे.

पण हें विधान देखील थोडेसें नियमित केलें पाहिजे अभिरुचीचा इतिहास द्यावयाचा म्हणून सांगितलें तेथें एकंदर अभिरुचीचा इतिहास द्यावयाचा विचार नाहीं. तर अभिरुचीच्या इतिहासाचें जें एक अंग काव्यपरीक्षण हें आहे, त्या अंगाचाच इतिहास प्राधान्यानें द्यावयाचा आहे. हा इतिहास देण्याजोगा विषय आहे किंवा नाहीं याविषयीं शंका बाळगण्याचें कारण नाहीं समाजातील प्रत्येक क्रिया तत्त्वज्ञानाच्या विचाराचा विषय झाली पाहिजे आणि तत्त्वज्ञांनीं विचार करताना त्या क्रियेचें दीर्घकालीन स्वरूप अवलोकिलें पाहिजे

वाङ्मयाच्या क्षेत्रांत काम करणारे जे अनेक प्रकारचे लोक आहेत ते कांहीं विशिष्ट क्रिया करीत असतात. निरनिराळ्या क्रियांचा अन्योन्याश्रय आणि हेतु कांहीं अंशीं तत्कालीन क्रियांच्या अवलोकनानें दृष्टीस पडतो, तर कांहीं क्रियांची उपयुक्तता दीर्घकालानेंच दृष्टीस पडते. यासाठीं समाजशास्त्रांत प्रत्येक कार्यसमुच्चयाचें आणि तदंतर्गत क्रियांचें दीर्घ-कालीन स्वरूप पाहण्याची पद्धति पडली आहे. टीकाकारांच्या प्रयत्नांचा परिणाम कांहीं अंशीं तत्कालीन दिसून येतो तर कांहीं अंशीं दीर्घकालानें दिसून येतो. तसेंच असेंहि दिसून येतें कीं, कांहीं कृत्य कायमचा परिणाम कोणताच घडवीत नाहीं. तर त्या तऱ्हेच्या कृत्यांच्या निष्फलतेचीहि जाणीव झाली पाहिजे. समाजांत होणाऱ्या प्रत्येक क्रियेची कार्यप्रवीणता किंवा एफीशिअन्सी तपासीत बसण्यानें ती क्रिया अधिक कार्यप्रवीण होण्यास मदत होते. टीकेची कार्यप्रवीणता बघावयाची म्हणजे निदान कांहीं तरी काळ जावा लागतोच व या दृष्टीनें टीकेविषयीं ऐतिहासिक विचार करण्याची आवश्यकता उत्पन्न होतेच.

वर्तमानपत्रें व मासिकें यांतून टीका करण्याची पद्धत सुरू झाल्यास जवळ जवळ दोन पिढ्या झाल्या. या दोन पिढ्यांत अनुभवानें टीकाकार काय शिकले आणि उत्तरकालीनांनीं पूर्वकालीनांपेक्षा काय प्रगति दाखविली हें पहाण्याजोगें आहे.

९

# लोकाश्रयी मराठी वाङ्मय

महाराष्ट्रीय अभिरुचीच्या इतिहासास काव्यपरीक्षकाच्या विवेचनाचें आणि अभिज्ञतेचें महत्त्व आहेच तथापि जनतेची अभिज्ञता केवळ तेवढ्यावरून काढता येणार नाहीं, काव्यपरीक्षकाची अभिज्ञता ही वाचकवर्गाच्या किंवा श्रोतृवर्गाच्या आवडीनिवडीची कितपत दर्शक आहे हा प्रश्न उरतोच. ग्रथांची लोकप्रियता केवळ मध्यस्थाच्या शिफारशीवर अवलबून असते अशातला भाग नाहीं. उच्च प्रतीच्या ग्रथाची योग्यता जनतेस आपोआप समजते आणि परीक्षकाची शिफारस केवळ दुय्यमपणा पावते. जनतेंतील सामान्य व्यक्ति स्वतः परीक्षण करून दुसऱ्यास कळविणारी असते. ग्रथकारामध्यें ईर्ष्या, असूया, द्वेष इत्यादि भाव असतात हें जनता ओळखते, आणि जेव्हा उत्तम प्रकारच्या ग्रथकारास इतर ग्रथकार मत्सरानें छळूं लागतात तेव्हा जनता छळल्या जाणाऱ्याचें महत्त्व ताबडतोब ओळखते याचीं उदाहरणें आपणांस आजच्या कालात, तशींच प्राचीन कालात-देखील देता येतील. तुकारामास वह्या बुडवावयास लावण्याची क्रिया केवळ धद्यातील मत्सराची दर्शक आहे. पण तीच गोष्ट तुकारामाच्या वाणींत काहीं तरी नवें तेज आहे याची तत्कालीन लोकात जाहिरात करती झाली जनतेच्या परीक्षणात दोष असतात, पण तेच दोष धदेवाईक टीकाकाराच्या लेखातहि असतात जेव्हा अगदीं अपरिचित प्रकारचें वाङ्मय डोळ्यासमोर येतें तेव्हा जनतेस त्या प्रकारच्या वाङ्मयाची आवड उत्पन्न झाली नसल्यामुळें जनता तिकडे प्रथम लक्ष देत नाहीं. तसेंच टीकालेखकास देखील त्याप्रकारच्या वाङ्मयाची अभिज्ञता उत्पन्न झाली नसल्यामुळें टीकाकार देखील त्या नवीन प्रकाराची निंदाच करतात. या प्रकारच्या गोष्टी आपणास प्रत्येक देशाच्या वाङ्मयाच्या इतिहासांत दिसून येतात. उत्तम कवि असून त्याची समकालीनात चहा झाली नाहीं अशामध्यें भवभूति कवीचें नांव

घेता येईल. तथापि या कवीस उत्तरकालीं जें महत्त्व मिळालें त्यावरून समकालीनास रुचलें नाहीं तरी हरकत नाहीं, आपलें वाङ्मयविषयक ध्येय सोडू नये अशा तऱ्हेचा उपदेश हाच कवि अजून सर्व भारतीय कवींस करीत आहे असें म्हणता येईल. जनता उदासीन असली तरी कवींनें निराश होऊं नये; ज्यास उच्च प्रकारचें वाङ्मय पाहिजे असेल त्यास दीर्घकालीन आशावादी बनलें पाहिजे, या भावनाचा भवभूति फार जुना शिक्षक होय.

महाराष्ट्रीय वाङमय राजाश्रयानें वृद्धिंगत न होता केवळ लोकाश्रयानें वृद्धिंगत व्हावयाचें हा महाराष्ट्राला कित्येकांच्या मतें शाप लागला आहे; किंवा माझ्या मतें महाराष्ट्राला हें वरदान मिळाले आहे त्याचा पहिला अनुभव महाकवि भवभूति यासच मिळाला आहे. भवभूति हा लोकाश्रया-वर अवलबून रहाणारा कवि आणि त्याच्या वाङमयविषयक उच्च ध्येया-मुळें समकालीनाकडून गौरव होत नाहीं अशा कचाटींत सापडला असता देखील त्यानें सस्कृत भाषेला भूषणास्पद होतील अशीं तीन नाटकें लिहिलीं हें लक्षात ठेवलें पाहिजे. भवभूति हा वऱ्हाडचा. विदर्भ देश हा महाराष्ट्रात सर्वांत अगोदर सुधारलेला आणि तेथील राजावलि देखील फार जुनी, असें असता त्यास राजाश्रय न मिळता आपलीं नाटकें जत्राच्या ठिकाणीं प्रकट करावीं लागलीं. यावरून त्याची लोकाकडून काहीं तरी चहा होत असली पाहिजे. नाहीं तर जत्राच्या ठिकाणीं त्यास आपलीं नाटकें दाख विण्याची सधीच मिळाली नसती. शिवाय जर त्यास त्याच्या काळातच चहाते मिळाले नसते तर त्याचीं नाटकें टिकलींहि नसतीं; पण तीं ज्या अर्थी.टिकलीं आहेत त्या अर्थी जनतेस चागले वाङमय टिकविण्याइतकें बळ आहे खचित. भवभूतीनें लोकाची अनभिज्ञता पाहून जे उद्गार काढले आहेत त्याचा अर्थ एवढाच कीं भवभूतीची अवहेलना अदरबारी मडळची कडून झाली असेल, विदर्भाच्या राजघराण्यानें त्यास आश्रय दिला नसेल व राजाश्रयास असलेल्या इतर कवींनीं त्यास राजद्वारापासून दूर ठेवण्याचा प्रयत्न केला असेल. भवभूतीच्या कहाणीवरून त्याची लोकात चहा नव्हती असा अर्थ निघत नाहीं. तेव्हा एकदरींत जनतेच्या अभिज्ञतेविरुद्ध निकाल देण्यास जडच जाईल. याशिवाय आपणास असेंहि दिसून येईल कीं

जें चागलें होतें तेंच टिकलें, असा धोपट नियम केला तर त्यास थोडेच अपवाद आढळतील दिवसानुदिवस संशोधक नवीन नवीन ग्रथ शोधून काढीत आहेत. पण अव्वंल इंग्रजीच्या कालात जे ग्रंथ लोकात प्रचालित होते तेच ग्रथ अजूनहि लोकप्रिय आहेत आणि संशोधकानीं शोधून काढलेले ग्रंथ छापण्यास मारामार पडते. काव्यसग्रहाचे ग्रथ छापावयास किती अडचण पडत होती तें निर्णयसागरनें मधून मधून प्रसिद्ध केलेल्या कहाण्यावरून कळून येणार आहे.

सामान्य वाचक आपलें परीक्षण पुस्तक घेऊन किंवा टाळून व्यक्त करीत आहे. प्रजासत्तात्मक राज्यात जेव्हा " रेफरँडम " नें म्हणजे सर्व जनतेपुढें कायदा ठेऊन कायद्यावर जनतेचें मत घेण्यात येतें, तेव्हा जनता " होय " किंवा " नाहीं" एवढेंच उत्तर देते. आणि या रीतीनें अगदीं एका शब्दात आपला निकाल देऊन टाकते. नाटकें, सिनेमा, गाणीं याविषयीं हाच नियम सागता येईल. जनता फार टीका करीत नाहीं, पण ग्रथकाराचें भवितव्य निश्चयेंकरून ठरविते आणि ती त्याप्रमाणें भविष्यकालास आपला आदेश देऊन टाकते जनतेच्या अभिज्ञतेवर महाराष्ट्राची भिस्त आहे आणि यासाठीं सुशिक्षित अभिरुचीचा जनतेंत प्रसार होणें अवश्य आहे.

मराठी कवितेस दरबारचा आश्रय नाहीं आणि त्यामुळें दरबारी आश्रयाचे दुर्गुणहि तिला लागले नाहींत. राजाच्या खोट्या प्रशस्ती मराठींत नाहींत. जेव्हा दरबारचा आश्रय मराठी कवींना मिळाला तेव्हा त्याची नीति बिघडून तेदेखील खोटें लिहिण्यास कसे प्रवृत्त झाले याला उदाहरण वऱ्हाडच्या देवनाथ कवीचें आहे हा शिंदे सरकारचे तुकडे खात होता आणि नानाफडणिसाला शिव्या देणारा एक पोवाडा त्यानें हिंदींत केला आहे.

शिंद्यानें विश्वासघातानें नानाला तुरुगात टाकलें, त्याबद्दल त्यानें नानालाच दोष दिला आहे. या प्रकारचें तुरळक उदाहरण सोडून दिलें तर मराठी कवि सामान्यतः स्वतत्रच असत असें दिसून येतें. मराठी भाषेला राजाश्रय नाहीं ही स्थिति भवभूतीच्या कालापासून आहे असें वाटतें. ज्ञानेश्वरानतर हिंदु राज्य गेलें त्या वेळेस मराठी कवितेस मुसलमान राजांकडून आश्रय मिळाला नाहीं यांत नवल नाहीं. मराठी राज्यात

कवींच्या उपेक्षेची स्थिति फारशी पालटली नव्हती. याविषयीं प्रसिद्ध मोगरे कवीनें विष्णुशास्त्री चिपळूणकर याच्यावर लिहिलेल्या विलापिकेमध्यें जें श्लोकचतुष्टय घातलें आहे त्यातील म्हणणें जरी अक्षरशः खरें नाहीं तरी तत्त्वतः खरें आहे. तें श्लोकचतुष्टय येणेंप्रमाणें :

नाहीं राजाश्रयाचा अनुभव अजुनी लेश ज्या दुर्भगेला
जीचा धिःकार बुध्या रसिक जन गणीं आजपर्यंत केला
भेणें जी पंडिताच्या बहुत दिवस जी नीच सर्गेची राही
शास्त्रीं ठेवूं दिला न क्षणहि पद जिला ज्यावळ्या ब्राह्मणाहीं

जीला पाहुनिया निराश्रित अशी आश्वासिली वामनें
मोरोपतचि जीकडे वळवुनी घे पंडिताचीं मनें
तात्यानीं वरिता परत्र दिधलें त्वत्तातहस्तीं जिला
होता वाटत जीस तातसमची तो कृष्णशास्त्री भला

जीला श्रृंगारवीराद्यखिलनवरसा सादरें सेववोनी
होता कालानुसारें तरुग मग अलकारुनी प्रथरत्नीं
जीला तूचि स्वहस्तें रसिकजन गणीं योग्य अर्पावयाला
जीच्या आम्ही वऱ्हाडी मुदित परिणया जाहलों यावयाला

कोणी वैधव्य आलें म्हणति जन तुझ्या जीस देहावसानीं
विष्णो तूझी परी जी म्हणवुनि भगिनी आपणा धन्य मानी
त्या ज्या धर्मस्वसेचे बहुत पुरविले लाड देवोनि शिक्षा
कैसा तूझा अता ही विरह सहन करी ती महाराष्ट्र भाषा

या ओळींतील मुख्य चुकीचें विधान आहे तें हें कीं शृंगारादि नवरसानीं भाषेला मढविण्याचें श्रेय जें विष्णुशास्त्र्यास दिलें आहे तें चुकीचें आहे. वस्तुत. हें श्रेय त्याच्याकडे नसून वामनादि कवींकडे आहे.

मराठी वाङ्मय प्रारंभापासून लोकाश्रयी होतें. त्यास राजदरबारचा फारसा स्पर्श झाला नाहीं आणि त्याचे परिणाम वाङ्मयाच्या स्वरूपावर दिसून येत आहेत. ज्ञानेश्वर देवगिरी राजधानीपासून फार दूर होता. ज्ञानेश्वराची ख्याति देवगिरीला पोंचून त्याचा कदाचित् सत्कारहि झाला

असता पण तसा काळच आला नाहीं. ज्ञानेश्वरीनंतर देवगिरीचें राज्यच लयास गेलें. ज्ञानेश्वराविषयीं आदर बोपदेवानें आपल्या शुद्धिपत्रात व्यक्त केलाच आहे, ( भिंगारकरकृत ज्ञानेश्वर काल पहा ) आणि बोपदेव हा तर देवगिरीच्या दरबारात वजनदार मनुष्य होता, व देवगिरीचें राज्यहि टिकलें असतें तर ज्ञानेश्वराच्या ग्रंथाचा आदर होऊन पुढे मराठी भाषेंत झालेल्या ग्रथास महत्त्व प्राप्त झालें असते. देवगिरीच्या दरबारात ग्रथाची चहा अगदींच नव्हती असें नाहीं. चतुर्वर्गचिंतामणि या ग्रथाचा विद्वान् कर्ता हेमाद्रि हा तर तेथें प्रधानच होता. आणि बोपदेव हा देखील ग्रथकार होता. अशा सुशिक्षित राज्यात मराठी ग्रंथाची प्रतिष्ठा वाढलीच असती. तथापि ज्ञानेश्वरासारख्या मनुष्याला राजदरबारीं झालेल्या मानामुळें ग्रथरचनेकडे प्रवृत्ति झाली असती असें नाहीं मराठी राज्य जरी गेलें तरी ज्ञानेश्वरीमुळें मराठी ग्रथरचनेचा सप्रदाय स्थापन झाला हें खचित त्याच्या ग्रथास राजे लोकानीं पुढें आणलें नसून लोकानींच पुढें आणलें व राज्य जरी नष्ट झालें तरी ज्ञानेश्वरी टिकली एवढेंच नव्हे तर लोकातील मान्यतेने आणि त्यात उत्पन्न झालेल्या भागवत सप्रदायामुळें ग्रथ जिवत राहण्याची परपरा कायम झाली.

महाराष्ट्रीय वाङ्मयाला राजाचा आश्रय असे याला कोणी हालाच्या सप्तशतीचें उदाहरण देतील. पण त्यावरून कवींस राजाश्रय होता असें सिद्ध होणार नाहीं. कारण हालाची सप्तशती हा सग्रह आहे. त्या लावण्या लिहिणारे कवी निरनिराळ्या काळीं होऊन गेले. सग्रह राजानें करविला असेल पण त्यावरून कवींस राजाश्रय होता हें सिद्ध होणार नाहीं. शातवाहन राजे हे जरी ब्राह्मण होते तरी पुढें त्याचे लग्नव्यवहार इतर लोकाशीं होऊन त्याच्यामध्यें उच्च संस्काराचा लोपहि झाला असेल. महा राष्ट्रातील राजेलोकाची सस्कृति उच्च दर्जाची कोठेंच दिसत नाहीं- ज्याप्रमाणें तमाशास उत्तेजन देणारा एखादा राजा महाराष्ट्रात आज-कालच्या दिवसातहि दिसतो त्याप्रमाणेंच त्यावेळेस लावण्याचा शोकी एखादा. शातवाहन असला म्हणजे राजे लोकाची कवितेबद्दल अभिरुचि दिसून आली असें नाहीं. तथापि ज्यानें जें केलें त्याबद्दल त्याला श्रेय दिलें पाहिजे. म्हणून वाङ्मयाविषयीं उदासीन राजवर्गात हाल हा एक अपवाद होता असें म्हटलें पाहिजे.

मराठी राज्यामध्यें शिवाजीच्या कालात वाङ्मयाला उत्तेजन मिळालें. संभाजीनें देखील वाङ्मयास उत्तेजन दिलें होतें. तथापि एकदर वाङ्मयास उत्तेजन देण्यात मराठी राज्यात औदासिन्यच आहे. शिवाजी व संभाजी यानींदेखील मराठी काव्यास उत्तेजन दिल्याचा पुरावा फारसा नाहीं. मराठी राज्य गेलें आणि सुधारलेलें इंग्रज सरकार आलें. त्या सरकारनें मराठी भाषेच्या उत्तेजनास अनुकूल अशी स्थिति न ठेवता मराठी भाषेस मारक अशीच परिस्थिति ठेवली आहे.

एवच मराठी वाङ्मय हें जवळजवळ पूर्णपणें लोकाश्रयी आहे त्यामुळें ह्या वाङ्मयास राजाश्रयी वाङ्मयाचे घाणेरडे गुण लागले नाहींत. ज्या अर्थी हें वाङ्मय उत्तरोत्तर लोकाश्रयीच होत जाणार त्या अर्थी वाङ्मयाचे वाचक आणि उत्पादक याच्यामध्यें असणारे जे परीक्षक त्याच्यावरील जबाबदारी अधिक वाढली आहे आणि यामुळें त्याच्या प्रयत्नाची छाननी करणेंहि या कालात विशेष आवश्यक आहे. टीकाकारात प्रामाणिकपणा आणि अभिज्ञता हीं देखील वाढत गेलीं पाहिजे.

लोकाचें जे मत असतें तेंच मत टीकाकाराच्या लेखात अशतः व्यक्त होतें. मात्र टीका प्रामाणिक असली पाहिजे. टीकाकाराचा हेतु ग्रथाविषयीं आपलें खरें मत व्यक्त करण्याचा मात्र असला पाहिजे. तो विद्वान् आणि अभिज्ञ नसला तरी प्रामाणिक पाहिजे. जो विद्वान् नाहीं पण प्रामाणिक आहे त्याच्या टीकेचाहि उपयोग आहे. तशी टीका जनतेच्या मताची निदर्शक होते. पण टीकाकाराचा हेतु जेव्हा प्रामाणिक मत व्यक्त करण्याव्यतिरिक्त असतो तेव्हा मात्र तें टीकाकाराचें मत जनतेच्या मताचें निदर्शक नसल्यामुळें निरुपयोगी होतें. अप्रामाणिक टीका अनेक रीतींनीं दृष्टीस पडू लागते. टीकाकार कधीं कधीं हातार्शी आलेल्या ग्रथाची थट्टा करून वाचकाचें मनोरजन कसें करावें या दृष्टीनें लिहू लागतो. असल्या टीकेबद्दल कानउघाडणी वारवार झाली पाहिजे, व त्या प्रकारच्या टीकेस महत्त्व न देण्याचें लोकास शिकविलें पाहिजे. लोकास असल्या टीकाकारा-संबधानें जागरूक केलें म्हणजे पुरे आहे. म्हणजे जनता केवळ उपहासात्मक टीकेकडे लक्ष देणार नाहीं. जर विचारात घेतलेला ग्रंथ चागला असेल

तर त्याच्या उपहासाच्या योगानें टीकाकाराचें लघुत्व मात्र नजरेस येतें; आणि जर तो चांगला नसेल तर टीकाकाराच्या कोटयामुळें गचाळ ग्रंथ मात्र लोकांच्या नजरेस येतो, व ज्या ग्रंथाकडे कोणी लक्ष दिलें नसतें त्या ग्रंथास एक तऱ्हेचें चिरकालत्व प्राप्त होतें. अप्रामाणिक टीकेचा दुसरा एक प्रकार म्हटला म्हणजे तो ग्रंथ विशिष्ट कार्यासाठीं ज्या दृष्टीनें लिहिला असेल ती दृष्टि टाकून त्याला भलतीच कसोटी लावणें. उदाहरणार्थ, कोणताहि चांगला ग्रंथ घेतला तर तो लहान मुलाच्या हातीं पडला तर काय परिणाम होतील या दृष्टीनें त्याचें परीक्षण करणें. उदाहरणार्थ, एखाद्यानें गुन्हेगारी कशी होते व गुन्हेगार शोधून काढता कसा येतो यासंबधानें १०० गुन्ह्याच्या संशोधनाचा इतिहास प्रसिद्ध केला व एखाद्या टीकाकारानें ग्रंथकाराच्या हेतुकडे न पहाता त्यावर टीका आरंभली तर ती टीका अयोग्य होय असो; ज्ञानेश्वरी, अमृतानुभव इत्यादि ग्रंथ वारंवार चर्चेचे विषय झाले आहेत आणि एकनाथापासून आजपर्यंत अनेक लोक त्याविषयीं मत व्यक्त करीत आहेत. एकनाथ, मुक्तेश्वर, वामन, तुकाराम, रामदास, ही सर्व मंडळी समकालीन व्यक्तींच्या व उत्तरकालीन समाजाच्या चर्चेचा विषय झालीच आहे. त्या चर्चा लक्षात घेऊन त्यानीं काव्याभिज्ञता कशी दाखविली त्याची चर्चा पुढें येईलच.

आजचें महाराष्ट्रीय वाङ्मय पूर्णपणें लोकाश्रयानेंच वाढत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं तथापि चांगलें वाङ्मय पोसण्याइतकी जनता सुशिक्षित झाली आहे असें नाहीं, व लेखकाचा योगक्षेम जनतेवर चालेल अशी स्थिति आली नाहीं. नाटकें पूर्णपणें लोकाश्रयावरच वाढत आहेत. चांगल्या नाटकांबद्दल ग्रंथकाराना तीन हजार रुपये मिळतात असा कै. खरे• शास्त्री आणि रा खाडिलकर याचा अनुभव आहे. तरी देखील ही प्राप्ति इतकी अल्प आहे कीं ग्रंथकाराचा योगक्षेम नाटकें लिहिण्यावर अजून चालणार नाहीं. कादंबऱ्यावर प्राप्ती फारशी होत नाहीं. आणि कोणाहि कादंबरीकारास कादंबरीलेखनापासून १००० रुपयाची प्राप्ति झाल्याचें उदाहरण नाहीं. आजचा लोकाश्रय आहे तो लेखकाचा ग्रंथ जगापुढें आणण्यास त्यास समर्थ आहे व फार झालें तर थोडासा मदतीच्या स्वरूपाचा मोबदलादेखील ग्रंथकारास मिळेल. चांगली कादंबरी तयार झाल्यास ती

निदान फुकट मागण्यास प्रकाशक धावतील असा काळ आला आहे. पंचवीस वर्षांपूर्वी तसाहि काळ नव्हता. चागल्या कादबरींचें प्रकाशन होणें त्यावेळेसहि दुरापास्त झालें होतें. तथापि पचवीस वर्षांपूर्वी लेखकास काहींच मिळत नव्हतें असें नाहीं. रा बाळकृष्ण सतुराम गडकरी याच्या "सुधारणेचा मध्यकाल" या कादबरीस प्रकाशकाकडून अवघे १२५ रुपये मिळाले आणि "वाईकर भटजी" या कादबरीच्या लेखकास फक्त ५० रुपये मिळाले तितकेच रुपये "सती राणक देवी" या कादंबरीस मिळाले. पण जर गडकरी यास १२५ रुपये देऊन त्याची "सुधारणेचा मध्यकाल" ही कादंबरी प्रसिद्ध करण्यास के. मित्र पुढें आले नसते, तर ती कादबरी बाहेर पडली असती कीं नाहीं याविषयीं शकाच आहे.

लोकाश्रयामुळें वाङ्मय जगणार तर टीकाकार वर्गाचें महत्त्व आहे आणि टीकाकार वर्गाचें महत्त्व आहे तर टीकाकारानीं आपलें काम प्रामाणिकपणानें केलें पाहिजे; व त्यानीं तसें केलें नाहीं तर टीकाकाराचे कान उघडण्याची प्रवृत्ति समाजात पाहिजे; या गोष्टी ज्याप्रमाणें सागितल्या त्याप्रमाणेंच ग्रथकाराने टीकेकडे चागलें लक्ष पुरविलें पाहिजे हेंहि सागितलें पाहिजे.

प्रत्येक कवीस किंवा कादबरीकारास आपल्या ग्रथावरील टीका लक्ष-पूर्वक पाहिल्याच पाहिजेत. आणि ज्या टीका प्रामाणिकपणें केल्या असतात त्या लक्षात घेतल्या पाहिजेत, लोकमताविषयीं उपेक्षा करून कोणचेंहि चालावयाचें नाहीं आणि या वाङ्मयाच्या लोकशाहींत लोकमताकडे तर विशेषच लक्ष दिलें पाहिजे. जेव्हा वाङ्मय राजा किंवा आश्रयदाता श्रीमान् जमीनदार याच्या आश्रयानें निर्माण होत असतें तेव्हा तें वाङ्मय आश्रयदात्याच्या अभिरुचीनें मर्यादित होत असतें, आणि वाङ्मयाला जेव्हा राजे किंवा मोठे जमीनदार याचा आश्रय नाहींसा होतो तेव्हा वाङ्मय जनतेच्याच आश्रयानें सवर्धित होतें, आणि त्या स्थितीचे परिणाम वाङ्मयावर झाल्याशिवाय रहात नाहींत. जें पुस्तक मुळींच खपणार नाहीं तें छापावयास कोणीहि प्रकाशक धजावणार नाहीं. जोंपर्यंत लेखक केवळ आपल्या तुष्टीसाठीं स्वतःचे पैसे खर्च करून पुस्तकें छापीत आहे आणि एक

पुस्तकहि खपलें नाहीं तरी हरकत नाहीं असें जोपर्यंत त्यास वाटत आहे तोंपर्यंत तो लोकाभिरुचि दुर्लक्षू शकेल. पण ती देखील फारशी दुर्लक्षिता यावयाची नाहीं आपण केलेली कृति लोकाना आवडावी ही लेखकाची इच्छा असतेच आणि ती इच्छा लेखावर परिणाम घडविल्याशिवाय रहाणार नाहीं. तथापि याबरोबर हेंहि सांगितलें पाहिजे कीं पुष्कळ उच्च प्रतीच्या लेखकास आपल्या लेखाची समकालीनाकडून चहा होणार नाहीं हें ठाऊक असतें तरी तो लिहितच असतो. आणि याचें कारण आपण आजच्या जनतेची गरज भागवीत नसलों तरी भविष्यकालीन जनतेची गरज भागवीत आहों ही त्याला जाणीव असते. तथापि त्यास आपला क्रम चालू ठेवण्यास प्रचलित काळात थोडा तरी अभिज्ञ वर्ग भेटावा लागतो. कै. राजवाडे व कै. खरेशास्त्री यांनीं आपला ग्रंथप्रसिद्धीचा क्रम लोकाभिरुचि तयार झाली नसताहि कायम ठेवला व तसें करण्यात त्यानीं स्वार्थत्याग पुष्कळ केला ही गोष्टहि निर्विवाद आहे, पण त्याच्या परिश्रमाची जाणीव असलेला व त्याच्या कृतीची अभिरुचि असलेला वर्ग महाराष्ट्रात थोडा तरी होताच. तसा वर्ग मुळींच नसता तर त्याच्याकडून झाली तेवढी देखील कृति झाली नसती.

# १०

# अप्पासाहेब डग्ग्यांचें गृहचित्र

अप्पासाहेब डग्गे याचा आयुष्यक्रम शांतेबरोबर कांहीं दिवस सुखानें गेला. त्यानीं जें धैर्याचें कृत्य केले त्याबद्दल त्याच्या मनांत कांहीं दिवस अभिमान वाटत होता, व कांहीं दिवस कांहीं लोकाकडून त्याच्या धैर्याबद्दल प्रशसाहि होत होती. पण ते प्रशसेचे दिवस वर्ष दीड वर्षात आटपले. अप्पासाहेबाना आपल्या मनोधैर्याची स्तुति आवडत असे पण रूढीविरुद्ध लग्न करण्यात आपण कांहीं विशेष केलें नाहीं असें ते दाखवीत. आपण फसलों असें जर कोणास वाटत असलें तर त्यास तसें वाटण्याचें कारण नाहीं, असें ते बोलत; एवढेंच नव्हे तर त्यानीं अशीच आपल्या मनाची समजूत करून घेतली होती, व आपण मुळींच फसलो नाहीं, आपल्याला बायको सद्गुणी मिळाली आहे, तिच्या आगापीछाकडे पाहण्याचे आपणास काय कारण आहे असेंच त्यानीं लग्नापूर्वी जें आपल्या मित्रास सांगितलें होतें तेंच आपलें कायमचें मत आहे असें ते दाखवीत असत. आणि आपल्या कृतीचें ते

> " विषादप्यमृत ग्राह्य । अमेध्यादपि काचन ॥
> नीचादप्युत्तमा विद्या । स्त्रीरत्न दुष्कुलादपि । "

असें मनाशीं समर्थन करीत असत, आणि वरील श्लोकाची सथा आपल्या मनास देऊन ही वृत्ति नेहमीं असावी असा त्यानीं प्रयत्नहि केला होता. पण त्या वृत्तीचें पालन सोपें नव्हतें. आपल्या बायकोस जरी ते सद्गुणी समजत असत, तरी ते आपल्या सासूस सद्गुणी समजत नव्हते. एवढेंच नव्हे तर आपल्या बायकोनें तिच्या आईकडे जाऊ नये असेंच त्यास वाटे. आपल्या सासूचे नैतिक विचार जरा अघळपघळ असतील ही कल्पना त्याच्या मनातून पुरी कधींच गेली नाहीं. मुलगी आणि आई जरी एकाच गांवात होत्या तरी पहिले कांहीं दिवस खेरीज

करून त्यांचें एकमेकींकडे जाणें नसे. आपण आपल्या आईकडे जावें या गोष्टीस नवऱ्यानें आक्षेप घ्यावा हें कांहीं दिवस शांताबाईंना योग्य वाटत असे. कारण आपला आईच्या आयुष्याशीं कांहीं संबंध नाहीं असें शांताबाईसहि दाखवावेंसें वाटे; पण ती वृत्तीदेखील फार दिवस राहिली नाहीं. शांताबाईस पुढें असें वाटूं लागलें कीं, आपण आपल्या आईस भेटावयास जाऊं नये असा निर्बंध नवऱ्यानें घालण्याचें कारण नवऱ्याचा आपल्यावरच अविश्वास आहे हेंच होय. शांताबाईंना जरी या प्रकारची कल्पना उत्पन्न झाली तरी त्यांनीं ती बोलून दाखविली नाहीं. आपणां दोघांमध्यें प्रेम असतां आईला भेटण्यास जाण्यासाठीं आपण भांडण कशासाठीं उकरून काढावें असें तिला वाटत असे. आई कधीं भेटावयाला आलीच तर भेटावें, पण आपण भेटावयास जाऊं नये, असा तिचा कांहीं दिवस क्रम होता; आणि पुढें आईनें आपणांस भेटावयास येऊं नये असें नवऱ्याचें मत आईलाहि तिला सांगावें लागलें. आणि त्यानंतर मायलेकींचें दळणवळण तुटलें तें जवळजवळ आईच्या मृत्यूपर्यंत तुटलें होतें.

अप्पासाहेब आपल्या कुळाच्या भवितव्यासंबंधानें मोठे आशावादी होते. आपण ब्राह्मण आहों आणि आपले वंशज पुन्हा ब्राह्मणांत समाविष्ट होतील अशीच त्यांची अपेक्षा होती. आपण जातीबाहेर लग्न केलें म्हणून आपली रहाणी कमी दर्जाची करून घ्यावयाची नाहीं, व त्याचप्रमाणें ब्राह्मण जातीची जी संस्कृति तयार झाली आहे ती गमवावयाची नाहीं, ही दृष्टि अप्पासाहेबांच्या मनांत एकसारखी वागत असे; आणि बायकोनें व मुलांनीं आपल्या सासूकडे जाऊं नये असें ठरविण्यांतदेखील तोच हेतु होता. जरी मंजुळाबाईनीं ब्राह्मणी तऱ्हेचे आचार व भाषा हीं चांगलींच उचललीं होतीं तरी निकट सहवासान्तीं कनिष्ठ राहणीच्या अनेक गोष्टी त्यांच्यांत राहून गेल्या आहेत असें अप्पासाहेबांना दिसून आलें होतें. त्या पाहून त्यांचें अनुकरण आपल्या घरांत होईल अशी अप्पासाहेबांना भीति वाटत होती. अप्पासाहेबांच्या मनांत आपल्या लग्नासंबंधानें कांहीं विशेष कल्पना होत्या. आपण जें कुलहीन वधूशीं लग्न केलें तें ज्या अर्थीं कुलहीनांस उच्च स्थिति देण्यासाठीं केलें त्या अर्थीं आपल्या बायकोनें आपले पूर्वसंस्कार, पूर्वसंचित, आणि पूर्वसंबंध अजिबात पुसटून टाकून नवीन क्षेत्रांत नवीन भावनांनीं

वावरलें पाहिजे असें त्यास वाटे, आणि यामुळें त्यानीं ब्राह्मण जातीची जी मंडळी धार्मिक बाबतींत उदार मनाची आहे त्या लोकाशीं सबध ठेवला. पण या तऱ्हेने राहणेंदेखील सोपें नव्हतें. प्रार्थनासमाजाच्या इमारतींत इतर स्त्रियात बसण्यात काहीं अडचण उपस्थित झाली नाहीं. पण समाजातील घरगुती सबध अनेक कठोर सत्यें नजरेस आणीत. अप्पासाहेबाकडे अनेक पुरुष मंडळी येत जात, ते तेथें चहा वगैरे घेत, आणि त्या पुरुषाच्या बायका मात्र शाताबाईकडे येत नसत. तुम्ही आमच्याकडे अगोदर या, नतर आम्ही तुमच्याकडे येऊ असे इतर स्त्रिया म्हणत, व शाताबाईना दुसऱ्या घरच्या स्त्रियाकडून बोलावणें येई. पण त्या वेळेस पुष्कळदा असें दिसून येई कीं, घरमालकीण त्या वेळेस विटाळाच्या भीतीने लुगडे नेसण्याऐवजीं पातळ नेसली आहे. शाताबाईना चहाचा कप जरी घरमालकीण स्वत. देई, तरी शाताबाईचा स्पर्श त्या कपाला झाल्यानतर तो कप नेण्याचें काम मोलकरणीवर सोंपविलें जाई. या सर्व गोष्टी शाताबाईच्या लक्षात आल्याशिवाय रहात नसत. अर्थात् या गोष्टी शाताबाईस नवीन किंवा अपरिचित होत्या अशातला भाग नाहीं. लग्नाच्या पूर्वी अनेकदा ब्राह्मण मैत्रिणींकडे जाण्याचा प्रसग आला होता, व ब्राह्मण मैत्रिणींच्या घरीं ब्राह्मणेतर मुलींस निराळ्या तऱ्हेनें वागविण्यात येतें हें तिला ठाऊक होतें; तथापि ब्राह्मणाकडे जाण्याचा प्रसग थोडाच येई. पण लग्न झाल्यापासून ब्राह्मणाशींच ससर्ग ठेवण्याचा आग्रहाचा प्रयत्न झाला. जेव्हा नवरा आपले पूर्वसस्कार पुसटून टाकले पाहिजेत वगैरे बोले, तेव्हा मात्र शाताबाई बोलत कीं पूर्वसस्कार तुम्हीं पुसटावयाचे म्हटलें तरी जग तुम्हास पुसटू देणार नाहीं. सुधारणावादी घरातील स्त्रिया तिला कशा वागवितात याचें वर्णन ती करी, तेव्हा अप्पासाहेब म्हणत कीं, "तुझें लग्न ब्राह्मणाशीं झालें आहे म्हणून इतर ब्राह्मणस्त्रिया एकदम बरोबरीच्या नात्यानें कशा वागवितील? तुझें ब्राह्मणेतराबरोबर लग्न झालें असतें तर त्यानीं तुला अधिक उदारतेनें वागविलें असतें असें थोडेंच आहे!"

जर ब्राह्मण मंडळी आपणास निराळ्या तऱ्हेनें वागवितात, तर त्याच्यात मिसळण्याचा आपण प्रयत्न तरी कशास करा, असें शाताबाई बोले; तेव्हा अप्पासाहेब म्हणत कीं, अग, आपण ब्राह्मणात मिसळत राहणें

हें केवळ आपल्या हितासाठीं करावयाचें आहे असें नाहीं, हें ब्राह्मण जातीच्या हितासाठीं देखील करावयाचें आहे. ब्राह्मण जातीस अधिक उदार बनवावयाचें आहे. तें आपण जर त्याच्यापासून अलिप्त राहिलों तर ती जात तरी उदार कशी बनेल ? एवंच, नवराबायकोमध्यें दोन प्रकारची दृष्टि होती. बायकोला तात्कालिक सौख्य पाहिजे होतें. त्यामुळें तिला असें वाटे कीं, ब्राह्मण जातीशीं संबंध नको आणि तिच्याकडून तिरस्कारगर्भ 'औदार्या 'नें वागविले जाणें नको आणि ब्राह्मण जातीस उदार करण्याचें मिशनदेखील नको. त्यापेक्षा जे लोक आपला विटाळ मानीत नाहींत अशात जाऊन राहिलेले काय वाईट. एवंच, मिसळावें कोणात या प्रश्नावर अप्पासाहेब आणि शाताबाई याचा नित्य मतभेद होई.

अप्पासाहेबानीं जातीबाहेर लग्न केलें म्हणून त्याचा जातीसबधानें अभिमान कमी झाला असें नाहीं जेव्हा शाताबाई ब्राह्मण स्त्रियासबधानें किंवा त्याच्या वागणुकीसबधानें तक्रार करी, तेव्हा कधीं कधीं अप्पासाहेबाना बायको 'माझ्या' जातीविरुद्ध तक्रार करीत आहे असें वाटे. हें लग्न करताना त्याना 'आपल्या' ब्राह्मण जातीस उदार करण्याचा हेतु होता. ते म्हणत कीं, " हिंदुस्थानचे सामाजिक भवितव्य ब्राह्मण जातीच्या सामाजिक नीतीवर ऊर्फ पॉलिसीवर अवलबून आहे. ब्राह्मण जातींतच जातिभेदाचे खरे विरोधी सापडतील. जेव्हा ब्राह्मण जातिभेदाच्या विरुद्ध असतो तेव्हा तो उच्च सामाजिक ध्येयानें प्रेरित झालेला असतो. पण जेव्हा इतर जातींची मडळी किंवा ब्राह्मण म्हणविणाऱ्या पण कमी दर्जाच्या म्हणून समजल्या जाणाऱ्या जातींची मडळी जातिभेदाविरुद्ध ओरडतात तेव्हा ती केवळ मत्सरामुळेच ओरडत असतात." त्याना असे वाटत होतें कीं, "जातिभेद मोडला जाणार, तो ब्राह्मणामार्फतच मोडला जाणार, इतर जातींची मडळी जातिभेदास व ब्राह्मणास शिव्या देतील, पण त्याच्याकडून जातिभेद मोडला जाणार नाहीं. जातिभेद मोडावयास एक जात दुसऱ्या जातीशीं लग्न करण्यास उत्सुक असली पाहिजे. जिच्याशीं सर्व जाती लग्न लावूं इच्छितील, अशी ब्राह्मणाखेरीज दुसरी कोणतीच जात नाहीं. आज इतर जातीं ब्राह्मणाशीं लग्नें करण्यासाठीं उत्सुक नाहींत; पण तसल्या लग्नात आज निर्भयता नाहीं म्हणून ते उत्सुक नाहींत, ही निर्भयता प्राप्त झाली

म्हणजे सर्व जाती ब्राह्मणाशीं लग्नें लावावयास उत्सुक होतील, आणि ब्राह्मण जात उदार झाली म्हणजे ती सर्व राष्ट्राचें एकीकरण करील." इत्यादि मतें त्याच्या मनात होतीं, व तीं मतें जेव्हा ते घरीं बोलून दाखवीत तेव्हा शांताबाई अविश्वासदर्शक हास्य करीत.

अप्पासाहेबाचे आपल्या कुटुबाचे भवितव्य ठरविण्यासबधानें निश्चित ध्येय होतें, व तें ब्राह्मण जातींत पुन्हा मिळण्याचें होतें. पण त्यासबधानें शाताबाईच्या मनात साशकता होती, ही एक गोष्ट त्याच्या आयुष्यक्रमात मधून मधून अस्वस्थता उत्पन्न करीत होतीच. तथापि दुसऱ्या अनेक गोष्टींमुळें नवराबायकोंत द्वैत उत्पन्न होण्याचा प्रसग येई, व परमेश्वरा, माझ्या मित्रापासून माझा बचाव कर, या म्हणीची अप्पासाहेबासहि प्रचीति येई. जेव्हा जेव्हा वर्तमानपत्रकार किंवा सुधारणावादी मडळी अप्पासाहेबाच्या औदार्याची तारीफ करीत, तेव्हा तो आपल्यावर फटकारा आहे असें शाताबाईस वाटे. अप्पासाहेबाची तारीफ करणाऱ्याना आपण त्याच्या पत्नीस यामध्यें दुखवीत आहो ही कल्पनादेखील नसावी. प्रसगीं शाताबाईना असे वाटे कीं, ही आपल्या नवऱ्याची तारीफ ज्या दिवशीं बंद होईल तो दिवस सोन्याचा होय. त्यानीं हें स्पष्ट बोलून दाखविलें नाहीं, पण आपल्या औदार्याची तारीफ आपल्या बायकोस स्वाभाविकपणें दु.ख देणारी आहे ही गोष्ट अप्पासाहेबाच्या लक्षात आली, व त्यानां त्या तऱ्हेनें एकदोन मित्रास बोलून दाखवून ती तारीफदेखील बद करविली. आपण ही तारीफ बंद करविली हें जेव्हा शाताबाईना काहीं दिवसानीं अप्पासाहेबानीं सागितलें तेव्हा शाताबाईस अधिक कृतज्ञता वाटली, आणि आपल्या नवऱ्याविषयीं खरोखर आदर वाटू लागला. आपल्या भावना न दुखविण्याचे महत्त्व नवऱ्याला स्वत च्या स्तुतीपेक्षा अधिक आहे हें तिला दिसून आलें.

नवरा आणि बायको हीं दोघेजणेंच होतीं तोंपर्यंत त्याना आपल्या करण्याविषयीं फारशी फिकीरच वाटत नव्हती. पण ती वृत्ति त्याना मुलें झाल्यानतर राहिली नाहीं. पुढे जेव्हा त्याना मुलगी झाली तेव्हा आपण संशयित भवितव्यामध्यें ढकलावयास एक नवीन जीव निर्माण केला आहे

असें वाटलें. आपली सर्व कुळकथा पुण्यात सर्व लोकास ठाऊक आहे, तेव्हा आपण येथें राहणें योग्य नाहीं, असे विचार त्याच्या मनात येत पण ते कृतींत उतरले नाहींत. त्याना सत्यव्रत झाला तेव्हा शाताबाईना आनद झाला. त्या म्हणाल्या, मुलगा पुढें मोठा झाला म्हणजे तो पुरुष असल्यामुळें आपल्या अडचणींशीं झगडावयास समर्थ होईल सर्व लोकापेक्षा आपण काहीं निराळे आहोत ही कल्पना मुले व मुली शाळेत गेल्यानतर त्याना येईल, कारण त्याना शहरातलीं मुलें आणि मुली चिडवितील असें त्याना वाटू लागलें. त्यासाठीं पुणे सोडून दुसरीकडे रहावयास जावें असाहि विचार त्याच्या मनात येत असे पण त्याबरोबर असेंहि वाटे कीं, जिकडे जिकडे आपण जाऊ तिकडे तिकडे आपली कुळकथा गेल्याशिवाय राहणार नाहीं. कारण आपलें लग्न वर्तमानपत्रात पूर्वींच गाजलें आहे आणि डॉ. चिंतोपतास ओळखणारी मडळी महाराष्ट्रात चोहोंकडे आहेत. असे उलट विचार येऊन ग्रामत्यागाचा विचार अमलात आला नाहीं.

काहीं इरसाल ब्रह्मोंच्या खटपटीमुळें नवराबायकोंत एकदा वितुष्ट येण्याचा प्रसग आला होता अप्पासाहेबानीं जरी लग्न रजिस्टर केलें तरी त्याला धार्मिक स्वरूप देण्यासाठीं प्रार्थनासमाजातहि एक लग्नाचा विधि उरकून घेतला. त्यामुळे ते स्वतः जरी ब्रह्मो मताचे नव्हते तरी ब्रह्मो म्हणविणारास त्याच्याकडे उतरण्याचा हक्क उत्पन्न झाला. एकदा एक बगाली ब्रह्मो पाहुणे म्हणून उतरले होते. ते तिकडील कायस्थासारख्या बिन जानव्याच्या जातीचे होते अप्पासाहेबानीं ब्राह्मणेतर स्त्रीशीं लग्न केलें, रजिस्टर लग्नाला लागणारे स्वत.च्या धर्ममताविषयीं विधान केलें, पण जानवें टाकलें नाहीं, या विसगत वागणुकीबद्दल व प्रामाणिकपणाच्या अभावाबद्दल एक व्याख्यान त्या दाढीदीक्षितानें जेवतानाच हसत हसत दिलें, तेव्हा अप्पासाहेबानीं सरळ सागितलें कीं, "मी खरोखर ब्रह्मो नाहीं, धार्मिक विधि काहीं तरी असावा म्हणून मी प्रार्थना-समाजवाल्याकडे गेलों, आणि त्याच्या लग्न लावणाऱ्या उपाध्यायानें ब्रह्मोंचा विधि घेतला" तेव्हा तुम्ही ब्राह्मसमाजसस्थेचा दुरुपयोग करीत आहात असें त्यानें अप्पासाहेबास सागितलें. अप्पासाहेबानीं उत्तरादाखल फक्त हास्य केलें. अप्पासाहेब कोर्टांत गेल्यानतर "जानवें टाकून देण्यासबधानें तुमचा इतका आग्रह का!" म्हणून

शाताबाईनीं बाबूमहाशयास प्रश्न केला तेव्हा ‘जातिभेदाचा द्वेष करणाऱ्या’ बाबूनीं आपले व्याख्यान पुन्हा सुरू केलें. ते म्हणाले, “कीं हे ब्राह्मण लोक मोठे लुच्चे आहेत. ते आपली उच्चता कधींहि विसरत नाहींत. ब्राह्मणानें जोंपर्यंत आपले ब्राह्मण्य टाकून दिले नाहीं तोंपर्यंत ब्राह्मण विश्वसनीय नाहीं. तुम्ही आपलें कायदेशीर लग्न झालें आहे यावर विश्वसून राहू नका. तुमचा नवरा उद्या प्रायश्चित्त घेईल. मी पुन्हा हिंदु धर्मानुयायी झालों असें डिक्लेरेशन करील; ब्राह्मणाची मुलगी करील, आणि लोकाच्या दृष्टीनें त्याचें ब्राह्मण मुलीशीं झालेले लग्न खरें ठरेल,– आणि तुमचें लग्न दुय्यम प्रकारचें– अगदीं ‘सेकंड क्लास’ ठरेल तेव्हा तुम्ही आपल्या हितासाठीं त्याना जानवें टाकून देण्यास सांगा.”

बाबू महाशयानीं शाताबाईना तुमचा खरा हितकर्ता मी आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला, त्याचा थोडाबहुत परिणामहि झाला. शाताबाईनीं नवऱ्यास जानवें टाकून द्यावें याबद्दल थोडा आग्रहदेखील केला, व तें नवऱ्यानें ऐकलें नाहीं म्हणून त्याच्या मनात नवऱ्याच्या हेतूविषयीं सशय-देखील उत्पन्न झाला नवऱ्याच्या मनात ब्राह्मण जात सोडावयाची नव्हती तर आपला हक्क आग्रहानें ठेवून ब्राह्मण जातीसच अधिक परजन–सग्राहक करावयाचें होतें त्यामुळें त्याला तिचे म्हणणे ऐकवेना. शाताबाईस ब्राह्मण-जात परजातिसग्राहक बनेल किंवा बनणार नाहीं याबद्दल फिकीरच नव्हती, उलट नवऱ्याचा ब्राह्मण जातीशीं असलेला सबध शिथिल झाला तर बरा असें वाटू लागलें होते. शाताबाईचें मन अस्वस्थ झालें होतें, पण या बाबू-महाशयाचें पुन्हा अप्पासाहेबाच्या घरात आगमन न झाल्यामुळें विषवृक्षाची जोपासना झाली नाहीं. शाताबाईच्या मनातील नवऱ्याच्या हेतूविषयीं असलेला किंतु अजिबात नाहींसा मात्र झाला नाहीं.

११

# मंजुळेचें भवितव्य विलोकन

अप्पासाहेब व शान्ता यांचें लग्न झाल्यावर थोडक्याच वर्षांनीं डॉ. चितोपत परलोकवासी झाले, पण मजुळाबाई पुढें बारा वर्षे जिवत होत्या.

मजुळाबाईच्या मृत्यूपूर्वी त्या आजारी असताना अप्पासाहेबानीं शान्ताबाईस त्याच्याकडे जाऊ दिलें होते त्या वेळेस शान्ताबाईचे भाऊ-देखील तेथेंच जमले होते. मजुळाबाई वारल्या, आणि मजुळाबाईपाशीं जे डॉ. चितोपताकडून दागदागिने आले होते, ते सर्व मजुळाबाईच्या मृत्युपत्रा-प्रमाणें मोडले जाऊन त्याचे पैसे शान्ताबाई आणि त्याचे भाऊ याच्यामध्यें सारख्या प्रमाणात वाटले गेले तेव्हा अप्पासाहेबाना मजुळाबाईचा राग आल्याशिवाय राहिला नाहीं. तारुण्यात जरी त्याची पैशासबंधानें बेफिकीर वृत्ति होती तरी ती वृत्ति त्याना मुले झाल्यावर राहिली नाहीं. त्याना वकिलींत पैसा बेताचाच मिळाला आपलीं मुलें जगात एकटीं पडणार, त्याना खरे आप्त असे कोणीच असणार नाहींत, त्याचीं लग्नेंदेखील होण्यास अडचण पडणार असे असता, व हें मजुळाबाईना समजत असून हें मृत्युपत्र करण्याची दुर्बद्धि कोठून सुचली! मृत्युपत्र केलें नसतें तर सर्व इस्टेट मुलीलाच आली नसती काय, इत्यादि विचार त्याच्या मनात आल्याशिवाय राहिले नाहींत. आपण सुशिक्षित आहोंत, आपलें लग्न झाले त्या वेळेस आपणास ब्राह्मणातल्या शेंकडो मुली हुडयासह सागून आल्या होत्या, असे असता या मुलीला खिस्ती व्हावे लागेल असें भय आपल्या मनात उत्पन्न झाल्यामुळे, आणि जातिभेद मोडला गेला पाहिजे इत्यादि आपलीं मते असल्यामुळें अन्य जातींतल्या आईपासून झालेली व त्यातहि आईच्या पापानें डागळलेली मुलगी आपण पत्करली. पण त्या मुलीच्या आईनें माझ्या या उपकाराचें स्मरण ठेवलें नाहीं असें त्याच्या मनात आलें. शान्ताबाईनादेखील दु.ख झालें नाहीं असें नाहीं. आईची आपण एकुलती

एक मुलगी, आणि मुलीलाच आईची सर्व इस्टेट मिळते इत्यादि गोष्टी तिनें ऐकल्या होत्या, व आईपासून आपणास सर्व पैसे मिळतील अशी तिची स्वाभाविकपणें अपेक्षा होती शिवाय आईपाशीं किती ऐवज असेल यासबधाची तिची कल्पना अतिशयोक्तीची झाली होती आईपाशीं पचवीस पासून पन्नास हजारापर्यंत ऐवज असेल अशी तिची कल्पना होती; पण तसा ऐवज काहीं निघालाच नाहीं. दागिने विकले त्याची तीन हजार रुपये किंमत झाली. त्यापैकीं एक हजार रुपये काय ते शान्ताबाईच्या वाटणीस आले. आईचें राहतें घर म्हणजे " गवत्या गोमाजींचा वाडा " आईच्या नावानें होणार होतें, पण तें मरेपर्यंत झालेच नाहीं. डॉ. चितोपतानीं प्रथम तें घर तिच्या नावावर करून देण्याचे लाबवीत नेले; आणि पुढें मजुळाबाईस असें वाटू लागले कीं त्याना तगादा लावला तर सर्वच काहीं फिसकटेल. मजुळाबाईचे तारुण्य गेलें होतें, आणि तिचें डॉ चितोपतावरील वजनदेखील नाहींसें झालें होतें, आणि डॉ. चितोपत तिची कींव करून किंवा तिच्या अपत्याविषयीं प्रेम बाळगून जें काय द्यावयाचें तें देतील, आपण निकड लावण्यात अर्थ नाहीं, अशी तिची वृत्ति झाली होती त्यातल्या त्यात असेंहि झाले कीं, मुलगी आपणास विचारीत देखील नाहीं, आणि मुलगेहि मोठे होऊन कमावते झाले आहेत, तर जो जावई आपल्याकडे तिरस्काराने पाहतो, त्याच्यासाठीं आपण डॉ. चिंतोपतास तगादा लावण्यात काय फायदा आहे असेंहि तिला वाटू लागलें होतें. त्यामुळें घर आपल्या मालकीचे व्हावें म्हणून डॉ चिंतोपतास तगादा करणें तिने सोडून दिलें होतें. शिवाय अशीहि गोष्ट झाली. डॉ. चिंतोपताचीं औरस मुलेंच तिची वास्तपुस्त करीत असत कारण तसें करण्यात त्याना कमीपणा नव्हता. उलट बापाच्या उपपत्नीचीदेखील मुले काळजी घेतात म्हणून त्याच्याकडे चागुलपणाच येणार होता. पण याचा मजुळाबाईच्या मनावर असा परिणाम झाला कीं, आपण चिंतोपतापासून जास्त ऐवज शान्ता व तिचे भाऊ यासाठीं मागून घ्यावयाचा, पण आपली वास्तपुस्त चिंतोपताचीं औरस मुलेंच करीत आहेत, — तर त्यास लुबाडून आपला तिरस्कार करणाऱ्या जावयाची धन कशासाठीं करावयाची ?

मंजुळाबाईनें आपल्या मुलीसाठीं एक पत्र लिहून ठेवलें होतें. तें पत्र

शान्ताबाईनीं फार जपून ठेवलें होतें, व तें त्या पुन्हा पुन्हा वाचीत. तें पत्र येणेंप्रमाणें होतें :

गवत्या गोमाजीचा वाडा, शनवार पेठ

" आशीर्वाद विशेष

शान्ते, तुझें लग्न झाल्यापासून तुझ्या आणि माझ्या स्थितींत अतर पडलें आहे, आणि याची जाणीव तुला झाली आहे, आणि त्या जाणीवेमुळें तू मजपासून दूरदूरच असतेस. तू एका सभ्य गृहस्थाची धर्मपत्नी आहेस, आणि मी एका गृहस्थाची बटकी आहे, असा तुझ्यामाझ्यात फरक आहे तू माझ्याकडे येण्याचें टाळतेस याबद्दल मी तुला दोष देत नाहीं, व तुला कृतघ्नहि म्हणत नाहीं कारण तू जें करतेस तें तुझ्या आणि मुलाच्या हितासाठींच करतेस अशी माझी खात्री आहे. आईचें अतःकरण मुलीकडेसच धावतें, आणि मुलीने आईचा जरी अपमान केला, आणि आईला दु ख होईल असें जरी केलें तरी तें मुलगी आपल्या हितासाठीं करते आहे हें आईला समजते; आणि मुलीच्या हिताकडेसच आईचे लक्ष असतें, म्हणून आईस तिचा दोष दिसतच नाहीं. मजपाशीं तू जे वर्तन केलेंस तें मीच कदाचित् तुला तुझ्या हितासाटीं उपदेशिलें असते तू सुखी अस म्हणजे झाले.

" पण काहीं असो, मला तुझ्या अपत्याचें भवितव्य अध कारमय दिसत आहे. तुझें लग्न एका सभ्य गृहस्थाबरोबर झाले आहे ही आनदाची गोष्ट झाली नाहीं, असेंच माझ्या मनात वारवार येतें. चितोपतानीं तुला ब्राह्मणाला न देता तुझ्यासारखाच पूर्वेतिहास ज्याचा आहे अशा तरुणाला दिली असती तर तें अधिक बरे झाले असतें, असेंच मला वाटावयास लागलें. तस झालें असतें तर तूं माझ्यापासून दूरदूर पळाली नसतीस, आणि तुला माझ्यापासून दूर ठेवावे असे तुझ्या नवऱ्यालादेखील वाटलें नसतें. तथापि हे मी स्वार्थाच्या हेतूमुळे बोलत नाहीं. तुझें लग्न उच्च दर्जाच्या जातीच्या मनुष्याशीं करून मीं तुला आणि तुझ्या मुलाबाळाना एकसारखें भीतींत आणि सशयित स्थितींत ठेवलें आहे जे भवितव्य ठरलेलेंच आहे त्यापासून पळून जाण्याचा आपण व्यर्थ प्रयत्न करीत आहों असें माझ्या मनाला वाटल्याशिवाय राहत नाहीं. तुझे ब्राह्मणाबरोबर लग्न करून द्यावें,

आणि तें लग्न घडून येण्यासाठीं तुझ्याशीं लग्न करण्यास तयार होणाऱ्या ब्राह्मणाच्या स्वार्थत्यागाची तारीफ करावी, या प्रकारचे ढग करून तुझ्या नवऱ्याला आम्हीं फसविले असें मला वाटत आहे ज्या स्त्रियास लग्नविरहित सतति झाली आहे त्या स्त्रियानीं लग्नाच्या सततीशीं लग्नव्यवहार न करणें हेंच शहाणपणाचें आहे नाहीं तर पिढ्यान् पिढ्या पश्चात्तापास कारण होईल. जो प्रयत्न चागल्या घराण्यात किंवा जातींत जन्म झालेल्याबरोबर लग्न लावण्यासाठीं होईल, तो प्रयत्न लग्न झालेल्या मनुष्यास त्याच्या जातींतून ओढून अकरमाशाच्या जातींतच घेण्यास कारणीभूत होईल, आणि त्यामुळें लग्न करणारे दोन्ही पक्ष दुःखी होतील.

" ज्या जातींत तुझा नवरा जन्मास आला आहे त्या जातींत तुझा किंवा तुझ्या मुलाबाळाचा प्रवेश कधींच होणार नाहीं. एवढेंच नव्हे तर शेणवी, सोनार, प्रभु वगैरे जातींतदेखील प्रवेश होणार नाहीं तारुण्यामुळें उदार भावना ज्याच्या मनात खेळतात असा एखादा तरुण गाठून त्याच्याशीं तुझें लग्न चितोपतानीं ज्याप्रमाणें लावून दिलें तसेंच तुझ्या नवऱ्यास आणि तुला करावे लागेल. जो तरुणपणीं ठकला त्यानें पुढे ठक बनावें असें करावें लागेल; पण अशी ठकवाठकवी किती पिढ्या चालवावयाची ? आणि तिचे परिणाम तरी बरे होतील काय? मी म्हणते तें तुझ्या नवऱ्याला वाटतच असेल. तथापि आपणच चूक केली, बायकोकडे काहीं दोष नाहीं असें म्हणून तुझा नवरा तुझ्यावर कदाचित् रागावणार नाहीं. पण तुझ्यावर रागावण्याचें आणि सतापण्याचें तो जितकें नाकारील, तितका त्याचा मनस्ताप वाढतच जाईल, आणि तो मनात अधिक दु ख पावेल

" कालिंदीला एक तुझ्यासारख्याच जन्माच्या मनुष्याकडून मागणी आली, आणि त्या मागणीबद्दल तुझ्या नवऱ्याला राग आला, आणि ती मागणी तुझ्या नवऱ्याने नाकारली हें ऐकून मला फार दुःख झालें

" मला असे वाटतें कीं, तुमच्या कुटुंबाचे जें भवितव्य ठरलें आहे तें ओळखण्याचें तुम्हीं गर्वानें नाकारीत आहात, आणि जितके दिवस तें तुम्ही नाकाराल तितके दिवस तुम्हास स्थैर्य उत्पन्न होणार नाहीं. ज्या समाजात तुम्ही शिरूं इच्छिता तो समाज तुम्हास आपल्यात कधींच घेणार नाहीं,

आणि जो समाज तुम्हास स्वीकारावयास तयार आहे, त्या समाजास तुम्ही स्वतःपेक्षा कमी समजून वगळीत आहात, आणि कारण काय – तर तुम्हा दोघाचें लग्न " रजिस्टर " झालें आहे म्हणून.

" सत्याचें महत्त्व पुष्कळ लोक गातात, पण तें महत्त्व मला मुळींच पटत नसे. मला असें वाटत असे कीं ' सत्य ' हा आईचा धर्म मुळींच नव्हे; आईचा धर्म अपत्यप्रेम हा आहे. सत्य हा धर्म ज्या दुसऱ्या कोणाचा असेल तो असो. आईचा धर्म मुलाचें कल्याण हा आहे. आणि मुलीस काहीं व्यग असल्यास तें व्यग लपवून ठेवावें, आणि मुलीचें लग्न करून द्यावें हे आईचें कर्तव्य होय. असें माझेंच मत होतें असें नाहीं, तर माझ्या ओळखीच्या इतर बायकातहि तसेंच मत प्रचलित होतें. जर कोणा आईनें मुलीचें लग्न व्हावें म्हणून काहीं लबाडी केली तर लोक तिचें वर्तन क्षम्य धरीत. मीं तुझें लग्न करून दिले तें काहींएक लपवून न ठेवता करून दिलें, पण त्यात माझा मोठा सद्‌गुण झाला नाहीं. डॉ चितोपत प्रसिद्ध गृहस्थ असल्यामुळें तुझी कुळकथा गावभर नव्हे – महाराष्ट्रभर – झाली होती. जर तुझी अशी प्रसिद्धि झाली नसती तर तू ब्राह्मणाची मुलगी असें मोघम सागून तुझें लग्न ठकवून कोणा तरी ब्राह्मणाबरोबर लावून देण्यास मी कमी केलें नसतें. तथापि आता मला असे वाटू लागले आहे कीं, प्रामाणिकपणाचाच पथ चागला. तुला एवढें सागून ठेवतें कीं, तू आपल्या मुलीचें लग्न व्हावें यासाठीं आपल्या जन्माची कथा कधींहि चोरून ठेवू नकोस. कुलवृत्तान्त चोरण्यानें तुझीं मुलें किंवा वशज ब्राह्मण जातींत कधींच जावयाचीं नाहींत, विदूर, अकरमासे, आणि कडू मराठे या तीन जाती उदार आहेत. त्या जाती तुझ्या मुलाचा स्वीकार करतील, तुझ्या मुलाना त्याच्यातच प्रवेश करण्यास उत्तेजन दे.

" तुला जी मुख्य गोष्ट मला सागावयाची आहे ती एवढीच आहे. हे आशीर्वाद.

तुझी आई,

**मंजुळा** "

कालिंदीच्या सुपथत्यागामुळें या पत्रास फारच महत्त्व आलें, हें सागावयास नकोच.

१२

# निःशस्त्रांचें राजकारण

आता पुढें जी चळवळ करावयाची ती करताना महात्मा गांधींच्या पूर्वींच्या चळवळीचे गुणदोष पाहून पुढील पाऊल टाकलें पाहिजे. त्यांच्या चळवळींत काहीं महत्त्वाचीं सुदर तत्त्वें होतीं तर काहीं चुकीचा कार्यक्रम होता. महात्मा गांधींनीं हें ओळखलें कीं आपणास जो कार्यक्रम पाहिजे तो असा असावा कीं, दुर्बल मनुष्यासहि त्या कार्यक्रमाशीं सहकारिता करता येईल. यासाठीं त्यानीं असहकारिता अथवा नॉन को-ऑपरेशनचें सर्वजनव्यापी तत्त्व पुढें आणलें. महात्मा गांधींनीं दुसरी एक महत्त्वाची गोष्ट केली ती ही कीं, आपणास चळवळ करावयाची ती ब्रिटिश जाती-विरुद्ध नसून अनियत्रित राज्यपद्धतीविरुद्ध करावयाची आहे या मवाळांच्या व लो. टिळकांच्या जुन्या तत्त्वाचा महात्माजींनीं निर्मल चित्तानें व जोरानें पुरस्कार केला

चळवळ करण्यासबधानें आणखी एक तत्त्व महात्मा गांधींनीं ओळखलें कीं स्वराज्य प्राप्त करून घेणें ही आध्यात्मिक चळवळ आहे. म्हणजे मनुष्याच्या मनाचा विकास असा झाला पाहिजे कीं, देशातील लोकाची अंतःकरणें स्वराज्यास लायक अशीं बनलीं पाहिजेत. त्याच्या मनात असलेलें कार्पण्य नष्ट झाले पाहिजे. स्वराज्याला लायक अशीं अतःकरणें बनाविणें हेंच अधिक महत्त्वाचें आहे हें त्यानीं ओळखलें स्वराज्य इग्रजानीं द्यावयाचें व आपण दान म्हणून घ्यावयाचें असा प्रकार मुळींच नसून व्यक्तीचें अतःकरण, स्वातत्र्य व समता यानीं, आत्मविश्वासानें आणि एकमेकावरील विश्वासानें प्रेरित होणें, आपले व इतराचे हक्क ओळखणें, आपल्या हक्काच्या सरक्षणासाठीं जागृत असणें याचाच स्वराज्य हा स्वाभाविक परिणाम आहे मुसलमानाच्या हितसंबधाकरिता हिंदूनें बद्धपरिकर व्हावें इतकें समाजातील निरनिराळ्या वर्गांत प्रेम उत्पन्न झालें पाहिजे म्हणजे आत्मविश्वास,

स्वत्वस्थापन व बंधुप्रेम याची जोपासना करून आध्यात्मिक उन्नतीप्रत पोंचणे हें आपलें प्रधान आचारतत्त्व आहे आणि या सद्‌गुणाचा विकास करता करता स्वराज्यप्राप्ति ही स्वाभाविकपणें घडवून आणावयाची आहे.

म. गांधींचें याहूनहि मोठें तत्त्व म्हटलें म्हणजे या सर्व सुधारणा अनत्याचारीपणानें आणि असहकारितेचें शासन वापरून घडवून आणावयाच्या आहेत. हें तत्त्व खरोखर अत्यंत सुंदर तत्त्व होय. या तत्त्वाच्या योगानें जगाच्या भावी राजनीतीमध्यें मोठी क्रांति घडून येणार आहे. आणि ज्यामुळें सर्व जगातील राजनीतिवेत्त्यांचें हिंदुस्थानाकडे आणि महात्माजींच्या कार्यक्रमाकडे लक्ष लागलें तें हेंच तत्त्व होय हें तत्त्व पद्धतशीरपणें अमलात आणणें ही गोष्ट कशी करता येईल, या गोष्टीकडे सर्व जगाचे डोळे लागले होते. पण हें सुंदर विचारतत्त्व मांडणीच्या पलीकडे गेलें नाहीं, म्हणून सर्व जगाची निराशाहि होण्याचा संभव आहे. आणि यासाठीं म गांधींच्या अनुयायांतील व्यवहारवेत्त्यांनीं अनत्याचारी असहकारितेची राष्ट्रीय योजना करण्याकडे लक्ष दिलें पाहिजे महात्मा गांधींना त्या तत्त्वाची मांडणी बरोबर करता आली नाहीं. ती करता येती तर तुम्हीं चरखा फिरवीत रहा नाहींतर अत्याचारी व्हाल अशा तऱ्हेचा उपदेश करून ते मोकळे झाले नसते. म्हणून त्यांची कार्यदिशा त्यागावी किंवा त्यांचे निराशेचे उद्‌गार ब्रह्मवाक्य घेऊन चालावे हेंहि सुशिक्षित समाजास योग्य नाहीं. एखादा शोधक आपल्या शोधाची मांडणी विशिष्ट मर्यादेपर्यंत करतो. पण त्या शोधाचा अंतिम विकास इतरांकडून व्हावयाचा असतो. त्याप्रमाणेंच राजकारणातहि आहे विमानशास्त्राचा उत्पादक राईट हा विमानानें पन्नास ५ डांपेक्षा उंच जाणें शक्य किंवा योग्य नाहीं असे म्हणत असे; पण हजारों यार्ड म्हणजे कित्येक मैल विमानें त्याच्या अनुयायांनींच नेलीं नाहींत काय? महात्मा गांधींना अनत्याचारी असहकारितेची व्याप्ति राष्ट्रभर करण्याची कला प्राप्त झाली नाहीं म्हणून यापुढें इतरांस प्राप्त होणार नाहीं हें म्हणणेंहि अप्रयोजक होईल व यासाठीं गांधीजींनीं एकदा उपदेशिलेल्या व नंतर टाकून दिलेल्या उपायांचा शांतपणानें व शास्त्रीय दृष्टीनें विचार केल्याशिवाय त्याग करणें हें तर अत्यंत दोषार्ह होईल. महात्मा गांधींनीं ओळखलें तें हें कीं, शासन, उत्पादन यासारख्या क्रिया अन्योन्याश्रयी आहेत. ज्या घटकांनीं

विशिष्ट क्रिया होते, त्यापैकीं एकानें म्हणजे समाजाच्या एका अवयवानें असहकारिता केली म्हणजे सर्वच कार्य स्तब्ध होतें आणि उगाच मारामारी करून रक्तपात करण्यापेक्षा विशिष्ट राष्ट्रातील एका अवयवानें कर्मत्याग केला तर सर्व राष्ट्र व त्यावरील सरकार हें वठणीस आणता येतें. महात्माजींचें तत्त्व स्पष्ट करण्यासाठीं त्या तत्त्वाच्या उपयोगाचें एक सोपेसें सामाजिक उदाहरण घेऊ. उच्च जाती आपला विटाळ मानतात म्हणून अस्पृश्य जातींनीं वरच्या जातींचीं डोकीं फोडण्यापेक्षा असहकारितेचें तत्त्व वापरलें तर यशस्वी होणार नाहीं काय? समजा पुणें शहरातील भग्यानीं सप केला आणि अस्पृश्य वर्गास काहीं हक्क मागितले तर ते देणे लोकास भाग पडेल कीं नाहीं? एवढेंच नव्हे तर म्युनिसिपालिटीच्या सभासदानीं आम्हीं आणून दिलेलें पाणी प्यायलें पाहिजे नाहीं तर कामाला येत नाहीं असें सागितलें तर अत्यत महत्त्वाची सामाजिक सुधारणा त्याना अनत्याचारीपणानें करता येणार नाहीं काय? अनत्याचारी असहकारितेच्या या महात्माजींच्या तत्त्वाचा विजय सर्व जगभर अधिक अधिक होत जाणार आहे. मग तो महात्माजीं-कडून होवो किंवा दुसऱ्या कोणाकडून तरी होवो.

महात्माजींच्या कार्यपद्धतींतील मुख्य दोष म्हटला म्हणजे त्यानीं आपला कार्यक्रम अनेक आगतुक गोष्टींनीं बद्ध करून अवजड व अव्यवहार्य केला. शिक्षणसस्थाचा त्याग, कौन्सिलचा त्याग व कोर्टांना बहिष्कार या गोष्टींनीं त्यानीं शत्रू वाढविले. त्याचें मुख्य कार्य जें नोकरशाहीला आळा घालणें, तें बाजूला राहून खासगी विद्यालयें चालविणें इत्यादि अनेक खर्चाच्या गोष्टी आपल्या कार्यक्रमात त्यानीं घेतल्या कोर्टाला शत्रु करणें, कायदे—कौन्सिलात जाऊन काम करणाऱ्यास शत्रू करणें इत्यादि अनावश्यक गोष्टी त्यानीं केल्या. शत्रु निराळा काढणें आणि सर्व शक्ति एकवटून त्याला तबी देणें त्या क्रिया न करता त्यानीं शत्रू वाढविले आणि आपलें बळ मात्र अनेक कार्यांत विभागले उदाहरणार्थ चरखा घ्या. चरख्याची चळवळ पूर्णपणें अनावश्यक होती. सर्व जगातील अनेक व्यवसाय करणारे लोक मूर्ख आहेत, मी जादुगारानें जे हत्यार काढलें आहे त्याचा उपयोग करीत रहा अशा तऱ्हेनें सागणें आणि चरख्याचा व स्वराज्याचा सबध कधींच स्पष्टपणें व्यक्त न करता केवळ अधिकारयुक्त

वाणीनें त्याचा अवलंब करा म्हणजे तुम्हास स्वर्ग दिसेल असें म्हणणें हें औद्धत्य होय आणि हे सुशिक्षिताच्या बुद्धीस केलेले पादत्राणाचे प्रहार होत.

जो पुढारी आपल्या कृत्याचा कार्यकारणसंबंध लोकास पटवून देत नाहीं तो सर्व लोकास मूर्ख समजत असला पाहिजे. व आपण जें सागू तें लोकानीं मुकाट्यानें ऐकलें पाहिजे इतक्या अहंकाराचा असला पाहिजे. शिवाय जर नोकरशाहीविरुद्ध चळवळ करावयाची आहे तर गिरणीवाले आणि आयातनिर्यात करणारे व्यापारी याच्या कार्यात निरर्थक व्यत्यय का ? आणि त्याचा तरी विरोध आणखी का संपादा ? एकनिष्ठपणें काम करण्यास ब्यूरॉक्रसीस लगाम लावण्याची चळवळ पुरी नाहीं काय ? कायदेभंगाच्या चळवळीपर्यंत म्हणजे कर भरू न देणाऱ्या चळवळीपर्यंत राष्ट्रास नेण्यास जो परिश्रम लागतो तितका करून त्यापेक्षा अधिक परिश्रम रकरण्याची ताकद महात्माजींनीं कधीं दाखविली आहे काय ? मध्यें तर त्यानीं चहाविरुद्ध चळवळ सुरू केली तो " अव्यापारेषु व्यापार " नव्हता काय ? आमच्या मतें या सर्व गोष्टींत महात्मा गांधींनीं पैशाचा व त्याहूनहि अधिक किंमत असलेल्या तरुणाच्या उत्साहाचा अपव्यय केला आणि त्याचें या दृष्टीनें झालेलें अकार्य त्याच्या कार्याच्या श्रेयाचा बराचसा भाग कमी करतें.

महात्माजींचें एक तत्त्व पूर्णपणें लक्षात येण्याजोगें आहे व तें हें कीं, कायदेभंग किंवा कर न देण्याची चळवळ; ही एकसारखी डोळ्यासमोर ठेविल्याशिवाय लोकाच्या हातून हें कार्य व्हावयाचें नाहीं किंवा सरकार-लाहि त्याचा वचक वाटावयाचा नाहीं. ही चळवळ वस्तुतः त्यानीं हातात घेण्याचा विचारच केला होता. पण चौरीचौऱ्याच्या प्रकरणानतर त्यानीं हातपाय गाळले आणि त्यानतरचें त्याचें वर्तन एखाद्या मुत्सद्यास शोभण्या-सारखें न होता केवळ भावनाप्रधान मनुष्यासारखें झालें. त्या वेळेस देश कायदेभंगाच्या चळवळीस अगर कर न देण्याच्या चळवळीस तयार नव्हता हें जे त्यास वाटलें तें सत्यच होतें. व तेव्हापासून त्यानीं निराळ्या दिशेनें कार्य करावयास सुरवात केली पाहिजे होती, ती त्यानीं केली नाहीं. कारण त्यावेळेस त्यास कदाचित मार्गहि सुचला नसेल. आता आपण

चौरीचौऱ्यापूर्वींच्या परिस्थितींत जाऊं आणि कर न देण्याच्या चळवळीचें ध्येय ठेवून अगोदर काय क्रिया केल्या पाहिजेत त्याचा विचार करूं का कीं ही चळवळ यशस्वी करणें ही गोष्ट अत्यत कठीण असल्यामुळें राष्ट्राभिमानी मनुष्याचे मेंदू व कर्तबगार लोकाची कर्तव्यशक्ति त्या सग्रामाच्या यशस्वी परिणतीप्रीत्यर्थ खर्च झाली पाहिजे याविषयीं अनेक लोक विचार करीतच असतील. मींहि यासबधीं आपले विचार पुढें माडतों. हे विचार माडताना " माजराच्या गळ्यात कोणी तरी घाट बाधावी " अशा भावनेनें न माडता स्वतःसच तो कार्यक्रम अगिकारावा लागेल अशाच भावनेनें माडतों

स्वराज्य दिले गेले नाहीं तर चालू शासनसस्थेशीं सग्राम करावा लागणार आणि तो बऱ्याचशा यशस्वीतेने करता यावा म्हणून पुढचीं चार वर्षे देण्यात यावीं. येत्या चार वर्षांत जें काम करावयाचें तें हें कीं स्वराज्य हिसकण्याची तयारी पद्धतशीर करावी, आणि तीप्रीत्यर्थ अवश्य ती चळवळ करावी. स्वराज्य दिलें नाहीं तर कायदेभगाची अगर कर न देण्याची चळवळ करण्यास अनुकूल परिस्थिति उत्पन्न व्हावी. १९२९ सालीं पार्लमेंट किंवा ब्रिटिश मत्रिमडळ आपली तयारी पाहून स्वराज्याचा नवीन हप्ता किंवा डोमिनिअन स्टेटसहि देण्याविषयीं विचार करणार आहे. तर तोंपर्यंतचा काल तयारींत घालवावा आणि स्वराज्य न देणें हें व्यवहारदृष्ट्या अयोग्य होईल अशी परिस्थिति उत्पन्न करावी. १९२९ र्यंतच्या काळात जें करावयास सागावयाचें तें अशक्य किंवा अव्यवहार्य कोटींतलि असू नये. अव्यवहार्य अभिवचनें मागणे म्हणजे लोकास बेजबाबदार अभिवचनें देण्यास शिकवण्यासारखें आहे. आमच्या मतें आज लोकाच्याकडून अभिवचन एकच घ्यावें आणि तें आम्ही कर देणार नाहीं असें नव्हे, तर हें कीं, १९२९ सालीं सरकारनें सपूर्ण स्वराज्याचे हक्क दिले नाहींत आणि त्यामुळें जर लोकानीं कर न देण्याची मोहीम सुरू केली आणि त्यामुळें सरकारनें सत्याग्रहींची मालमत्ता विकावयास काढली तर आपण ती मालमत्ता विकत घेणार नाहीं, किंवा सहानुभूति दाखविणार नाहीं एवढ्यापुरतेंच निश्चित अभिवचन घ्यावें. प्रत्यक्ष कर न देण्याची चळवळ १९२९ पर्यंत मुळींच करावयाची नाहीं. या तऱ्हेची राष्ट्रभर

चळवळ केल्यानें आणि राष्ट्रभर अभिवचनें घेतल्यानें सत्यग्रहींच्या मार्गातील एक मोठी अडचण दूर होईल. कर न भरण्यासारखी क्रिया लोकांच्याकडून होण्यास मुख्य अडचण जी आहे ती हीच कीं जो कर देणार नाहीं त्याची मालमत्ता जप्त होईल. मालमत्ता जप्त झाली तर आपलाच शेजारी ती मालमत्ता कमी किंमतीस विकत घेईल; आणि आपण नुकसान पावू, आणि आपल्या शेजारच्या स्वार्थी इसमाची धन करू, या भीतीमुळें लोक त्या प्रकारची चळवळ करणार नाहींत. आणि त्यासाठीं हें भीतीचे कारणच नष्ट केले पाहिजे.

येतीं चार वर्षे सर्व देशभर प्रचारक पाठवून आम्ही सत्याग्रहींची मालमत्ता विकत घेणार नाहीं, एवढीं अभिवचनें घेण्यातच खर्चीं पडतील कर न देण्याच्या चळवळीस हीं पूर्वींचीं चार वर्षें तयारीसाठीं खरोखरच पाहिजेत का कीं देश फार मोठा आहे जोराने काम केले तरच चार वर्षे तयारी करावयास पुरतील. एखाद्या मनुष्यास मी कर देणार नाहीं, असलें अभिवचन देणें जड जाईल; तथापि सत्याग्रहींची इस्टेट विकत घेणार नाहीं किंवा घरभेद्यास सहानुभूति दाखविणार नाहीं असले अभिवचन देणें व तें पार पाडणें शक्य आहे. या तऱ्हेची चळवळ प्रचारकामार्फत प्रत्येक खेडयात जाऊन केली तर अशी परिस्थिति उत्पन्न होईल कीं त्यामुळें कर न देण्याचें धाडसहि करणें लोकास शक्य होईल. आमचें असें मत आहे कीं, सत्याग्रहीची इस्टेट विकत न घेण्याचें अभिवचन सर्व राष्ट्रभर घेतलें तर त्याचें प्रच्छन्न बळ सरकारासहि जाणवेल, आणि सरकार प्रत्यक्ष सग्रामाचा प्रसग टाळील. मात्र हें बळ सरकारास जाणविण्यासाठीं या मोहिमेची घटना, पद्धतशीर, एका हुकूमानें चालणारी अशी असली पाहिजे. व ती तशी करण्यास पगारी एका हुकुमाखालीं वागणारी प्रचारकाची फौज तयार केली पाहिजे. आणि या काम करणाऱ्या लोकास तुम्हीं अर्धपोटीं काम करा, व तुमच्या गरजा अत्यत कमी असू द्या, असल्या तऱ्हेचा उपदेश करण्याची वृत्ति नसावी. या मडळींना पगार चागले दिले पाहिजेत, आणि ते पगार देण्यासाठीं लागणारा खर्च राष्ट्रानें दिला पाहिजे. सर्व लोकास १९२९ सालात बद्धपरिकर करण्यास सुमारें ५००० पर्यंत पगारी माणसें लागतील. हींच माणसें त्याला लागणारा फडहि जमवितील. हें कार्य यशस्वी

होण्यासाठीं व माणसास एका शिस्तीनें वागण्यास शिकविण्यास लायक असे नेतेहि लागतील ही गोष्ट विसरून चालावयाचें नाहीं.

इकडे लोकाना कार्यक्षम करावयाचें आहे तर सरकारला कमी कार्यक्षम करावयाचें आहे. सरकारच्या हातून त्वरित कार्य होऊ नये ही गोष्ट चळवळीच्या पथ्यावरच आहे आणि अडवणुकीच्या मार्गावर विश्वास असलेले स्वराजिस्ट सरकारचा पाय असल्या प्रसगीं लगडा करण्यास थोडेबहुत उपयोगी पडतील; अडवणुकीच्या मार्गाचा आज उपयोग आहे किंवा नाहीं याविषयींचें हें मत नसून १९३० सालीं लोकामध्यें कर न देण्याची चळवळ चालू असता केवळ त्रासदायक काम करणारें कायदे-मडळ उपयोगी पडेल आणि आज तें ज्या अडवणुकीच्या पद्धती तयार करीत आहेत त्यापेक्षा अधिक शिस्तवार अडवणुकीच्या पद्धती शिकून ते १९३० पर्यंत तयार होतील असा अजमास आहे

सरकारची नोकरशाही ही अभेद्य आहे असें म्हणण्याचें मुळींच कारण नाहीं नोकरशाहींतील माणसे स्वराज्याच्या ध्येयास अनुकूल आहेत. आणि त्याच्यामध्यें काहीं निराळी चळवळ उत्पन्न करून आपणास स्वराज्य मिळावें, या चळवळीस त्याना सहाय्यकहि बनता येईल. केवळ नीतितत्त्वावर काहीं माणसे वळवून घेता येतील. तर कित्येक व्यवहाराच्या तत्त्वावर आपलींशीं करून घेता येतील. सरकार ज्या पोलिसाच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे तें पोलिस खातेंदेखील आपणास वळवून घेता येईल. उदाहरणार्थ अहमदाबाद कॉंग्रेस सपताच गुंटूर जिल्ह्यानें कर न देण्याची मोहीम सुरू करण्याचा विचार केला तेव्हा सरकारनें त्याना अशी धमकी दिली कीं, आम्ही तुमच्या जमिनी घेऊं व त्या अस्पृश्य वर्गास देऊ. अशा तऱ्हेचीं उदाहरणें गोळा करून पोलीस खात्यातील लोकाना सरळपणें विचारावें कीं, जातिविरुद्ध जाती उठवून देणें, समाजातील कनिष्ठ वर्गास उच्च वर्गाच्या उरावर बसविणें असल्या तऱ्हेच्या बदमाशीच्या योजना सरकारनें केल्या तर त्या योजनाचे तुम्हीं हस्तक व्हाल काय? आणि सरकारनें वाटेल तसली गोष्ट तुम्हास करावयास सागितली व ती कायदे-मडळाच्या समतीशिवाय सागितली तर हू का चूं न करता पार पाडणें हें तुम्ही आपलें कर्तव्य समजता काय! या सर्व गोष्टींचा तुम्ही आपापल्या

परिषदात विचार करावा आणि वरिष्ठ अधिकाऱ्याच्या इच्छेस किती महत्त्व द्यावयाचें व नीतिनियमास किती द्यावयाचें याचाहि तुम्हीं विचार करावा अशा तऱ्हेची चळवळ पोलीसवर्गांत सुरू केली तर ती बेकायदेशीर व्हावयाची नाहीं किंवा फुकटहि जावयाची नाहीं.

मोहीम सुरू झाल्यानतर त्या मोहिमेनें रेल्वेसारख्या सार्वजनिक संस्थातील कामगाराना देखील आपल्या बाजूचें करणें अवश्य आहे. आणि यासाठीं कामगाराच्या सस्थाना प्रथम असा प्रश्न करावा कीं तुम्हीं स्वराज्याच्या ध्येयास अनुकूल आहा कीं प्रतिकूल आहा ? व ते जर अनुकूल असले तर त्याना पुन्हा असा प्रश्न करावा कीं, या मोहिमेच्या कार्य-कर्त्यांशीं तुम्हीं सहकारिता करण्यास तयार आहा कीं नाहीं ? उदाहरणार्थ या मोहिमेच्या कार्यकर्त्यांस जर सरकारनें तुरुगात टाकलें तर तुम्हीं हरताळ वगैरे पाडून रेल्वे सरकारला अनुपयुक्त करू शकल कीं नाहीं ? असा विचार त्यास खुल्या कान्फरेन्समध्यें करण्यास सागावा, आणि त्यानीं जरी या मोहिमेस अनुकूल असें उत्तर दिलें नाहीं तरी या गोष्टीचा त्याच्यात विचार झाल्यानें आणि राजकारणाच्या कार्यक्रमात त्याना विश्वासात घेतल्यामुळें बरेंच महत्त्वाचें कार्य होईल, व असेंहि होणें शक्य आहे कीं, योग्य वातावरण उत्पन्न झालें असता कर्तृत्व अभिवचनापेक्षा कधीं कधीं अधिक होतें या न्यायानें,जेव्हा या मोहिमेचा नोकरशाहीशीं सग्राम सुरू होईल तेव्हा रेल्वेकामगार मोहिमेच्या पक्षास येऊन मिळतील हें अशक्य नाहीं.

या चळवळीमध्यें ॲग्लो-इडियन व युरोपियन यास वगळून उपयोगी नाहीं पैसे व माणसें यानीं मोहिमेस साहाय्य करण्यास युरोपियन लोकासहि बोलवावें. का कीं स्वराज्याच्या चळवळीनें म्हणजे स्वराज्यानें देशातील युरोपियन लोकाचें नुकसान न होता फायदाच होणार आहे. ज्या गोष्टी व्हाईटहॉल लडन येथें ठरतात त्या दिल्लीच्या कारभाऱ्याकडून व कायदे-मंडळाकडून ठरणार; ही परिस्थिति निर्माण झाली तर मोठमोठालीं कत्राटें जीं लडनमध्यें दिलीं जातात तीं इकडे दिलीं जातील, आणि ज्याअर्थीं येथील युरोपियन लोकाच्या व्यापारी कंपन्या चागल्या कार्यक्षम आहेत त्याअर्थीं तीं कत्राटें बरीचशीं त्याना मिळतील. ॲग्लो-

इंडियन लोकानीं त्याच्या कर्नल गिडने या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं जी चळवळ चालविली आहे ती स्वराज्यवाद्यास अनुकूल अशीच आहे, आणि युरोपीय लोकाच्या असोसिएशननें स्वराज्यवाद्याशीं अविरुद्धता वारवार व्यक्त केली आहे. त्याना असें भासू लागले आहे कीं, हिंदुस्थानातील ज्या पक्षामध्ये जातिविषयक भावना कमी आहे अशा मॉडरेट पक्षाच्या लोकास आपण मिळावें, व त्यानीं अशा प्रकारचे विचारहि अनेक वेळा स्पष्टपणें माडले आहेत त्याना हें भासणे व भासविणे शक्य आहे, कीं जर त्यानींच स्वराज्याच्या चळवळींत पुढाकार घेतला तर त्याचें वजन वाढतच जाईल. व युरोपीय लोक जर स्वराज्याच्या चळवळीस मिळाले तर चळवळीचा हा एक मोठा फायदा होईल कीं त्या चळवळीस जातिविद्वेषी चळवळीचें स्वरूप न येता तिचें शुद्ध राजकीय चळवळीचें स्वरूप राहील.

आता पूर्वोक्त विवेचनाचें थोडेसें सिंहावलोकन करू. इ. स १९२९च्या अगोदर लोकाना तुम्ही कर भरू नका वगैरे प्रकारचा उपदेश करण्यापासून अगदीं अलिप्त रहावयाचें, आणि सरकारच्या चालू कामाला कोणत्याहि प्रकारचा उपद्रव करावयाचा नाहीं. सरकारनें आपला व्यवसाय सुरळीतपणें चालवावा, आणि चळवळीच्या चालकानीं देशसंघटनेचे कार्य शिस्तवार करण्यात तीन वर्षे खर्चावींत. लोकाना सागावयाचें कीं तुम्ही इतक्यात सरकारविरुद्ध काहीं एक करूं नका. फक्त १९३० सालीं डोमिनिअन स्टेटस न मिळाल्यामुळें जो कार्यक्रम उत्पन्न होईल त्या कार्यक्रमास तयार व्हा. म्हणजे येतीं चार वर्षें उपयोगावयाचीं तीं पगारी प्रचारकाचा वर्ग उत्पन्न करणे, त्याचा दौरा करविणें, क्वेट्ट्यापासून मणिपूरपर्यंत आणि हिंदुकूशपासून कन्याकुमारीपर्यंत १९३० साली अनत्याचारी युद्धप्रसग उत्पन्न होणार, त्याचा इषारा देणें आणि सत्याग्रहाची मालमत्ता विकत घेणार नाहीं या तऱ्हेचीं अभिवचनें घेणें या कामीं खर्च करावींत.

याबरोबर सार्वजनिक नीतिमत्ता हीहि वाढविण्याचा उपदेश पाहिजे. लोकाना असें सागितलें पाहिजे कीं जीं अभिवचनें तुम्हास पाळता येतील, तींच द्या आणि जीं पाळता येणार नाहींत तीं देऊं नका. तुम्हीं आपल्या

कर्तृत्वशक्तीचें आणि कर्तव्यबुद्धीचें खोटें प्रदर्शन करून पुढाऱ्याना फसवूं नका. महात्मा गांधींस बारडोली तालुक्यात पुष्कळ लुच्च्या लोकानीं फसविलें, आणि ज्या लोकास दुसऱ्याच्या जमिनी खरेदी करावयाच्या होत्या तेच लोक करबंदीस तालुका तयार आहे अशी महात्माजींस थाप देते झाले, अशी बोलवा आहे

ही चळवळ जी करावयाची ती विशेषतः आध्यात्मिक असल्यामुळें समता, परमसहिष्णुता, भिन्नाचारसहिष्णुता हींहि लोकात उत्पन्न करावयाचीं आहेत, आणि मनुष्यामनुष्यातील अतर कमी करावयाचें आहे. असल्या नैतिक कार्यक्रमास महात्मा गाधीसारखा वक्ता खरोखरच उपयोगी होईल. मनुष्यातील अतर कमी व्हावें, उच्च वर्ग व अस्पृश्य वर्ग याच्या सोवळेपणाची व विटाळाची भावना कमी व्हावी म्हणून ईश्वराची प्रार्थना करावी आणि ईश्वर आपणात बधुत्व वाढविण्यास शक्ति देवो म्हणून त्याची याचना करावी. यासाठीं सार्वजनिक प्रार्थनाचाहि उपयोग होईल. आणि असल्या प्रार्थनाच्या नेतृत्वास प्रार्थना, उपवास यावर श्रद्धा असलेला महात्मा गाधीसारखा पुढारी फारच युक्त होईल.

परक्या देशातील चळवळ हा महत्त्वाचा कार्यक्रम नाहीं पण तो उपेक्षिता येण्याजोगाहि नाहीं. आपला कार्यक्रम सर्व जगापुढें ठेवला पाहिजे. जगाला व विशेषेंकरून इंग्रजी जनतेला हें स्पष्ट सागितलें पाहिजे कीं १९२९ नतर हिंदुस्थान सरकारास कर्ज विचारपूर्वक द्यावें. का कीं, त्या सालीं जर हिंदुस्थानला डोमिनियन स्टेटस् मिळालें नाहीं तर त्यानंतर काढलेल्या कर्जास हिंदुस्थानातील जनता खरोखर जबाबदार नाहीं. म्हणजे आपण करबंदीची चळवळ सुरू करण्यापूर्वीं सरकारनें आपला खर्च कर्ज काढून चालवूं नये म्हणून त्या मार्गात विघ्नें उत्पन्न करून ठेवलीं पाहिजेत. शिवाय सरकारनें कागदी चलन वाढवून आपला खर्च चालवूं नये म्हणून उपाय योजण्याचाहि विचार केला पाहिजे.

ही सर्व चळवळ चालली असता इंग्लंडातील जनता आपल्याविरुद्ध जाणार नाहीं म्हणूनहि खटपट पाहिजेच. आणि यासाठीं व्हाईट हॉलचा हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेवर ताबा कमी होत गेल्यामुळें जें नुकसान

झालेले भासणार ( खरोखर होणारच नाहीं ) त्याचा मोबदला काहीं तरी मिळावा म्हणून ब्रिटिश लोकास काहीं अभिवचनें दिलीं पाहिजेत. उदा०, ब्रिटिश राजघराण्याच्या खर्चांतला काहीं भाग आम्ही सोसू असेंहि अभिवचन द्यावें.

## १३

# हिंदुस्थान आणि जग

**ज्ञानार्जनाचें प्रयोजनः**—एका विशिष्ट विचारपद्धतीच्या तत्त्वज्ञाचें असें मत आहे कीं, आपणास जगात वास्तविक म्हणजे खरें ज्ञान होतच नाहीं. जे काहीं आपणास होतें तें ज्ञान वास्तविक नसून व्यक्तिसिद्धरूप म्हणजे व्यक्तींच्या ज्ञानेंद्रियानीं निश्चित झालेल्या स्वरूपात असतें सर्व भौतिक शास्त्रें हीं देखील वास्तविक ज्ञानाच्या तत्त्वावर उभारलेलीं नसून स्वानुभवनियमित ज्ञानाच्या तत्त्वावर उभारलेलीं आहेत. अर्थात् हें म्हणणें खोटें नाहीं तथापि या गृहीत तत्त्वावरून कित्येक लोक एक उच भरारी मारतात ती ही कीं, वास्तविक ज्ञान होणें जर अशक्य आहे, तर आपण ज्यास ज्ञान म्हणतों तें ज्ञानच नव्हे, आणि त्यामुळें तें निरुपयोगी होय या प्रकारच्या वादाविवादपद्धतीमध्ये शास्त्रज्ञानें उगीच डोकेंफोड करण्यात मतलब नाहीं; का कीं ज्ञान जरी इद्रियानुभवनियमित असलें तरी तें 'गजोऽपि मिथ्या पलायनमपि मिथ्या' या न्यायानें इद्रियानुभवनियमित जगाशींच वागताना उपयोगात आणावयाचें आहे, आणि त्यासाठींच तें मिळवावयाचें आहे

शास्त्रज्ञाचा आणि त्याच्या प्रयत्नाचा उपहास करू पाहणारा दुसरा वर्ग म्हटला म्हणजे "अमुक ज्ञानाचा उपयोग काय ?" असें विचारणाराचा होय प्रस्तुत प्रश्न विचारणें जितकें सोपें आहे, तितकें त्याचें उत्तर देणें सोपें नाहीं. कारण अनेक ज्ञानागाचा उपयोग समजण्यास देखील तें ज्ञान मिळविल्यानतरची स्थिति अनुभवावी लागते जगली मनुष्यास अनेक शास्त्राच्या ज्ञानाचा उपयोग समजावून देता येणार नाहीं. कोनन् डॉइल् या प्रसिद्ध आग्ल कादबरीकारानें आपल्या "शरलॉक् होम्स्"ची ओळख करून देताना शरलॉक् होम्स्ला असें म्हणताना दाखविलें आहे

कीं " पृथ्वीभोंवतीं सूर्य फिरत नसून पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते, या ज्ञानाचा उपयोग काय ? ही गोष्ट खरी आहे कीं खोटी आहे याची चौकशी करण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं आणि जर खरी असलीच तर ती मला विसरून गेलें पाहिजे. का कीं तिचा उपयोग मला काहींएक नाहीं. मग ती डोक्यात ठेवण्याचे तरी परिश्रम हवेत कशाला ? " अर्थात् वर्षाचें गणित करण्यासाठीं, ऋतूंच्या स्पष्टीकरणासाठीं आणि कालविषयक सूक्ष्म मोजदाद करण्यासाठीं पृथ्वी व सूर्य यापैकीं कोण कोणाभोंवतीं फिरतें याचे ज्ञान अवश्य आहेच. पण ह्या ज्ञानाचा रोजच्या व्यवहारात फारसा उपयोग सामान्य व्यक्तीस नाहीं. मनुष्याचा व्याप जितका जास्त होत जातो तितकी त्यास अधिक ज्ञानाची जरूर असते. राष्ट्रात अनेक अवयव असतात, त्या अवयवास अनेक क्रिया करावयाच्या असतात, म्हणून अत्यत विविधज्ञानाची जरूर राष्ट्रास आहे. तथापि शरलॉक होम्ससारख्या सशयी माणसाचा उपयोग आहेच. त्यानें काढलेल्या संशयासारखे सशय उपयुक्ततेच्या दृष्टीनें ज्ञानक्षेत्राचें अवलोकन करावयास आणि मनुष्यहितबुद्धीनें तें ज्ञान माडावयास लेखकास आणि वक्त्यास भाग पाडतील.

विविध प्रकारच्या ज्ञानाची उपयुक्तता लक्षात येण्यासाठीं आपले म्हणजे हिंदूचे व हिंदुस्थानाचे हितसबध जितक्या विस्तृततेनें लक्षांत आणता येतील तितक्या विस्तृततेने आणले पाहिजेत; आणि ते लक्षात आणून देण्याची जबाबदारी सर्व विषयाचें अवडबर पुढें माडण्याचा आपला हक्क आहे असे समजणाऱ्या ज्ञानकोशकारावर पडते. ज्ञानकोशकाराच्या दृष्टीने सर्व भारतीयास हिंदूची एकदर परिस्थिति ठाऊक पाहिजे, म्हणजे हिंदूंच्या विस्ताराची, त्याच्या सस्कृतीच्या विस्ताराची, त्या दोहोंशीं स्पर्धा करीत असलेल्या जगातील शक्तींची व कार्यपरपरांची माहिती पाहिजेच. हिंदुस्थानच्या भूमीचा भारतीयानीं व इतरानीं केलेला उपयोग, तिच्या उपयोगात भारतीयाची इतराशीं स्पर्धा आणि सर्व देश हाच एक समुच्चय धरून त्या देशातील लोकाची इतर देशातील लोकाशीं होत असलेली स्पर्धा आणि या दोन स्पर्धांच्यामुळें उत्पन्न झालेल्या व होणाऱ्या कार्यपरंपरा, या सर्व आपणास ज्ञातव्य आहेत. सामाजिक आणि राजकीय दृष्टीनें आपले हितसबध जाणण्याचा आपण प्रयत्न करू लागलों तर आत्महित-

बुद्धीनेंच पण जगांतील बहुतेक ज्ञानविषयासंबधीं जिज्ञासा आपणास उत्पन्न होईल.

**भारतविषयक ज्ञानार्जनांतील दृष्टि:**—भारतीयास जे आपले हितसबध जाणावयाचे आहेत ते त्यास सहकार्य आणि स्पर्धा या दोन्ही बाजूनीं विचार करून जाणले पाहिजेत. समाज आणि शरीर याची तुलना करून समाजास शरीराची उपमा देण्यात येते. लहान समाज घेतले तरी ते विशिष्ट क्रिया करीत असलेल्या निरनिराळया अवयवानीं युक्त असे दिसतात. तथापि समाज हें शरीर जरासें निराळ्या प्रकारचे आहे. मनुष्य-शरीरातील निरनिराळे व्यापार करणारे अवयव निरनिराळे असतात. त्याची आपआपसात स्पर्धा नसते, आणि ते स्वतः स्वयपूर्ण नसतात. तथापि मोठा समाज घेतला तर त्यात जवळजवळ स्वयपूर्ण असलेले आणि एक-मेकाशीं स्पर्धा करणारे विभाग असून त्या विभागामध्ये अन्योन्याश्रय उत्पन्न झालेला असतो, आणि काहीं बाबतींत ते केवळ मोठ्या समाजाचे विशिष्ट क्रिया करणारे अवयव असतात. समाजाची घटना मनुष्यशरीर-घटनेपेक्षा भिन्न असल्यामुळे जेव्हा आपणास एखाद्या समाजाचा अभ्यास करावयाचा असतो, तेव्हा तो स्पर्धा करणारा समूह या दृष्टीनें केला पाहिजे, तसेंच त्याहूनहि मोठया समाजाचा अवयव या दृष्टीनेंहि केला पाहिजे.

हिंदुस्थानाचे किंवा हिंदुसमाजाचे जें ज्ञान आपणास मिळवावयाचें तें साम्राज्याचे अगर जगाचे विभाग, आणि जगातील इतर समूहाशीं स्पर्धा करणारे समूह, या दोन्ही दृष्टींनीं मिळविलें पाहिजे.

या दोन्ही दृष्टींनीं प्राप्त झालेले ज्ञान हें इतराशीं असलेल्या सबंधाचा अभ्यास होय. तथापि जगाशीं आपला काहीं सबध नाहीं अशी तात्पुरती कल्पना करून अत:स्थिति जाणावयाची आणि अतर्घटना अभ्यासावयाची, हा देखील महत्त्वाचा विषय आहे. आपण प्रथमतः जगाचा एक भाग या दृष्टीनेच हिंदुस्थानाकडे व हिंदुसमाजाकडे पाहू.

**स्पर्धेचा क्षेत्रफळ व लोकसंख्या यांशी संबंध**.—एखाद्या समाजाचें महत्त्वमापन करण्यासाठीं आणि जगातील स्पर्धेचा इतिहास थोडक्यात सागण्यासाठीं, त्या समाजानें किती भूभाग व्यापिला आहे

आणि आपली लोकसंख्या किती वाढविली आहे याचा हिशोब घ्यावा लागतो. आधुनिक जगाच्या सध्यापर्यंत परिचित झालेल्या भूपृष्ठभागाचें क्षेत्रफळ पाच कोटी वीस लक्ष चौरस मैल आहे पृथ्वीच्या औदीच्य आणि दक्षिण टोंकावरील निर्जन भूभाग वगळला असता, म्हणजे जगातील मनुष्याचें वसतिस्थानच जमेस धरिलें असता, येणारा आकडा वर दिला आहे. हिंदुस्थानाचें क्षेत्रफळ सुमारें अठरा लक्ष चौरस मैल म्हणजे परिचित जगाचा एकोणतिसावा हिस्सा आहे. ज्ञात तथापि अपरिचित असा औदीच्य व दक्षिण ध्रुवाकडील भाग हा पसतीसपासून चाळीस लक्ष चौरस मैल म्हणजे दोन हिंदुस्थानाएवढा अगर अमेरिकेतील संयुक्त संस्थानाहूनहि मोठा आहे.

इंग्लंडचें क्षेत्र हिंदुस्थानच्या सुमारें पंचदशांश आहे. इंग्लंडच्या ताब्यातील सर्व जगाचा भूभाग घेतला तर तो एकंदर सुमारें एक कोटी सत्तावीस लक्ष चौरस मैल म्हणजे जगाच्या पंचमांशाहून बराच अधिक भरेल. आपल्या सवादोनशेपट प्रदेशावर इंग्लंड आज राज्य करीत आहे, आणि इंग्लंड व अमेरिका या इंग्रजी भाषा बोलणाऱ्या लोकाचें जग व्यापून टाकण्याच्या आणि आपली सत्ता स्थापन करण्याच्या बाबतींत महत्त्व काय आहे, याची आपणास वरील आकड्यावरून कल्पना येणार आहे.

जगाची लोकसंख्या दीडशे कोटींवर आहे. आणि तिचा एकपंचमांश हिंदुस्थानात आहे. या एकपंचमांश लोकसंख्येचे घटक कोणते, त्याचा पृथक्पणें व समुच्चयरूपानें इतर जगाशीं संबंध काय, याची कल्पना प्रत्येक भारतीयास पाहिजे. आपणावर बाहेरील जगाचा परिणाम काय होतो, बाहेरच्या जगावर आपला परिणाम पूर्वी काय झाला आणि आता काय होत आहे, व जगातील स्पर्धेचें स्वरूप कसे आहे, याचें स्थूल अवलोकन केले असता आपली जगात काय किंमत आहे, याची आपणास काहीं तरी कल्पना येईल.

**स्पर्धेचीं अंगें**—आपणास जें निरीक्षण करावयाचे तें सांस्कृतिक, राजकीय, आर्थिक या निरनिराळ्या दृष्टींनीं करावे लागेल, तेव्हाच आपणास आपले हितसंबंध पूर्ण कळू लागतील. कां कीं स्पर्धा या सर्व बाबतींत आहे.

**संस्कृतिस्पर्धा**:—जगाचे सस्कृतिदृष्टया चार भाग पडतात. एक भाग म्हटला म्हणजे युरोपीय सस्कृतीचा. ज्या लोकानीं या संस्कृतीचें सवर्धन केलें त्याचे वशज किंवा त्याशीं पूर्णपणें तादात्म्य पावलेले लोक यानीं तुर्कस्थानाचा लहानसा तुकडा खेरीजकरून सर्व युरोपखड आणि बहुतेक सर्व पश्चिम गोलार्ध व्यापिला आहे. इजिप्तच्या मुसलमानी आणि अबिसिनियाच्या खिस्ती धुगधुगीस बाजूला वगळलें तर सर्व आफ्रिका खंड या संस्कृतीच्या लोकानींच पादाक्रात केलें आहे. आणि जपानचें जिवत राष्ट्र, चीनचें साम्राज्यस्वरूपी लोकसत्तात्मक राज्य आणि मृतकल्प सयाम, इराण आणि तुर्कस्थान म्हणजे एशिया मायनर हीं वगळलीं असता एशिया खडाचा सर्व भागहि यानींच पादाक्रात केला आहे. अफगाणिस्तान व नेपाळ यास मेहेरबानीनें किंवा उगाच आपला व्याप फार वाढवू नये या बुद्धीनें, हातपाय बाधून पण जिवत ठेवलें आहे. हिंदुस्थानातील इग्रजाच्या कृपाछत्राखालीं असलेलीं सस्थानें याचे आस्तित्व नेपाळ व अफगाणिस्तान यापेक्षाहि केवळ मेहेरबानीनेंच आहे. सर्व इतर संस्कृतींपेक्षा या सस्कृतीशीं तन्मय झालेले लोक ज्ञानानें व कर्तृत्वानें आणि व्यवहाराच्या अवाढव्यतेनें इतराच्या पुढे गेलेले आहेत.

या सस्कृतीच्या शिवाय दुसऱ्या दोन भारतीयेतर संस्कृती म्हटल्या म्हणजे मुसलमानी व चिनी या होत या सस्कृतींमध्यें शासनसस्था जिवत असल्यामुळें या खालावलेल्या तथापि अजून सर्वांगपरिपूर्ण आहेत. अत्यंत पुरातन कालीं उच्च दर्जा पावून जिनें आपलें सातत्य आतापर्यंत कायम राखलें, आणि भौतिक शक्तींचा उपयोग व युद्धकला याखेरीज इतर बाबतींत जिचे अवयव जगातील कोणत्याहि सस्कृतीच्या तोडीचे आहेत, अशी संस्कृति चिनी होय मुसलमानी सस्कृतीचा ईश्वरविषयक भावनाच्या आवेशानें असस्कृत अरबानीं पाया घातला आणि इतराचें ज्ञान मागाहून मिळवून तिला जोरदार केली आणि चोहोंकडे जय मिळवून आपल्या सस्कृतीस महत्त्व आणलें. सध्या ही संस्कृति मरणोन्मुख झाली आहे.

चिनी सस्कृतीसंबंधानें हेंहि म्हटलें पाहिजे कीं, तिचा चोहोंकडे फैलाव होण्यास एक महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे बौद्ध सप्रदायाचा

तिजवर झालेला परिणाम होय. तिनें कोरियावर प्रकाश पाडला आणि कोरियामार्फत जपानवर प्रकाश पाडला. तिनें अनामवर आपला पगडा बराच बसविला आणि सयाम, ब्रह्मदेश, नेपाळ आणि तार्तरीचा बराचसा भाग यास शह दिला. तथापि चीनचें आणि वर दिलेल्या इतर राष्ट्रांचें जें स्वरूपैक्य झालें आहे तें भारतमूलकच आहे.

**स्पर्धाक्षेत्राबाहेरील संस्कृतीः**—जुन्या काळच्या ज्या संस्कृती आज नामशेष झाल्या त्या बाबिलोनिअन, खाल्डिअन, मिसरी, ईजिअन, पेरू देशातील व मेक्सिकन या होत. या संस्कृती मृत झाल्या असून त्या आजच्या स्पर्धायुक्त जगातील भाडणाऱ्या व्यक्ती नाहींत; पण त्या कार्य करून गेल्या.

वर निर्दिष्ट केलेल्या प्राचीन कालच्या प्रगल्भ संस्कृतीपेक्षा कमी योग्यतेच्या संस्कृतींचीं कार्यें देखील मोठीं आहेत. अमेरिकन् ताबडया इंडियनापासून मका, भुइमूग, बटाटे इत्यादि उपयुक्त जिन्नस आणि तंबाखू-सारखीं व्यसनें जगास लाभलीं आहेत सिफिलिस म्हणजे फिरंगरोगा-सारख्या रोगाच्या उत्पत्तीचें श्रेय काहीं संशोधक तांबड्या इंडियनास देतात. ऐतिहासिक माहिती ज्या काळापासून उपलब्ध होते त्याच्या पूर्वीच्या अनेक शतकें, सहस्रकें, दशसहस्रकें आणि कदाचित् लक्षकें इतक्या कालापासून आजपर्यंत मनुष्यप्राण्याचा इतिहास पसरला आहे. त्यापैकीं बराच अज्ञात आहे पशूंचें गृहीकरण म्हणजे पशूला जंगली स्वरूप टाका-वयास लावून मनुष्योपयोगी बनविणे, वन्य वनस्पतींची जोपासना व सुधा-रणा करून त्यास मनुष्योपयोगी स्वरूप देणे, मनुष्यास अत्यंत आवश्यक अशा कला तयार व्हावयास म्हणजे उदाहरणार्थ अग्नीचा उपयोग करणें, अत्यंत सामान्य असे विचार व्यक्त करण्यास समर्थ अशी भाषा बनविणें, अपत्यविषयक जबाबदारी काहीं अशीं स्त्रीजातीच्या अंगावरून घेऊन पुरुष-जातीच्या अंगावर टाकणे, म्हणजे थोडाबहुत गृहस्थधर्म स्थापन करणें, इतपतच संस्कृतीचें स्वरूप बनावयास किती काळ लोटला असेल याची कल्पना शास्त्रीय तऱ्हेनें मांडणें शक्य होईल इतकी इतिहासशास्त्राची प्रगति अजून झाली नाहीं. संस्कृति या शब्दानें आपण जी कल्पना व्यक्त करितों

ती अधिक विविध, अधिक श्रमविभागपूर्ण आणि अधिक अन्योन्याश्रयी अशा समाजाची होय. ज्या समाजात वाङ्मय उपस्थित झालेलें असतें असल्याच संस्कृती आपल्या दृष्टिपथात येतात वर उल्लेखिलेल्या संस्कृतींच्या काळींच किंवा आधुनिक काळाच्या पाठीमागें तत्पूर्व किती संस्कृतींचा इतिहास लपला गेला आहे हें हि आपणास निश्चयानें सांगता येत नाहीं. आपणास असे अनेक प्रदेश आढळतात कीं जेथे मातींत गाडलेल्या मोठमोठया अनेक इमारती आहेत, आणि त्या स्थलावर आज परिभ्रमण करणारे लोक रानटी स्थितींत आहेत. उदाहरणार्थ सामोआ बेटातील आजच्या देश्य म्हणून समजल्या जाणाऱ्या रहिवाशाची सुमारें ५० वर्षांपूर्वींची सांस्कृतिक स्थिति पाहिली म्हणजे त्या बेटातील मोठमोठया मयकल्पनाचे कर्ते त्याचेच पूर्वज होते कीं काय असा संशय उत्पन्न होतो.

लुप्त झालेल्या अशा संस्कृतींची आपणास साकल्याने कल्पनाहि येत नाहीं. शिवाय समुद्र व जमीन याची आजची जगावरील वाटणी ही देखील अनेक वर्षांपूर्वींच्या ज्या कालीं नव्हती त्या वेळेस भूभागाचें सांस्कृतिक स्वरूप काय होतें याचें आपणास चित्र काढता येत नाहीं. हिंदुस्थान म्हणून आपण आज ज्याला म्हणतों तोच देश घेतला तर त्याचें प्रादेशिक एकत्व प्राचीनकालीं नव्हतेंच दख्खन, ऑस्ट्रेलिया, मादागास्कर आणि दक्षिण आफ्रिका हीं एका काळीं सबद्ध होतीं अशी भूशास्त्रवेत्त्याची कल्पना आहे. कदाचित् मनुष्यप्राण्याचा उद्भवहि तेथेंच झाला असेल आणि तेथील मनुष्याचें स्वरूप आज लिमर नावाचा मनुष्यकल्प प्राणी आढळतो त्या प्राण्यासारखें असेल अशी शास्त्रीय कल्पना संशोधकानीं बसविली आहे. हिंदीमहासागर लिमरस्वरूपी मनुष्यकल्पानीं वसलेला होता ही कल्पना आजच्या शास्त्रज्ञाकडून तीव्र टीकेस पात्र होऊन सोडून दिली गेल्यासारखीच आहे. तथापि आफ्रिका व हिंदुस्थानचा दक्षिण भाग जोडणारा प्रदेश प्राचीन काळीं होता या कल्पनेचा त्याग झाला नाहीं.

आफ्रिकेचे आजचें भूस्तरस्वरूप देखील पुष्कळ फेरफार होऊन बनलेलें आहे. या खंडात देखील पुष्कळ ठिकाणीं अनेक नष्ट संस्कृतींचे अवशेष सापडतात. अमेरिकेंत पेरू आणि मेक्सिकोखेरीज इतर ठिकाणीं देखील

बऱ्याच उच्च प्रकारच्या संस्कृतीचे अवशेष आज सापडत आहेत. त्याची गोळाबेरीज करून सागणारा ग्रथ अलीकडे झाला नाहीं. तथापि नाडिलॅक यानें ' प्रीहिस्टॉरिक अमेरिका ' म्हणून जे पुस्तक बऱ्याच वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलें त्यात अशा पुष्कळ अवशेषाचे वर्णन दिले आहे.

**अत्यंत प्राचीन इतिहासाची साधनें:**—अत्यत प्राचीन काळातील मनुष्याचा इतिहास लिहिण्याचे साहित्य पुरविणारे सशोधक म्हणजे भूशास्त्रवेत्ते होत. पृथ्वीच्या भूमिजलरूपी पापुद्याचा इतिहास मिळविण्याचा त्यानीं जो प्रयत्न केला त्यात त्यास मनुष्यप्राण्याच्या अत्यत प्राचीन अस्तित्वाचे अवशेष जगातील अनेक ठिकाणीं सापडले. ते अवशेष आणि जगामध्यें आज बोलल्या जाणाऱ्या भाषाचे सादृश्य आणि भेद हीं अत्यत प्राचीन इतिहासाचीं साधने होत.

**संस्कृतींच्या अभ्यासाचे हेतु आणि महत्त्व:**—जुन्या सस्कृतीचा अभ्यास करावयाचा तो कौतुकमय दृष्टीनेंच होईल, तथापि आजच्या जीवनार्थकलहात त्या अभ्यासाचें महत्त्व नाहींच असें नाहीं. जिवत सस्कृतीस आपले पूर्वींचे अवयव शोधणें आणि शक्य असल्यास त्याचा मुख्य भागांशीं सबध जोडणें हें महत्त्वाचें कार्य आहे. जिप्सींचा आणि हिंदुस्थानचा सबध आज जो लक्षात येतो तो भाषाशास्त्रमूलकच आहे आणि आजचे श्यामलवर्ण हिंदू अमेरिकेच्या नागरिकत्वास योग्य ठरले, त्याप्रसगीं कायद्याचा अर्थ लावण्यासाठीं भाषाशास्त्रच उपयोगास आलें.

मृत सस्कृती आजच्या स्पर्धेत नाहींत. तेव्हा आपलें लक्ष साहाजिकच जिवत सस्कृतींकडे आणि विशेषेंकरून ज्या सस्कृतीचा आपण अभिमान धरतों तिची नातीं शोधण्याकडेसच जाणार. मनुष्यप्राण्याच्या इतिहासात त्याच्या अनेक करामती जलप्रलय ( प्रदेशच्या प्रदेश समुद्रात कायमचे बुडणे ), धरणीकप इत्यादि सृष्टिक्षोभानीं नष्ट झाल्या आहेत. ज्या करामती नष्ट झाल्या त्याचे अवशेष शोधून त्या अवशेषाचे धागे आजच्या परिस्थितीशीं जोडणें शक्य होऊन इतिहासाचें सातत्य आपणास देता येईल काय हाहि एक प्रश्नच आहे. असो.

**भारतीय संस्कृति:**—भारतीय संस्कृति म्हणून आज आपण जी म्हणतों ती एकाच मानववशातून निघालेली नाहीं. सगोत्रविवाहास निषेध,

कुंकू व बांगड्या इत्यादि स्त्रियाचीं सौभाग्यचिन्हें, देशात दृष्टीस पडणारीं अनेक उपास्यें, अनेक चालीरीति हीं वैदिक परंपरेंतून निघालीं नाहींत तर वैदिक परंपरेच्या लोकाच्या आचाराशीं आणि धर्माशीं इतराच्या आचार-धर्मांचें एकीकरण होऊन आजचे हिंदुत्व निर्माण झालें आहे, असा संशोधकाचा मथितार्थ आहे. या भारतीय सस्कृतीच्या मूल घटनेचा व संवर्धनाचा म्हणजे इतराशीं आलेल्या तिच्या सबधाचा व तन्मूलक विस्ताराचा एक लाबलचक इतिहास आहे; तो प्रत्येक भारतीयास ज्ञातव्य आहे. भारतीय सस्कृतचिीं अगें चोहोंकडे पसरलीं, तिने अनेक लोकावर छाप टाकली, आणि बऱ्याच लोकसमुदायास स्थूल एकरूपता आणली. गेल्या ९०० वर्षांचा इतिहास पाहिला असता विद्येविषयीं होत असलेल्या दुर्लक्षामुळें, स्पर्धा करणाऱ्या आणि भारतीय सस्कृतीचा नाश करू पाहणाऱ्या इतर संस्कृतींशीं भारतातील विद्वान् वर्ग अपरिचित असल्यामुळें, वाढत चाललेल्या ज्ञानक्षेत्राशीं असबद्ध राहिल्यानें, जगाशीं स्पर्धा करण्यास योग्य असें समाजयत्र बनविण्याकडे दुर्लक्ष केल्यामुळें, आणि इतर अनेक कारणानीं या सस्कृतीचा दिवसानुदिवस नाश होत आहे. एका काळीं या संस्कृतीचा पगडा बॅक्टियापासून कँबोडियापर्यंत आणि खरोष्ट्रापासून फिलिपाइनपर्यंत इतका दृढ झाला होता कीं हा सर्व प्रदेश म्हणजे भारतवर्षच होऊं पहात होता. या सस्कृतीचें महत्त्व ग्रीक व रोम येथपर्यंत भासत होतें, आणि या सस्कृतींतील बौद्ध सप्रदायाचा पगडा चीन, जपान, तिबेट, माचुरिया, तुर्कस्तान आणि सैबेरिया इतक्या विस्तीर्ण प्रदेशावर पडला होता. तीच सस्कृती आज का नामशेष होऊ पहात आहे, आणि तिचें आपण जागरूक झाल्यास काय भवितव्य आहे या सर्व गोष्टी आपणास विचारार्ह आहेत.

**स्पर्धातत्त्वें:**—स्पर्धा वैयक्तिक स्थितींतून सामुच्चयिक स्थितींत गेली म्हणजे समुच्चयविषयक भावना जागृत होते, आणि ही स्पर्धा चालू असताना ज्या समुच्चयाचे आपण अवयव आहोंत त्या समुच्चयाचें हित व्हावें ही भावना उत्पन्न होते. जगातील स्पर्धेचें क्षेत्र आपणास जितकें अधिक परिचित होईल तितकें अवलोकन अधिक मार्मिक होईल आणि दीर्घकालव्यापी स्पर्धामूलक

चळवळी समजल्यास इतिहासाचा अभ्यास करताना महत्त्वाच्या गोष्टी कोणत्या हें कळावयास लागेल स्वसंरक्षण हें मनुष्याचें आद्य कर्तव्य होय. राष्ट्रसरक्षण, जातिसरक्षण ह्या प्रकारचीं स्वसरक्षणाचीं अनेक अगें आहेत. व्यक्तींच्या हितासाठींच राष्ट्राचें हित साधावयाचें. आणि स्वजनाना आपलें सामुच्चायिक हित साध्य करून घेणें शक्य व्हावें म्हणून तें साध्य करून घेण्याचें यत्र जें राष्ट्र म्हणजे व्यक्तींची सयुक्तस्थिति तिचें सरक्षण करावयाचे. भाषेचें सवर्धन करावयाचें आणि वाङ्मयाचें सवर्धन करावयाचें याचाहि हेतु हाच कीं, स्वजनापैकीं बहुतेकास स्वभाषेखेरीज अन्य भाषा परिचित नसते आणि त्या लोकांस आपल्या उन्नतीच्या मार्गांत अन्य भाषेंत माहिती अडकल्यामुळें परावलबन, पारतन्त्र्य, चढाओढींत अडचण वगैरे जीं विघ्नें भासतात तीं दूर करावयाचीं. सस्कृतिसवर्धन हें याच प्रकारचें कार्य होय आपल्या संस्कृतीचा त्याग न करिता, आपल्यामध्येंच अत्यंत प्रगत अशा गोष्टी आणावयाच्या हें अनेक व्यक्तिहितबुद्धीनेंच निघालेलें तत्त्व होय. स्वसस्कृतीचें रक्षण आणि संवर्धन होण्यासाठींच धर्मविषयक, भाषाविषयक, आणि वाङ्मयविषयक भावना अस्तित्वात येतात. जाति, राष्ट्र आणि सस्कृति या बधनानीं मनुष्य-समाज बाधला गेला आहे. हीं बंधनें तोडून एखादी व्यक्ति परसस्कृतींत प्रवेश करून आपलें वैयक्तिक हित साध्य करू शकेल, पण राष्ट्रास किंवा सस्कृति-छत्राखालीं असलेल्या सर्व लोकास तसें करता येणार नाहीं. आणि एका संस्कृतीचें सवर्धन दुसऱ्या संस्कृतींचा म्हणजे तिच्या घटनेचाच केवळ नव्हे तर तिच्या छत्राखालील व्यक्तींचाहि नायनाट करू पाहतें.

